नागपूर प्रकाशन–३

# लढवय्ये

## आणि इतर गोष्टी

गंगाधर लक्ष्मण देवपुजारी
बी. एस्सी.

मूल्य
२ रु०

वर्षप्रतिपदा
१९४३

संपादक :
(१) प्रो. यादव मुकुंद पाठक,
एम्. ए., एलएल्. बी.
(२) कल्याण

सल्लागार–
श्री. ग. त्र्यं. माडखोलकर
प्रकाशक–
दि. मा. घुमाळ,
नागपूर प्रकाशन,
सीताबर्डी, नागपूर



मुद्रक–
ल. म. पटले,
रामेश्वर प्रिंटिंग प्रेस,
सीताबर्डी, नागपूर

चित्रकार–
रा. ना. वकील,
आणि
त्रि. अ. चोरघडे
ब्लॉक्स–
प्रभात प्रोसेस स्टुडिओ,
नागपूर शहर

# माहिती—

हेनूरी रीने आल्बर्ट गाय् द मोपासां (१८५०-१८९३) या फ्रेंच लघुकथालेखकाबद्दल पुढील माहिती एन्सायक्लोपीडिया ब्रिटॅनिका या ग्रंथांत सांपडते:—

' मोपासांच्या हयातींत मनोविश्लेषणशास्त्र अस्तित्वांत आलें नव्हतें, कलेचीं प्रमेयें ठरविलीं गेलीं नव्हतीं, परस्परविरोधी विचार-संपत्तीचा सांठा बेताबाताचाच होता; त्याच्याठायीं नैतिक किंवा आत्यंतिक सामाजिक विरोध नव्हता; मनाचा गोंधळ उडविणारी कल्पकता नव्हती. कुठल्याही बाह्यसंस्कारांच्या दडपणामुळें चलबिचल न होतां मोपासांच्या सर्वसाक्षी, अप्रतिम, दृष्टीनें त्याला श्रेष्ठ प्रतीचा प्रेक्षक व्हावयाला लावलें, आणि या गुणाच्या सोबतीला त्याच्या वाङ्मयीन गुणांची जोड लाभल्यामुळें त्याचा पुढील मार्ग निष्कंटक झाला. आपण एकदेखील नवीन शोध लावला नाहीं याचा मोपासांला अभिमान होता, जें प्रत्यक्ष पाहिलें नाहीं त्याचें वर्णन त्यानें कधींच केलें नाहीं. अशा एकंदर ठराविक मर्यादांमुळेंच तो इतका अजोड कलावंत झाला असें म्हणणें विरोधाभासाचें होणार नाहीं.

' मोपासांच्या दृष्टीला सर्व मानव मूलतः सारखेच असलेले आढळून येतात; जगांतल्या, आयुष्यांतल्या, प्रत्येक थरांत त्याला त्याच त्या चलाख, क्रूर, मनोभावना आपापलें कार्य करतांना दिसत असतात; त्याचें जग खुशालचेंडू जग नाहीं. पण त्याला त्या जगाशिवाय इतर दुसऱ्या जगाची माहिती नाहीं; आनंद उपभोगावयाचा राहून जाईल या कल्पनेनें त्याला म्हातारा होण्याच्या भीतीनें भारून टाकलें आहे; मृत्यूची धास्ती एखाद्या भुतासारखी त्याच्या मानगुटीं बसली आहे. त्याला वाइटापेक्षां बरें जास्त आवडतें अशांतला भाग नाहीं; अमुक मनुष्यापेक्षां तमुक मनुष्य बरा असें त्याला वाटत नाहीं; तो आयुष्याच्या अर्थाबद्दल, हेतूबद्दल, वादविवाद करावयास थांबत नाहीं; वस्तुमात्रांच्या, प्राणिमात्रांच्या, पोटांत दडून असलेल्या गोष्टी हुडकून काढून त्यानें जें कांहीं अवलोकन केलें त्याचें शाब्दिक

वर्णन कागदावर उतरविणें हा त्याचा एकमेव हेतु आहे; आणि त्यानें इतक्या उत्कटतेनें व शांतपणें जगाचें निरीक्षण केलें आहे कीं तो एक अतिसूक्ष्मतम वर्णनकार झालेला आहे. त्याची शैली फारच साधी, सुटसुटीत, असूनही जोरदार आहे; कोणताही शब्द वापरतांना, तो जरी क्षुद्रतम असला तरी त्याच्या उपयोगामुळें जर त्यानें पाहिलेल्या वर्ण्यविषयाचें चित्र आंखतां येत असेल तर, तो वापरण्यांत मोपासां मनाचें समाधान मानून घेतो.

'लघुकथेचा सर्वोत्कृष्ट प्रणेता म्हणून वाङ्मयांतील अमरपदप्राप्तीचा हक्क मोपासांनें हंसतखेळत कमावून घेतला आहे.'

अशा या लेखकाच्या एकंदर २२३ लघुकथांपैकीं २३ कथा निवडून त्यांपैकीं १० कथांचीं भाषांतरें आणि १३ कथांचीं रूपांतरें या संग्रहांत समाविष्ट केलीं आहेत.

२६-३-१९४३.

ग. ल. देवपुजारी

## लढवय्ये—

जर्मन लष्करी कमांडंट मेजर ग्रॅफ् फॉन् फाल्सेंबर्ग वर्तमानपत्र वाचीत एका आरामखुर्चीवर लवंडला असून त्याचे पाय भिंतींतल्या शेकोटीच्या संगमरवरी बांधकामावर दोन खड्ड्यांत टेकलेले होते. उर्व्हिल् गावांतील या जमीनदाराच्या वाड्यांत गेले तीन महिने अशाच थाटांत रेलून कमांडंट रोज वर्तमानपत्र वाचीत असल्यामुळें तो आपले बूट टेकवी त्या जागीं आतां खड्डे पडले होते.

त्याच्या हाताशींच ठेवलेल्या खोदकाम केलेल्या एका उंची लांकडाच्या तिवईवर एक ऊनऊन कॉफीचा कप ठेवला होता. त्या टेबलाचा पृष्ठभाग मात्र दारूच्या पेल्यांचीं वर्तुळें, जळत्या सिगारच्या थोटकांनीं कोळसा झालेले लांबोळे डाग, त्या विजयी वीरानें चाकूनें पेन्सिल सोलतां सोलतां मध्येंच लहर येऊन त्या अवजाराच्या टोकानें खरचटून काढलेले आंकडे, शब्द, वेड्यावांकड्या रेघोट्या, यांनीं विद्रूप झाला होता.

कमांडंटच्या चपराशानें आणून दिलेलीं पत्रें आणि मातृभाषेंतील वर्तमानपत्रें वाचून झाल्यावर तो उठला आणि दोनतीन ताज्यां, ओलसर खोडें त्यानें शेकोटींत झोंकून दिलीं. ऊब आणण्याकरितां वाड्यांतला सर्पणाचा सांठा अजीबात संपून आतां भोंवतालचीं जिवंत, हिरवीं झाडें तोडण्यापर्यंत लष्कराची मजल येऊन ठेपली होती. नंतर कमांडंट खिडकीकडे वळला.

बाहेर एखाद्या अज्ञात शक्तीनें वरून बादल्या भरभरून खालीं झोंकाव्या असा मुसळधार पाऊस पडत होता. खिडकींतून बाहेर पाण्याची भिंतच्याभिंत दिसून येत होती.

मेजर फाल्सेंबर्ग बराच वेळ खिडकीच्या तावदानावर आपल्या बोटांनीं, लष्करी बँडच्या ठेक्यावर, आघात करीत बाहेरच्या ओल्याथप्प जमीनीकडे आणि लांबवर दिसणाऱ्या दुथडी वाहून चाललेल्या नदीकडे पहात उभा होता. इतक्यांत कुणी त्या खोलींत आल्याची चाहूल लागून त्यानें मागें पाहिलें तों त्याला आपल्या हाताखालचा अधिकारी कॅप्टन बॅरन् फॉन् केल्विन्स्टीन आलेला दिसला.

मेजर स्वतः खूपच धिप्पाड, रुंद छातीचा असून त्याचे निळे डोळे मात्र सौम्य आणि थंड प्रकृतीचे निदर्शक होते. त्याच्या कपाळावर गेल्या महायुद्धांत

त्याला देणगीदाखल मिळालेल्या जखमेचा एक काळसर-लाल वळ होता, व तो अधिकारीवर्गांतील एक शूर आणि संभावित गृहस्थ गणला जात असे.

कॅप्टन केल्विन्स्टीन मात्र एक ठेंगू, गाजरासारख्या लाल चेहऱ्याचा मनुष्य असून त्याचा तेवढा भाग नेहमीं तेलकट दिसत असे. त्याच्या डोक्यावरचे आंखूड केंस एखाद्या खापरासारखे दिसत. तो आपला कंबरपट्टा करकचून बांधी. एका रात्रीं तो आपले समोरचे दोन दांत गमावून बसला होता, पण ते कसे काय पडले हें त्याचें त्यालाच सांगतां येत नसे. बोलतांना त्या खिंडारांतून हवा निघून जात असल्यामुळें कॅप्टनचें बोलणें नेहमीं समजून येईना.

कमांडंटनें कॅप्टनशीं हस्तांदोलन केलें आणि आपली कॉफी ( सकाळ पासूनचा सहावा कप ) एका घोंटासरशीं पिऊन टाकली. त्यानें कॅप्टनकडून एकंदर हालचालींचा रिपोर्ट ऐकला, व ते दोघे खिडकीच्या तावदानांतून बाहेर पाहूं लागले. तशा प्रकारचा राक्षसी पाऊस त्यावेळीं दोघांनाही नकोसा वाटला. मेजर शांत वृत्तीचा मनुष्य असून जर्मनींत त्याची पत्नी हयात होती, आणि तो स्वाभाविकपणेंच कुठल्याही परिस्थितीशीं समरस होऊं शकत असे. पण कॅप्टननें मात्र आपलें आयुष्य हीन दर्जाच्या देखील इष्कबाजींत घालविलें असल्यामुळें त्याला त्या वाड्याच्या खुराड्यांत गेले तीन महिने ब्रम्हचारी वृत्तीनें कोंडून रहावें लागल्यामुळें तो जवळजवळ पिसाळल्यासारखा झाला होता.

दारावर टक्टक् असा आवाज झाला आणि कमांडंटनें 'आंत ये' म्हणतांच दार उघडून, पाय खट्कन् जोडून, सलाम ठोकून, एक लष्करी शिपाई ताठ उभा राहिला. त्यानें तोंडांतून शब्द काढला नाहीं, पण हें न्याहारीचें बोलावणें आहे येवढें त्या दोघां अधिकाऱ्यांनीं ओळखलें.

जेवणाच्या दालनांत अधिकारानें एकाखालीं एक असलेले इतर तिघे अधिकारी त्यांना भेटले. त्यांपैकीं एक लेफ्ट्नंट् ऑटो फॉन् ग्रॉस्लिंग् नांवाचा असून दुसरे दोघे सब् लेफ्ट्नंट् फ्रिट्झ् शोनेबर्ग आणि काउंट् विल्हेल्म फॉन् आयूरिक् या नांवाचे होते. या पांच अधिकाऱ्यांपैकीं विल्हेल्म सर्वांत धाकटा, देखणा, सर्वसाधारण मनुष्यांशीं गुर्मीनें आणि क्रूरपणानें वागणारा, कैद्यांचा कर्दनकाळ आणि स्वभावानें दुष्ट असा होता. त्याची कंबर निमुळती असून त्याला छानछोकीची अतोनात आवड असे. त्याच्या फिक्कट चेहऱ्यावर नुकतीच कुठें मिसुड फुटूं लागली होती.

वाड्यांतलें जेवणाचें दालन बरेंच ऐसपैस असूनें भिंतींना लावलेले मौल्य-वान पण पिस्तुलांच्या गोळ्यांनीं तडकवून टाकलेले बिलोरी आरसे आणि खिडक्या-दारांवर टांगलेले उंची जरतारी मखमली पण तलवारींनीं लक्तरें करून टाकलेले पडदे, हें गुणी बाळ दिवसरात्र कोणत्या उद्योगांत मग्न राही याची साक्ष देत होते.

तीन भिंतींवर एक घोडेस्वार सरदार, दुसरा धर्मगुरु आणि तिसरा न्याया-धीश अशीं त्या वाड्यांतल्या तीन पूर्वजांचीं तैलचित्रें टांगलेलीं होतीं, पण त्यांच्या तोंडांच्या जागीं छिद्रें करून त्यांत तीन मातीच्या, तंबाखूच्या लांब चिलिमी खोंचून दिल्या असून, चवथ्या भिंतीवरील देखण्या सरदारीणबाईच्या ओंठांवर कोळशानें लांबलचक आणि पिळदार मिशा चितारून काढलेल्या होत्या.

त्या उध्वस्त, पावसामुळें जास्तच अंधाऱ्या झालेल्या अव्यवस्थित दालनांत अधिकाऱ्यांनीं एकमेकांशीं न बोलतां न्याहारी आटपली.

खाणें झाल्यावर दारू पीत आणि चिरूट ओढत ते नेहमींप्रमाणें आपण घालवीत असलेल्या निष्क्रिय जीवनासंबंधीं तारे तोडूं लागले. मद्याच्या बाटल्या एका हातांतून दुसऱ्या हातांत अशा सारख्या फिरत होत्या, आणि दारूचा एक घोंट व चिरुटाचा एक भपकारा असा अखंड कार्यक्रम चालू होता.

त्यांच्या चेहेऱ्यावर जरी हताशपणा आणि कंटाळा दिसून येत होता तरी प्रत्येकाचा पेला रिकामा झाला कीं भरला जात असे, आणि काउंट् विल्हेलम तर मिनिटामिनिटांत आपला पेला रिता करी व शेजारीं उभा असलेला शिपाई तो लगेच भरून देई. चिरुटांच्या उग्र धुरानें त्यांचा कोंडमारा होत होता, ते अर्धवट बेशुद्धावस्थेंत बेकाम बसून होते. आणि दारूच्या धुंदींत पुरेपूर गर्क होते. इतक्यांत बॅरन् केल्विनस्टीन् आपल्या खुर्चींत ताठ होऊन बसला आणि म्हणाला, " गड्यांनो, हें असं कुठपर्यंत चालणार ? आपण कांहींतरी करायलाच पाहिजे, नाहीं कां ? " हें ऐकतांच जर्मन जातीचें वैशिष्ठ्य अशा भदाड्या चेहेऱ्याचे ऑटो आणि फ्रिट्झ् दोघेही एकदम उद्गारले, " काय करायचं, कॅप्टन ? "

तो थोडा वेळ विचार करून म्हणाला, "काय करायचं म्हणतां ? जर कमांडंट परवानगी देत असतील तर आपण कांहींतरी करमणुकीची व्यवस्था करूं."



बसल्या ठिकाणाहून त्यानें दोन गोळया झाडल्या आणि चित्राचे डोळे फाडून काढले.

" कसल्या प्रकारची करमणूक, कॅप्टन्?" मेजरनें आपला चिरूट हातांत घेत विचारलें.

" ती सर्व व्यवस्था माझ्याकडे लागली, साहेब," कॅप्टन् म्हणाला. " मी आपल्या कॉर्पोरलला शेजारच्या शहरीं पाठवितों. तिथून तो कांहीं बाया घेऊन येईल. त्या कुठं मिळतात हें मला माहीत आहे. आपल्याजवळ सर्व सामानसुमान भरपूर असल्यामुळें आपण रात्रीं जेवणाचा कार्यक्रम करूं म्हणजे आजची संध्याकाळ तरी मजेंत जाईल!"

मेजरनें आपले खांदे उंच केले व तो हंसला. "तूं वेडा आहेस, कॅप्टन्," तो म्हणाला.

पण आतां इतर तिघे अधिकारी उठून त्यांनीं कमांडंटला गराडा घातला व ते म्हणाले, " कॅप्टन् म्हणतात तसं त्यांना करूं द्या ना, साहेब. आम्हीं इथं फारच कंटाळलों आहोंत."

शेवटीं मेजरनें कबूली दिली बॅरननें लगेच कॉर्पोरलला बोलाविलें.

पांच मिनिटांनंतर चार घोडे जोडलेली एक लष्करी सामानवाहतुकीची गाडी त्या मुसळधार पावसांत शेजारच्या शहराच्या रोखानें भरधांव निघाली; आणि अधिकारी लोक शुद्धीवर आल्यासारखे वाटले, त्यांचे चेहेरे खुलले, व ते गप्पा मारूं लागले.

अजून पूर्वीइतकाच धो धो पाऊस येत असतांना देखील मेजरचें म्हणणें पडलें कीं त्याचा जोर कमी होऊं लागला, आणि ऑस्लिंगची तर खात्रीच पटली कीं आभाळ स्वच्छ होण्याच्या बेतांत येत चाललें. काउंट् विल्हेल्म मात्र सारखा चुळबुळ करून राहिला होता. तो उठला, पुन्हां बसला आणि आपणांला काय नासधूस करतां येईल अशा नजरेनें भोंवतालीं भिरभिर पाहूं लागला. त्याची नजर सरदारीणच्या चित्रावर खिळली आणि त्यानें खिशांतून पिस्तूल काढलें. " तुला मी पाहूं देणार नाहीं!" असे शब्द तोंडांतून काढतां काढतांच बसल्या ठिकाणाहून त्यानें दोन गोळया झाडल्या आणि चित्राचे डोळे फाडून काढले.

" आतां आपण सुरुंग तयार करूं या!" तो उल्हासानें म्हणाला. करमणुकीचा एक नवीन विषय सांपडला या आतुरतेनें इतरांनीं आपली बडबड बंद

केली. हा सुरुंग लावण्याचा उपद्व्याप खास काउंट विल्हेल्मनें लावलेला एक अद्वितीय नासधुशीचा शोध होता व तो त्याला फार आवडे.

जर्मनांनीं उर्व्हिलचा कबजा घेतल्यावर वाड्याचा फ्रेंच जमीनदार मालक जेव्हां जीव मुठींत घेऊन पळाला होता तेव्हां वाड्यांत भरलेल्या सहस्रावधि वस्तूंपैकीं कांहींच त्याला आपल्याबरोबर नेतां आल्या नव्हत्या. त्यानें दिवाणखान्याच्या एका भिंतींत एक मोठी पोकळी खणून आपले चांदीचे कांटे, चमचे, बशा, पेले, पराती, आणि अशाच इतर प्रकारचीं भांडीं तिथें ठेऊन वरून जुजबी बांधकाम करवून घेतलें होतें. तो स्वतः रसिक असून वस्तुसंग्रहाचें त्याच्या घराण्यांत सर्वांनांच वेड असल्यामुळें त्याच्या मुख्य दिवाणखान्यांत कपाटांतून, शेल्फवर, शेकोटीच्या बांधकामावर, कांच, चिनीमाती, वेगवेगळ्या धातूंचे शेकडों कलांचे नमुने तसेच टाकून देऊन त्याला पळ काढावा लागला होता.

पण या वस्तुसंग्रहांतील फारच थोड्या चिजा आतां शिल्लक राहिल्या होत्या. त्या चोरल्या गेल्या नव्हत्या, कारण कमांडंटच्या शिस्तीखालीं तसें होणें शक्य नव्हतें. पण काउंट् विल्हेल्मला मधूनमधून सुरुंगाचे प्रयोग करून पाहण्याची लहर येई, व अशा प्रसंगी सर्व अधिकारी बेहद्द खूष होत असत. आतांही छोटा काउंट् दिवाणखान्यांत गेला आणि तिथून हुडकून काढून त्यानें एक अप्रतिम चित्रकाम केलेली चहादाणी आणली. त्यानें त्या भांड्यांत बंदुकीची बारूद भरून एक कांकडा तोटीच्या तोंडांत घातला. मग त्यानें तो कांकडा शिलगाविला, व तें भांडें धांवत जाऊन दिवाणखान्यांत ठेऊन परत आल्यानंतर मधलें दार बंद केलें. ते सर्व जर्मन आतां पुढें काय होणार हें उत्सुकतेनें पहात पोरकटपणें स्तब्ध उभे राहिले. लगेच दिवाणखान्यांत जोराचा स्फोट झाला, सबंध वाडा हादरल्यासारखा झाला, आणि ते दार उघडून दिवाणखान्यांत शिरले.

काउंट् सर्वांच्या आधीं आंत शिरला आणि आपल्या अक्कलहुशारीचें तें विध्वंसित प्रदर्शन पाहून त्यानें टाळ्याच वाजविल्या. एका स्त्रीचा नग्न पुतळा विच्छिन्न होऊन त्याचे तुकडे आणि इतर चिनीमातीचीं उपकरणें मोडतोड होऊन इतस्ततः पसरलीं असून, त्या पुतळ्याचें धडावेगळें झालेलें शिर त्या ढिगाऱ्यांत एका बाजूला पडलें होतें. हीं जर्मन माकडें त्या तुकड्यांतले कांहीं कांहीं तुकडे उचलून त्यांच्याकडे उलटून पालटून पहात व खीः खीः दात दाखवून भिरकावून देत.

मेजर मात्र शांतपणें त्या उध्वस्त कलाप्रतीकांकडे पहात उभा होता. तो थोडा वेळ दिवाणखान्यांत थांबून परत जेवणाच्या दालनांत गेला आणि जातांजातां त्यानें आपला अभिप्राय जाहीर केला, " काउंट्चा सुरुंग यशस्वीपणें उडाला खरा ! "

पण मधलें दार उघडें असल्यामुळें बारुदीच्या धुराचा लोट या दालनांत येऊन चिरुटाच्या धुरांत इतका कांहीं मिसळून गेला होता कीं ते सर्व गुदमरूं लागले. कमांडंटनें खिडकी उघडतांच ते आपापले दारूचे पेले घेऊन तिकडे धांवले.

पावसाचे तुषार खिडकींतून खोलींत शिरून त्यांच्या गणवेषावर वर्षाव करूं लागले. पानांपानांतून पाण्याचे मोठमोठाले थेंब ठिबकत असलेल्या झाडांकडे, त्यापलीकडील धुक्यानें भरून निघालेल्या खिंडीकडे आणि सर्वांच्या शेवटीं उंच दिसणाऱ्या प्रार्थनामंदिराच्या कळसाकडे ते पाहूं लागले.

जर्मन लष्कर तेथें रहावयाला आल्यापासून या चर्चची मोठी घांट एकदांही वाजली नव्हती. शेजारच्या प्रांतांत जर फ्रेंच रहिवाशांतर्फे जर्मनांना कोणत्या प्रकारचा प्रतिकार झाला असेल तर तो येवढाच. त्या गांवांतल्या धर्मोपदेशकानें आपल्या घरीं जर्मनांना रहावयाला जागा दिली होती, त्यांची खाण्यापिण्याची व्यवस्था केली होती, त्यांची लहर लागेल तेव्हां मर्कटदोशीनिमित्त त्यांनीं जबर-दस्तीनें पाजलेली दारूही तो वेळींप्रसंगीं प्याला होता, कमांडंटच्या इच्छेनुसार त्यांना हवी ती सोय मध्यस्थीपणानें त्यानें करूनही दिली होती, पण घांट वाजविण्याच्या प्रश्नाबद्दल मात्र त्याचें कांहींएक ऐकलें नव्हतें. ' तुम्हीं मला गोळी मारून ठार करा वाटल्यास, पण मी तवढं करणार नाहीं, " असें त्यानें निक्षून सांगितलें होतें. धर्मोपदेशक स्वभावतःच रक्तपिपासू, क्रूर आणि दुष्ट असूं नये या तत्वाबरहुकूम त्याला जर्मन शत्रूंचा येवढाच प्रतिकार करणें शक्य होतें, आणि गांवांतला सुत-कीपणा कायम ठेवण्याकरितां घांट न वाजविणें हा जो त्यानें निर्धार केला होता त्याला उर्व्हिलच्या रहिवाश्यांची मूक संमति होती. येवढेंच नव्हे तर त्यांना त्याच्या धैर्याबद्दल अभिमान वाटूं लागला

कमांडंट आणि त्याचे अधिकारी आपसांत धर्मोपदेशकाच्या या निरुपद्रवी शौर्याबद्दल नुसते हंसत आणि गांवकऱ्यांच्या या स्वदेशप्रेमाला हरकत घेत नसत, कारण इतर सर्व बाबतींत त्यांच्या हुकुमांची चोख अंमलबजावणी होत राही. फक्त काउंट् विल्हेल्म मात्र या अवज्ञेबद्दल कधींकधीं उसळी मारायचा. तो

आपल्या वरिष्ठांच्या या बाबतींतील सहनशीलतेबद्दल इतराजी दाखवून, निव्वळ थट्टेखातरच कां होईना पण एकदांतरी त्या पाद्र्याला ती घांट टण्-टण्, टण्-टण् वाजवायला लावलीच पाहिजे असा कमांडंटकडे रोज हट्ट घेई; पण ज्या अर्थी कमांडंट त्याचें मुळींच ऐकेना त्या अर्थी या दुर्लक्षाचा वचपा म्हणून तो मधून मधून वाड्यांत हे सुरुंग लावीत असे.

आणखीं कांहीं वेळ ते पांच अधिकारी ती ओलसर हवा आपल्या फुफ्फुसांत सांठवीत तेथें उभे होते, इतक्यांत फ्रिट्झ् म्हणाला, "बायकांना अखेर पावसांतच यावं लागणर असं दिसतंय" हें ऐकून ते सर्व आपापली तयारी करण्याकरितां इकडेतिकडे निघून गेले. विशेषतः कॅप्टनवर खान्याची व्यवस्था करण्याची सर्वच भिस्त होती.

अंधार पडूं लागण्याच्या बेतांत जेव्हां ते पुन्हां एकत्र भेटले तेव्हां प्रत्येक-जण विशेषच ठाकठिकीनें आपला गणवेष घालून व नट्टापट्टा करून आला असल्या-मुळें ते एकमेकांकडे पाहून गालांतल्या गालांत हंसूं लागले. कमांडंटचे केंस सकाळीं दिसत होते तितके शुभ्र दिसत नसून, कातूनकोरून दाभणकांठी केलेली कॅप्टनची मिशी त्याच्या नाकाखालीं एखादा रसरशीत निखारा चिकटविल्यासारखी दिसत होती.

पाऊस येतच होता तरी त्यांनीं खिडकी उघडीच राहूं दिली. त्यांच्या-पैकीं एकेकजण मधून मधून तिकडे जाऊन बाहेरची चाहूल घेत असे. सवासहा वाजतां लांबवर घोडागाडीची घरघर एकूं येते असें कॅप्टन्नें जाहीर केलें. ते सर्व समोरच्या दाराशीं पोहोंचले तेवढ्यांत चिखलानें माखलेले घोडे धांपा टाकीत गाडी घेऊन वाड्यासमोर येऊन थबकले. कॅप्टन्च्या शहरांतील सोब-त्याला कॉर्पोरलनें त्याची चिट्ठी नेऊन दिल्यानंतर त्यानें निवडून पाठविलेल्या पांच देखण्या मुली गाडींतून खालीं उतरल्या.

गेले तीन महिने जर्मन विजयी वीरांच्या सहवासांत घालवितांना ते आप-णांशीं नीट वागतात ही या मुलींची खात्री पटली असल्यामुळें त्यांना वाड्यांत येण्याकरितां विशेष गळ घालावी लागली नव्हती. गाडींतून येत असतांना त्यांना आपल्या शिल्लक उरलेल्या सदसद्विवेकबुद्धीची बोंचणी कमी करावीशी वाटली

म्हणूनच कीं काय, त्या म्हणाल्याही होत्या, "आपला धंदाच पडला हा; तो चालवलाच पाहिजे."

खालीं उतरल्यानंतर त्या लगेच जेवणाच्या दालनांत गेल्या. दिव्यांच्या प्रकाशांत सध्यांच्या पडक्या स्थितींत तें जास्त भेसूर दिसूं लागलें होतें, आणि टेबलावर व्यवस्थितपणें मांडून ठेवलेल्या खाद्यपदार्थांनीं भरलेल्या बशा, कांच आणि चिनीमातीचीं भांडीं, आणि जमीनदारानें पुरून ठेवलेल्या पण नंतर सांपडलेल्या, चांदीच्या कांट्यां–चमचांमुळें त्या दालनाला एखाद्या दरोडेखोरांच्या गुहेचें स्वरूप प्राप्त झाल्यासारखें वाटत होतें. कॅप्टन्‌ची तब्यत अगदीं खुष दिसत होती; एखाद्या सरावलेल्या माणसाप्रमाणें तो त्या बायांशीं लगट करीत होता. गुरें विकत घेतांना गिऱ्हाईक ज्याप्रमाणें त्यांची परीक्षा करतात तशी त्यांची परीक्षा करून त्यानें त्यांचीं चुंबनें घेतलीं; आणि त्या तिघां तरुण अधिकाऱ्यांनीं जेव्हां स्वतःकरितां एकेकीची निवड करण्याची सुरुवात केली तेव्हां त्यानें अधिकार वाणीनें त्यांना बजावून सांगितलें, " हें काम मी करणार आहे. प्रत्येकाला ज्याच्यात्याच्या इतमामाप्रमाणें यांतली एकएक मिळेल." मग त्यानें उंचीप्रमाणें त्या पांचही बायकांना एका रांगेनें उभें केलें व सर्वांत उंच बाईला विचारलें, " काय ग तुझं नांव ? "

" पॅमेला, " ती आवाज उंचावून उत्तरली.

" मग पहिल्या नंबरची पॅमेला नांवाची मुलगी कमांडंटच्या ताब्यांत, " त्यानें जाहीर केलें.

नंतर त्यानें ब्लॉंडिनाचें चुंबन घेऊन ती स्वतःची मालमत्ता असल्याचें जाहीर केलें , लठ्ठ ॲमेंडा लेफ्टनंट् ऑटोला बहाल केली, ईव्हा लेफ्ट्नंट् फ्रिट्झ्‌ला अर्पण केली आणि सर्वांत छोटी, सांवळी, काळ्या डोळ्यांची, बसक्या नाकाची रॅशेल काउंट् विल्हेल्मला बक्षीस दिली.

सार्वजनिकरीत्या दिवसानुदिवस त्याच व्यवसायांत मुरल्या असल्यामुळें या पांचही मुली देखण्या, गुबगुबीत, वैशिष्ट्यहीन चेहेरेपट्टीच्या आणि शरीरयष्टीच्या दिसत होत्या.

धाकट्या तिघां अधिकाऱ्यांनीं त्यांच्या तिघींना तोंडहात धुवून आणण्याची सबब सांगून आपणांबरोबर नेण्याचा घाट घातला, पण कॅप्टन् त्यांच्या आतुरतेचें

मूळ ओळखून असल्यामुळें त्यानें त्यांच्या इच्छेला मोडता घातला. तो म्हणाला, " सर्वजणी जशा आहेत तशाच खान्याकरतां बसूं देत, कारण एकदां कां त्या वर गेल्या कीं खालीं आल्यावर त्यांना कपडे बदलावे लागतील व एकंदरीत सगळाच गोंधळ माजेल." त्याचे अनुभवी बोल ऐकणें सर्वांना भागच होतें; शेवटीं सर्वांना आपली तहान तात्पुरती फक्त चुंबनांवरच भागविणें क्रमप्राप्त झालें.

एकाएकीं रॅशेल गुदमरल्यासारखी झाली आणि इतकी खोकूं लागली कीं तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले, आणि नाकपुड्यांतून धूर निघूं लागला. तिचा मुका घेण्याचें निमित्त करून काउंट् विल्हेल्मनें तिच्या तोंडांत आपल्या तोंडांतला चिरुटाचा भपकारा सोडून दिला होता. ती संतापली नाहीं, एक शब्ददेखील बोलली नाहीं, पण ती आपल्या मालकाकडे पहात असतांना तिच्या काळया डोळयांत एक प्रकारची घृणा आणि सूडाची सुप्त भावना दिसून येत होती.

ते सर्व जेवावयाला बसले. कमांडंट आनंदी दिसत होता. त्यानें पॅमेलाला आपल्या उजवीकडे व ब्लाँडिनाला आपल्या डावीकडे बसवून घेतलें व रुमालाची घडी उकलतांना तो म्हणाला, " तूं खरोखरच मजेदार युक्ति सुचविली, कॅप्टन्."

लेफ्ट्नंट् ऑटो आणि फ्रिट्झ् आपण गरती स्त्रियांच्या सान्निध्यांत बसलों आहोंत अशा आविर्भावानें वागत होते, पण बॅरन तर नुसता उतूं आला होता. तो सर्व बायकांकडे डोळे फाडफाडून पहात तोंडाला येईल तें अद्वातद्वा गलिच्छ बकत होता.

बॅरन्च्या दातांतल्या खिंडारांतून हवा निघून जात असल्यामुळें सुरुवातीला त्याचे शब्द त्या बायकांना नीट कळून आले नाहींत, पण त्यांना त्याच्या संभाषणाचा जसजसा सराव होऊं लागला तसतशा त्या हंसूं लागल्या. कांहीं वेळानें त्या आपल्या शेजाऱ्यांच्या अंगावर रेलून पोट धरधरून हंसूं खिदळूं लागल्या व कॅप्टन्चे शब्द त्याच्याच उच्चारांत म्हणून दाखवूं लागल्या. त्यांच्या तोंडून आपणांला ते शब्द पुनःपुन्हां ऐकावयाला मिळावे म्हणून कॅप्टन् आणखीच बकबक करूं लागला. मद्याच्या पहिल्या फेरीनंतर त्या बायका रंगांत आल्या आणि आपल्या धंद्याचीं कसबें दाखवूं लागल्या. उजवीडावीकडे प्रत्येक बाई चुंबनांची खैरात करूं लागली, अधिकाऱ्यांना चिमटे घेऊं लागली, ओरडूं लागली, प्रत्येकाच्या पेल्यांतलें उष्टें मद्य पिऊं लागली, आणि जर्मनांच्या सहवासांत राहून

शिकलेल्या त्यांच्या भाषेंतील अर्धवट लावणीवजा गाण्यांचीं कडवीं घोळून घोळून आळवूं लागली.

लगेच टेबलाभोंवतालची पुरुषमंडळी देखील दृष्टीला जेवढें दिसलें व स्पर्शानें जेवढ्याचें आकलन झालें त्या शरीरसौष्ठवानें उल्लू बनून भलतीकडेच वाहवूं लागली. ते ओरडूं लागले, त्यांनीं बशा, पेले फोडले. भिंतीशीं टेंकून उभे असलेले वाढपी लष्करी शिपाई मात्र तटस्थपणें आपलें कर्तव्य बजावीत होते. फक्त कमांडंट तेवढा स्वतःला आटोक्यांत ठेऊन वागत असलासा दिसत होता.

काउंट् विल्हेल्मनें रॅशेलला ओढून आपल्या मांडीवर बसवून घेतलें होतें. तो जसजसा भडकत चालला तसतसा कधीं तिच्या मानेवरच्या काळ्याकुरळ्या बटांचें चुंबन घेई, पाठीकडच्या कातडीच्या आणि झग्याच्या पोकळींतून बाहेर घेऊं पाहणाऱ्या तिच्या शरीराच्या सुवासाचें अवघ्राण करी, आणि लगेच कोणतें-तरी क्रूर कृत्य करण्याची हुक्की आली म्हणून, व तिला कसेंही करून छळलेंच पाहिजे हें ठरवून टाकलें म्हणून, तिचे जोरजोरानें चिमटे घेई व तिला ओरडायला भाग पाडी. तो तिला पिचकून आपल्या शरीराशीं घट्ट धरी, तिच्या ओंठांना आपले ओंठ भिडवून कितीतरी वेळ, एका दमांत, ती घाबरून जातपर्यंत तिचें राक्षसी चुंबन घेई. शेवटीं तर त्यानें तिच्या ओंठाचा आपल्या दातांनीं कडकडून चावाच घेतल्यामुळें त्यांतून जें रक्त निघालें तें हनुवटीवरून ओघळून तिच्या छातीवर सांडलें.

तिनें या दुसऱ्या खेपेलाही त्याच्याकडे नजर भिडवून पाहिलें व आपली जखम जिभेनें चाटत ती म्हणाली, "तुम्हाला याचं बक्षीस मिळेल!"

तो फक्त हंसला, कर्कशपणें हंसला, आणि म्हणाला, "मी तें घेईन!"

खाना संपत आला तेव्हां रिवाजाप्रमाणें सर्वांचे पेले मद्यानें भरल्यानंतर कमांडंट आपला पेला धरून उभा राहिला व शांत स्वरांत म्हणाला, "पाहुण्या ललनांच्या सन्मानार्थ!" तो आपलें मद्य संपवून खालीं बसला तोंच एकामागून एक प्रत्येकजण या प्रकाराची पुनरावृत्ति करूं लागला. फरक येवढाच कीं त्यानें जे संभावित शब्द उच्चारले होते त्यांच्या ऐवजीं प्रत्येकाला जे कांहीं नवे-जुने, स्वतःच्या व परक्या भाषेंतील आठवले तेवढे घाणेरडे व अश्लील शब्द त्यांनीं या प्रसंगीं वापरून घेतले. प्रत्येक खेपेला दारू पिऊन धुंद होऊन खालीं पडण्याच्या बेतांत

आलेल्या त्या बाया टाळया वाजवून व हाऽहाऽ, हीऽहीऽ, हुऽहूऽ करून आपला पिसाट आनंद प्रदर्शित करीत होत्या.

कॅप्टन् या एकंदर अश्लील कार्यक्रमाला लढवय्येपणाचें स्वरूप देण्याच्या इच्छेनें पुन्हां एकदां आपला पेला वर करून ओरडला, " आम्हीं अंतःकरणांवर विजय मिळविला त्या सन्मानार्थ ! " लगेच जर्मनीच्या काळया जंगलांतलें आस्वल, लेफ्ट्नंट् ऑटो, दारूनें तर्र होऊन ताड्दिशीं उठून उभें राहिलें, व आपला पेला उंच करून स्वदेशाभिमानानें डरकाळलें, " फ्रान्स देशांतील आमच्या विजयाच्या सन्मानार्थ ! "

त्या बायका मद्यानें भिजून निघाल्या होत्या तरी हें ऐकतांच एकदम चुप झाल्या. रॅशेलच्या अंगावर तर शहारेच आले. ती ऑटोकडे वळून म्हणाली, " हें पहा, माझ्या ओळखीचे फ्रांस देशांतील कांहीं मित्र आहेत त्यांच्यासमोर असे शब्द उच्चारण्याचा तुमचा हिय्या होणार नाहीं ! " पण हें ऐकतांच काउंट् विल्हेल्म तिला आपल्या मांडीवर जास्तच घुसळून हंसत हंसत उद्गारला, " हाःऽहाःऽ, ती तुझी मित्रमंडळी मला अजून भेटली नाहीं. आम्हीं दिसतांच ते लोक ढुंगणाला पाय लाऊन पळून जातात ! "

रॅशेल खूपच चिडली होती. ती संतापानें त्याच्या तोंडावर ओरडली, " खोटं बोलतोस, माकडा ! "

क्षणभर काउंट्नें तिच्याकडे निरखून पाहिलें. दुपारच्या वेळीं पिस्तुलानें सरदारीणच्या चित्राचे डोळे फोडतांनाही त्यानें त्या चित्राकडे असेंच पाहिलें होतें. मग तो कर्कशपणें हंसला व म्हणाला, " तुला त्यांच्याबद्दल काय म्हणायचं असेल तें म्हण, छबकडे ! पण ते जर शूर असते तर आज आम्हीं इथं राहिलों असतों कां ? " तो भडकला आणि मोठ्यानें ओरडला, " आम्हीं या देशाचे मालक आहोंत ! फ्रान्स आमचा दास आहे ! " रॅशेल टुण्दिशीं उडी मारून त्याच्या मांडीवरून खालीं उतरून आपल्या खुर्चीवर बसली, व तो उठला आणि आपला पेला उंच धरून म्हणाला, " फ्रान्स आणि फ्रान्सचे नागरिक, फ्रान्सचीं जंगलं, शेती, घरं, हीं सर्व आमची मालमत्ता आहे ! "

इतर चौघे अधिकारी अगदीं बेशुद्ध होण्याच्या बेतांत आले होते तरीही त्यांच्या अंगांत हें ऐकून लष्करी, पाशवी वारें शिरलें, आणि आपापले पेले उंचावून

ते ओरडले, "जर्मन पितृभूमीचा सदा विजय असो!" त्यांनीं आपापल्या मद्याचा एकच घोंट करून टाकला.

त्या मुली या प्रकाराला कोणत्याच तऱ्हेनें अडथळा करीत नव्हत्या. त्या भ्याल्या होत्या व त्यांची वाचा बंद झाली होती. रॅशेलला उत्तर देण्यासारखें कांहीं न सांपडल्यामुळें ती सुद्धां उगी होऊन बसली होती काउंट विल्हेल्मनें आपला भरलेला पेला तिच्या डोक्यावर टेंकला व तो ओरडला, "फ्रान्सच्या सर्व स्त्रियादेखील आमच्या मालकीच्या आहेत!"

हें ऐकतांच रॅशेल ताड्कन् उठून उभी राहिली तों पेल्यांतलें तांबूस मद्य तिच्या डोक्यावर सांडून अंगावर ओघळलें. पेला खालीं पडून चुराचुरा झाला. थरथरत्या ओंठांनीं आणि जळजळीत नजरेनें ती विल्हेल्मकडे पाहूं लागली आणि तो हंसत असतांच तिच्या तोंडून संतापानें एकएक शद्ब बाहेर पडूं लागला, "तें-हें-अगदींच-खरं-नाहीं,--कारण--तुला--तुम्हांला—एकही-फ्रेंच स्त्री—मिळणार नाहीं!"

विल्हेल्म आपल्या खुर्चीवर बसला व पुन्हां हंसला. तो तिला चिडवीत म्हणाला, "फारच छान! बहोत ठीक!-मग रांडांनों, तुम्हीं इथं कशाकरतां आलांत?"

तिला धक्काच बसल्यासारखें झालें. त्याच्या बोलण्याचा आशय तिच्या लक्षांत एकाएकीं न आल्यामुळें तिनें बावरून त्याला उत्तर दिलें नाहीं, पण त्याचा अर्थ तिला समजून येतांच ती तावातावानें उद्गारली, "मी-मी-स्त्री नाहीं,-नुसती एक-छिनाल आहें.—आणि तुम्हां जर्मन कुतऱ्यांना अशा कुत्र्याच पाहिजे असतात!"

तिचें वाक्य संपतांक्षणींच विल्हेल्मनें खाड्दिशीं एक थप्पड तिच्या मुस्कटांत ठेऊन दिली. पण तो दुसरी मारण्याकरितां हात उगारणार तोंच रॅशेलनें विचार न करतां, टेबलावर हाताशेजारीं दिसली ती सुरी उचलून, जोरानें त्याच्या गळयाखालीं खुपसली. तो जें कांहीं बोलणार असेल तें त्याच्या नरड्यांतच जिरलें. अर्धवट उघडें तोंड करून व बुबुळें फिरवून तो खुर्चीवर मागें लवंडला.

सर्व अधिकारी तें भयानक दृश्य पाहून ओरडले व झट्कन् उभे राहिले. आणि ऑटो तिच्या रोखानें येत होता त्याला त्याच्या पायांत खुर्ची ढकलून

पाडल्यावर ती खिडकीकडे धांवली, कुणीं तिला अडविण्याआधीं तिनें ती उघडली व उडी मारून पावसांत आणि अंधारांत ती नाहींशी झाली.

दोन मिनिटांत सब् लेफ्टनंट् काउंट् विल्हेल्म फॉन् आय्रिक् गतप्राण झाला. फ्रिट्झ् आणि ऑटो आपल्या तलवारी बाहेर काढून पायाशीं लोळण घेणाऱ्या दोघां बायकांचीं खांडकींच करणार होते, पण कमांडंटनें त्यांची पराकाष्टेनें समजूत घालून त्या चार बायकांना एका खोलींत कैद करून ठेवण्याचा हुकूम दिला. मग त्यानें पळून गेलेल्या रॅशेलला पकडून आणण्यासंबंधीं आपल्या लष्करी शिपायांना भराभर हुकूम सोडून बाहेर पिटाळलें. ती सांपडणारच ही त्याची खात्री होती.

ताबडतोब स्वच्छ करून टाकलेल्या टेबलावर विल्हेल्मचें उताणें प्रेत ठेवण्यांत आलें, आणि ते चौघे अधिकारी चेहेरे गंभीर करून खिडकींतून बाहेर पाहूं लागले. एकाएकीं एक बार ऐकूं आला, मग लांब कुठेंतरी दुसरा ऐकूं आला, आणि लागोपाठ चार तास त्यांना मधून मधून, जवळ किंवा लांब, बंदुकांचे आणि पिस्तुलांचे बार ऐकूं येत होते. जर्मन भाषेंत ओरडून बोललेले शब्दही त्यांच्या कानांवर मधून मधून येत.

शोधाकरितां पाठविलेले शिपाई सकाळीं परत आले. रात्रीं अंधारांत एकमेकांची नीट ओळख न पटल्यामुळें व पकडण्याच्या धुंदींत, दोन शिपाई मेले व तीन घायाळ झाले होते. पण त्यांना रॅशेल हातीं लागली नाहीं.

नंतर त्या प्रांतांतील रहिवाश्यांना खूपच हैराण करण्यांत आलें, पण इतकेंही करून त्या मुलीचा मागमूस लागला नाहीं तो नाहींच.

जेव्हां ही हकीकत जनरलच्या कानीं गेली तेव्हां त्यानें हें प्रकरण जेथल्या-तेथेंच दाबून टाकून लष्कराला अशा प्रकारचा वाईट धडा न देण्याचा हुकूम सोडला. त्यानें जेव्हां कमांडंटला चांगलेंच चापलें तेव्हां कमांडंटनेंही आपल्या कनिष्ठांना तडाखून तंबी दिली. जनरलचें म्हणणें होतें, "आपण लढाईवर जातों ते चैन करण्याकरतां आणि वेश्यांना चुचकारण्याकरतां नव्हे !"

ग्रॅफ् फॉन् फार्ल्सबर्गनें चिडून जाऊन त्या प्रांतावर सूड उगविण्याचें ठरविलें. आणि आपणांला कांहीं निमित्त हवें म्हणून त्या गांवच्या धर्मोपदेशकाला बोलावून

काउंट् फॉन् आयरिक्च्या अंत्यविधीच्या प्रसंगीं प्रार्थनामंदिरांतली घांट वाजविण्याचा त्यानें त्याला हुकूम दिला.

पण कमांडंटच्या अपेक्षेविरुद्ध त्या पाद्र्यानें आडकाठी तर केली नाहींच, उलट त्याच्या हुकुमाच्या अंमलबजावणीबद्दल तत्परताच दाखविली. आणि ज्या वेळीं लष्कराच्या चालत्या पहाऱ्यांत काउंट् विल्हेल्मची शवपेटी वाड्यांतून कबरस्थानाकडे जायला निघाली तेव्हां ती चर्चमध्यें पोहोंचतपर्यंत मोठी घांट जणूं काय जिवंत होऊनच ठण्-ठण्, ठण् ठण् असा एकसारखा आवाज करीत राहिली.

रात्रीं घांट पुन्हां वाजली, दुसरे दिवशींही वाजली, रोज रोज वाजूं लागली. कधीं कधीं ती रात्रीं भलत्याच वेळीं वाजूं लागत असे, आणि तिच्या ध्वनींत आनंद प्रतीत होत असल्याचा भास होई. शेजारच्या शेतकऱ्यांना तो एक चमत्कार वाटे, आणि त्या धर्मोपदेशकाशिवाय कुणीही त्या घांटेच्या खोलींत जाण्याचा हिंम्या करीना.

कारण तिथे एकांतवासांत ठेंगणीशी, सांवळी, काळ्या डोळ्यांची, बसक्या नाकाची एक मुलगी दिवस घालवीत होती तिला तो पाद्री रोज चोरून अन्नपाणी नेऊन देत असे.

---

# खेळाडू-

त्या थिएटरच्या मॅनेजरनें आज तीन महिने झाले एक नाचणारी बाई बोलावून तिचे खेळ व नृत्य लोकांना दाखवून जो कांहीं नफा कमाविला होता तो आतां संपुष्टांत आला असल्यामुळें, जवळ होती नव्हती तेवढी शिल्लक रक्कम पणाला लावून मॉंटेफायर-बंधूंचे खेळ दाखविण्याचें धाडस करून पाहण्याचें ठरविलें. एक आठवडा शहरांतील भिंती, दुकानें, झाडेंसुद्धां दोघां तरुण खेळाडूंच्या वेगवेगळ्या प्रकारच्या चित्रांच्या जाहिरातींनीं फुलून गेलीं होतीं. ज्याच्यात्याच्या तोंडीं या दोघां भावांचे थिएटरमधील खेळ कसे काय प्रेक्षणीय होतील हा एकच विषय ऐकूं येत होता.

या खेळाडूंच्या खेळांतील नाविन्यामुळें आणि धाडसामुळें लोकांना चटका लागून राहिला होता, पण रविवारपर्यंत धीर धरणें भाग होतें. त्या खेळांत मरणाची भीति होती, रक्त सांडण्याची शक्यता होती; एकंदरींत लोकांचीं मनें खळबळून टाकण्याचें सामर्थ्य होतें असें जाहिरातींवरून वाटे. ते दोघे मृत्यूला हंसत आपले खेळ करीत हें ऐकून स्त्रियांना तर गुदगुल्याच होऊं लागल्या होत्या; कारण भीतीनें दचकायचें आणि असामान्य धैर्याला बळी पडायचें हा स्त्रीचा स्वभावधर्मच आहे !

याचा परिणाम म्हणजे कुणीं प्रत्यक्ष खेळ पाहिलेला नसतांही रविवारच्या पहिल्या प्रयोगाचीं तिकिटें अगाऊच खपून गेलीं होतीं. मॅनेजरचें भांडवल नुसत्या जाहिरातीनें त्याच्या खिशांत परत आलें होतें.

* * *

काउंटेस् रेगीना व्हिलेरबी आपल्या दिवाणखान्यांतल्या कोंचावर रेलून हातपंख्यानें हळूं हळूं वारा घेण्याचा चाळा करीत होती. तिच्या भोंवतीं तिचे तिघे निवडक मित्र मॉंटॅल्विन्, टॉम् आणि तिची आतेबहीण मॅडम् व्हूल बसून गप्पा छाटीत होते. संध्याकाळ झाली होती आणि दिवे लागण्यापूर्वी गोष्टी ऐन रंगांत आल्या होत्या.

पंख्यानें मॉंटॅल्विनच्या हातावर हळूंच आघात करीत काउंटेसनें म्हटलें, "तुम्हीं चहा टाकतां ना कपांत ?" कारण तो हळूंहळूं तिच्या कानांशेजारीं गुजगोष्टी करण्याच्या बेतांत येऊं पहात होता. तो जागा झाल्यासारखा होऊन चहा ओतूं लागला तेव्हां काउंटेस् जरा मोठ्यानेंच म्हणाली, " या वर्तमानपत्रांतून मारे तारीफ चालली आहे तसे खरोखरच कां हे मॉंटेफायर–बंधू कसबी आहेत ?"

टॉम् लगेच उत्तरला, " आपण नाहीं बुवा असं धाडस पूर्वी कधीं पाहिलं ! भीतीनं आणि धास्तीनं नुसते रोमांच उठतात अंगावर !"

हें ऐकत असतांना काउंटेस् एका गुलाबाच्या पाकळया आपल्या शुभ्र दांतांनीं खुडत होती.

" मला पहायला मिळेल तर काय बहार होईल !" मॅडम्‌व्हूल उद्गारली,

" पण, मॅडम् , दुर्दैव आपलं," काउंटेस् गंभीर स्वरांत म्हणाली, " या अशा चटोर खेळांना आपल्यासारख्या घरंदाज स्त्रियांना जातां येत नाहीं !"

सर्वांना तिचें म्हणणें पटलें.

तरीही दोन दिवसांनंतरच्या खेळाला बुरखा घेऊन स्वतंत्र बॉक्समध्यें एकटीच काउंटेस् खेळ पहायला हजर होती.

काउंटेस् कठोरहृदयी स्त्री होती. तिनें शाळा सोडतांच काउंट व्हिलेरबीवर प्रेम बसलें नसतांना, किंवा त्याच्याबद्दल आवड वाटत नसतां देखील त्याच्या मोठेपणाकरितां त्याच्याशीं लग्न लावलें होतें. तिला समाजांत अतिशय मान मिळाला होता, आणि ती आपल्या इभ्रतीला शोभेल अशा वृत्तीनें रहात असल्या-मुळें लोक तिला फार सुशील समजत असत.

खेळ पहात असतांना काउंटेस् अननुभूत भावनांनीं थरारून राहिली होती. तिनें आपल्या नाजुक हातांच्या मुठी वळल्या होत्या व डोळयांत प्राण आणून ती आळीपाळीनें त्या दोघां भावांकडे पाहून त्यांची तुलना करीत होती.

*　　　*　　　*

काउंट् व्हिलेरबी कामानिमित्त दौऱ्यावर गेले होते, आणि त्या दिवशीं रात्रीं काउंटेस् रेगीना दुसऱ्यांदां खेळ पहावयाला गेली. तिच्या विषयवासनांना ऊत आला होता, आणि खेळ संपण्याच्या बेतांत आला तेव्हां तिनें एका चिठ्ठीवर खालील मजकूर लिहिला आणि गेटकीपरच्या हातून ती मॉंटेफायर-बंधूंपैकीं जो पिस्तूलबहाद्दर होता त्याला देण्याकरितां पाठवून दिली.

" खेळानंतर थिएटरच्या मागच्या दारीं तुमच्याकरितां एक मोटार उभी राहील.-तुमच्यावर भाळलेली एक अज्ञात स्त्री. "

ती त्या भाड्याच्या मोटारींत बसून नाहीं नाहीं ते विचार करूं लागली. तिचे मनोविकार उफाळून वर येऊं पहात होते, तर भीति, घृणा आणि ड्रायव्ह-रला घरचा पत्ता सांगण्याच्या चोरटेपणाच्या कल्पना तिच्या अंगावर शहारे आणत होत्या. पण डोळयांत जीव एकवटून ती त्या दाराकडे टक लावून पहात होती, आणि एकामागून एक बाहेर निघणाऱ्या थिएटरांतील नोकरांकडे पहात आतुरतेनें पाऊल टक्टक् करीत होती.

ही निवळ थट्टा असावी या भावनेनें जेव्हां तो पिस्तूलबहाद्दर खेळाडू दारांतून बाहेर निघाला तेव्हां तिच्या तोंडाला खीळ बसल्यासारखी झाली, कारण आडमार्गानें मिळविलेलें विषयसुख भेसळ झालेल्या दारूसारखें मादक असतें. ती मोटार प्रत्यक्ष पाहतांच त्याला तिच्यांतील व्यक्ति एखादी अशीच भुकेलेली धंदेवाईक स्त्री असावी असें आधीं वाटलें.

तो आंत बसल्यावर काउंटेस् त्याला खेटून बसली आणि आपलें सौंदर्य व तारुण्य त्यानें निरखून पहावें म्हणून तिनें बुरखा वर केला. लढवय्ये कुस्तीच्या सुरुवातीला कांहीं न बोलतां जसे एकमेकांना निरखून पाहतात तसे ते दोघे चकार शब्द न बोलतां परस्परांकडे पाहूं लागले. तिला मात्र स्वतःला त्याच्या बाहूंत कवटाळून घेण्याची घाई झाली होती, आणि शीलविसर्जन केल्यानंतर नैतिक अस्वच्छता कशी काय असते याचा आपल्या नवऱ्याची इतके दिवस एकनिष्ठ पत्नी म्हणून राहिली असल्यामुळें जो अनुभव मिळाला नव्हता, तो चाखण्याची आतुरता लागली होती. तरीपण संकेतस्थलांतील खोलींतून परस्परांच्या विषयाधीन सहवासांत कांहीं तास घालविल्यानंतर जेव्हां तो बाहेर निघाला तेव्हां रेंगाळत व लटपटतच, पण काउंटेस् एखाद्या देवालयांतून बाहेर यावी तशा धिमेपणानें आणि तेजःपुंज मुद्रेनें बाहेर आली.

मग तिनें दुसऱ्या मॉंटेफायर-भावाशीं संबंध घडवून आणला. तो फारच भावनाशील असून त्याच्या डोक्यांत रोमान्सच्या कल्पना नेहमीं खेळत असत. काउंटेस् वास्तविक त्याच्याशीं आपल्या इच्छातृप्तीच्या लहरीसाठीं खेळत असतां, ही अज्ञात स्त्री आपणांवर जिवाभावानें प्रेमच करीत आहे असें त्याला वाटून, तिच्याशीं होत असलेल्या चोरट्या भेटीगांठींनीं त्याचें समाधान होईना. त्यानें तिला या बाबतींत बरेचदां विचारून पाहिलें, पण ती प्रत्येक वेळीं त्याचें म्हणणें हंशावारी नेई.

तिनें त्या दोघां भावांच्या पाळया बांधून दिल्या होत्या. या व्यवस्थेचा त्यांना पत्ता नव्हता. कारण तिच्याबद्दल एकमेकांना कांहीं न सांगण्याच्या शपथांनीं तिनें त्यांना वचनबद्ध करून घेतलें होतें; तसें झालेंच तर आपण पुन्हां त्यांचें तोंड पाहणार नाहीं अशी दहशत घातली होती.

एके रात्रीं धाकटा भाऊ तिच्या पायाशीं बसला असतां म्हणाला, " तुम्हीं माझ्यावर प्रेम करतां आणि मी तुम्हांला हवासा वाटतों हा खरोखर तुमचा दयाळूपणा आहे. मला वाटायचं कीं अशा प्रकारचं सौख्य फक्त कादंबऱ्या-नाटकांतूनच पहायला मिळतं, आणि व्यवहारांत मात्र तुमच्यासारख्या पिढीजात घरंदाज स्त्रिया आम्हां नाटकां-थिएटरांत काम करणाऱ्या भटक्या गराबांची चेष्टामस्करीच करीत असतात ! "

काउंटेसच्या कपाळाला आंठ्या पडल्या.

" तुम्हीं राग येऊं देऊं नका, " तो म्हणाला. " तुम्हीं कुठं राहतां, तुमचं खरं नांव काय, तुम्ही काउंटेस् असून खूपखूप श्रीमंत आहांत, हा सर्व पत्ता मीं जातीनं काढून ठेवला. "

" मूर्ख मनुष्या ! " ती संतापानें थरथरत बोलली, " एखाद्या लहान मुलाची समजूत घालतात तशी लोकांनीं थापा मारून तूं सांगतोस तशी तुझी समजूत करून दिली, झालं ! "

आतां यापुढें तिला त्याच्याशीं संबंध ठेवणें अशक्य होतें. त्यानें तिच्या नांवाची माहिती काढली होती, आणि त्यामुळें तो वाटेल तें करूं शकणार ! तो तिच्यावर आतां प्रेम करूं लागला होता आणि काउंट व्हिलेग्बी तर लवकरच दौऱ्यावरून परत येणार होते. ती जरी आपल्या नाजुक बोटाच्या इषाऱ्यानें त्यांना नमवूं शकत होती तरी तिला आतां त्या दोघांबद्दल कांहींच वाटेनासें झालें. शिवाय, तिला त्याच त्या माणसांचा कंटाळाही येऊं लागला होता, आणि आपला शौक पुरविण्याकरितां नवें कुरण पाहिजे होतें.

दुसरे दिवशीं रात्रीं ती पिस्तूलबहाद्दर भावाला म्हणाली, " मला तुझ्यापासून कांहीं लपवून ठेवायचं नाहीं. मला तुझा धाकटा भाऊ आवडतो, आणि मी त्याची झाली आहे. आतां मला तुझा संबंध नकोसा वाटतो. "

" माझा भाऊ ! " तो पुटपुटला.

" मग काय झालं ? मला हा बदल केल्यामुळें मजा वाटते. "

" चांडाळणी ! " असें म्हणून त्यानें हाताच्या मुठी वळल्या व तो तिच्या अंगावर धांवून गेला. तिला वाटलें हा आतां आपणांला मारणार; तिनें डोळे मिटले. पण ज्या कोमल शरीराला त्यानें इतके दिवस कवटाळून सर्व विलास केले होते त्या शरीराला दुखावण्याचा हिय्या त्याला झाला नाहीं. तो खिन्न होऊन मान खालीं घालून, घोगऱ्या आवाजांत म्हणाला, " ठीक आहे. तुमची तशी इच्छा आहे तर यापुढं आपली भेट होणार नाहीं ! "

* * *

थिएटर आज प्रेक्षकांनीं खचून भरलें होतें. पडद्याआडून वाद्यांचे सूर ऐकूं येत होते, आणि रंगभूमीवर मात्र पिस्तुलाचे " ठो,-ठो, " बार होत होते.

मॉंटेफायर-बंधू एकमेकांसमोर उभे होते. त्यांच्यांत चाळीस फूट अंतर होतें. धाकट्याच्या शरीरावर विजेच्या प्रकाशाचा झोत सोडण्यांत आला होता;

तो एका पांढऱ्याशुभ्र तक्त्यासमोर स्तब्ध उभा होता, आणि समोरून पिस्तुलांतील एकएक गोळी झाडून वडील भाऊ त्याच्या शरीराची बाह्यरेषा त्या तक्त्यावर आंखत होता. तो अगदीं बिनचूकपणें आणि विलक्षण कुशलतेनें गोळी मागून गोळी झाडत होता, आणि तक्त्यावरचा एकएक काळा ठिपका त्याच्या अचूक नेमाची साक्ष देत होता. लोक मधूनमधून टाळया वाजवीत होते, आणि त्यांच्या 'वाहवा !—शाबास !' या उद्गारांमुळें संगीत ऐकूं येईनासें झालें होतें. इतक्यांत एकाएकीं रंगभूमीवर एक किंकाळी या टोंकापासून त्या टोंकापर्यंत ऐकूं आली. प्रेक्षकांपैकीं काहीं स्त्रिया बेशुद्ध झाल्या, संगीत बंद पडलें, आणि प्रेक्षक एकमेकांना डिंवचूं लागले.

पिस्तुलाच्या नवव्या बारासरशीं धाकटा मॉंटेफायर गतःप्राण होऊन खालीं कोसळला; त्याच्या कपाळाच्या मधोमध झालेल्या जखमेंतून रक्त वाहात होतें. त्याचा वडील भाऊ निःस्तब्ध उभा होता, आणि त्याच्या नजरेंत एक प्रकारच्या वेडेपणाचा आभास दिसत होता. काउंटेस् रेगीना व्हिलेरबी मात्र आपल्या बॉक्समध्यें बसल्याबसल्या कठड्यावर रेलून आपल्या हातपंख्यानें शांतपणें वारा घेत होती. तिला पाहतांच पुरातनकालीन पुराणांतल्या एखाद्या क्रूर देवीची आठवण होई.

दुसरे दिवशीं तिच्या दिवाणखान्यांत तिची नेहमींची तीनचार स्नेही मंडळी बसली होती, तेव्हां सरावाप्रमाणें कोंचावर रेलून हातपंख्यानें हळूंहळूं वारा घेण्याचा चाळा करीत ती उद्गारली, " काल म्हणे थिएटरांत कसला अपघात झाला, आणि त्या दोघांपैकीं एक प्रख्यात खेळाडू मॉंटा,—मॉंटी—, काय बरं त्याचं नांव, टॉम् ?"

" मॉंटेफायर, काउंटेस्. "

आणि लगेच या खेळांमुळें थिएटरच्या मॅनेजरला किती उत्पन्न झालें असावें याबद्दल त्या मित्रांत चर्चा सुरूं झाली.

---

# अपमान-

पेट्रोलच्या तुटवड्यामुळें स्वातीच्या घरची मोटार तबेल्यांत पडून होती आणि दोन दिवस झाले तिच्या घरीं नवीन बग्गी व घोडा खरेदी केला होता. त्या दिवशीं स्वाती आपल्या एका मैत्रिणीबरोबर फिरायला निघाली होती. कोचवान ऐटींत बसून नव्या घोड्याला हांकलीत होता.

बग्गीसारख्या हवाशीर मोकळ्या वाहनांत बसून माफक गतीनें आजूबाजूचीं दृश्यें पहात फिरण्याचा अनुभव त्यांना अभिनव वाटत होता. बग्गी गांवाबाहेर आली. संध्याकाळची वेळ होती. रस्त्यालगतच्या शेतांत धान्याचीं रोपें ऐटीनें डुलत होतीं. "किती मजेदार दिसतो हा सूर्यास्ताच्या वेळचा देखावा!" स्वाती उद्गारली. " सर्वच कांहीं आल्हादकारक वाटतं, नाहीं कां ग, रोहिणी ? "

" हो, आहे खरं तसं, " रोहिणी उत्तरली. " पण, बाई, तरी देखील कांहींतरी उणीव भासतेच. "

" काय पाहिजेसं वाटतं ?-माझ्याबद्दल म्हणशील तर मी अगदीं आनंदांत आहे. मला कांऽहीं नको, " स्वाती म्हणाली.

" असं ? तुला भास होतो आहे तसा. कारण आपल्या शरीराला कितीही सुखसोयी लाभत असल्या तरी आपल्या मनाकरतां आपणांला कशाचीतरी जरूर भासतेच. "

स्वातीला हंसूं आलें. " प्रेमाची ? " ती म्हणाली.

" हो. "

त्या थोडा वेळ स्तब्ध बसल्या होत्या. मग रोहिणी म्हणाली, " प्रेमाच्या आधाराशिवाय मला आयुष्य अपुरं वाटतं. माझ्यावर कुणींतरी प्रेम करायला पाहिजे, मग तो एखादा कुत्रा कां असेना ! आणि तूं कांहींही म्हण, स्वाती, पण आपणां सर्वांची गति तीच आहे, बाई. "

" मला नाहीं वाटत तसं. कुठल्याही सर्वसाधारण माणसानं माझ्यावर प्रेम करावं अशी माझी इच्छा नसते.-त्यापेक्षां कुणीं प्रेम न केलेलं मला परवडेल. तुला काय वाटतं, माझा प्रियकर कुणी—"

स्वातीनें इकडेतिकडे कुणीं दिसतो कीं काय तें पाहिलें, पण तिच्या दृष्टिपथांत क्षितिजापर्यंत कुणीच मनुष्यप्राणी आढळेना. इकडून तिकडे मान वळ-

वितांना मात्र तिची नजर समोरच्या उंच आसनावर घोडा हांकीत बसलेल्या कोचमनावर खिळली. तिनें एकदम आपलें वाक्य पुरें केलें, " कुणी-माझा कोचमन असावा असं मला वाटेल ? " आणि ती हंसली.

रोहिणीनें स्मित केलें. ती म्हणाली, " मी खात्रीनं सांगतें आपल्या नोकरांकडून प्रेम करवून घेणं फार मजेदार असतं. माझा या बाबतींत दोनतीनदांचा अनुभव तसा आहे. ते लोक डोळेबिळे असे कांहीं विचित्रपणानं फिरवितात कीं हंसून हंसून पोट दुखूं लागतं. स्वाभाविकतःच जसजसे आपण प्रेमांत गुरफटूं लागतों तसतसं आपणांला कठोरही व्हावं लागतं, नाहींतर आपलं रहस्य जर कुणाच्या लक्षांत आलं तर थोड्याशा कारणांकरतां आपली फजीती व्हायची ! "

स्वाती समोर नजर करून ऐकत होती. ती म्हणाली, " माझ्या नोकरानं फक्त माझ्या पायाशीं लोळण घेतलेलं मला पुरेसं वाटणार नाहीं.-पण काय ग, तुझ्यावर त्याचं प्रेम आहे हें तुला कसं कळतं ? "

" हात्तेच्या ! अग, जशीं इतर माणसं तसेच ते देखील ! ते इतके उल्लू बनतात ! "

" प्रेम करीत असलेले लोक मला तर उल्लू दिसत नसतात, गडे. "

" अग उल्लूच काय, बेवकूफ असतात ! त्यांना गप्पागोष्टी करतां येत नाहींत, उत्तरं देतां येत नाहींत, किंवा नीट विचारही करतां येत नाहीं. "

" आणि तूं स्वतःबद्दल नाहीं कांहीं सांगितलं तें ? तुझ्या नोकरानं तुझ्यावर प्रेम केलं तेव्हां तुझ्यावर काय परिणाम झाला ? तुला त्याची कींव आली कीं खुशामत करवून घ्यावंसं वाटलं ? "

" कींव ?-ऊं हूं. खुशामत म्हणशील तर, पुरुष, मग तो कुणीही असेना कां, त्याची खुशामत आपणांला प्रियच असणार ! "

" काय तरी बोलतेस, रोहिणी ? "

" मी खरं तेंच सांगतें ग, बाई.-कश ला ? माझा एक विचित्र अनुभवच मी तुला सांगतें. तो ऐकून आपण कशा विचित्र परिस्थितींत सांपडतो तें तुला कळेल.

" आज चार वर्षांपूर्वीची हिंवाळ्यांतली गोष्ट आहे. माझ्याकडे एकही दासी नव्हती. मीं लागोपाठ चारपांच बायांना कांहीं दिवस ठेऊन त्या माझ्या पसंतीला उतरल्या नाहींत म्हणून हांकलून लावलं. मी अगदीं हताश झालें होतें, तों एके दिवशीं वर्तमानपत्रांत एक जाहिरात माझ्या नजरेस पडली एक तरुण मुलगी,

शिवणकाम व कशीद्यांत तरबेज, वेणीफणी वगैरे करण्यांत हातखंडा, थोडीशी शिकलेली, जवळ एका चांगल्या संभावित कुटुंबाचं सर्टिफिकेट असलेली अशी–नोकरीच्या शोधांत होती. मीं तिच्या पत्त्यावर पत्र घातलं, आणि तिसरे दिवशीं ती माझ्या घरीं आली. ती किंचित् उंचशी आणि रोड असून, फिक्कट चेहेऱ्याची आणि भीरु अशी मला भासली. तिचे काळे डोळे फारच सुंदर होते, रंग मोहक होता. आणि पाहतांक्षणींच ती मला आवडली. मीं तिचं सर्टिफिकेट मागतांच गेलीं दहा वर्षं परगांवीं एका कुटुंबांत इमानेइतबारें काम केल्याचा दाखला तिनं मला वाचायला दिला.

" दाखल्यांत तिच्या कामसूपणाची तारीफ केली होती, पण ती किंचित् नखरेल आहे असा उल्लेख केला होता.

" हें शेवटचं विधान वाचून मला हंसूं आलं, पण मीं तिला ताबडतोब नोकरीवर ठेवलं असं सांगितलं. ती त्याच दिवसापासून कामावर रुजूं झाली. तिचं नांव जाई असं तिनं सांगितलं.

" ती माझी वेणी मला पाहिजे तशी घाली व माझे कपडे बेमालूम दुरुस्त करून देई. मला तिच्या कौशल्याची तारीफ वाटे. आतांपर्यंत माझ्या इतक्या दासी झाल्या, पण कुणींच मला इतकं खुष केलं नव्हतं.

" मला कपडे ती झटपट आणि हलक्या हातानं घालायला मदत करी. माझ्या कातडीला तिचीं बोटं कधीं शिवत नसत, आणि मलाही त्या गोष्टीची फार चीड आहे. मी अगदीं न कळत तिच्या हातून आरामशीरपणें सर्व कपडे घालवून घ्यायची ऐदी संवय लाऊन घेतली. ती उंच, भीरु छोकरी हें सर्व लाजत लाजत आणि मुक्यानं करायची. माझ्या आंघोळीनंतर मी सोफ्यावर रेलून पडली असतां ती माझं शरीर रगडून देत असे व मालिश करीत असे. थोडक्यांत, गरीबींत दिवस काढत असलेली ती आपली एक मैत्रीणच आहे असं मला वाटूं लागलं. ती मला आपली नोकर म्हणून वाटेना.

" एके दिवशीं सकाळीं आमचा दरवान दबकत दबकत मला कांहीं सांगायचं आहे असं म्हणत माझ्याकडे आला मला ते दबकणं जरा चमत्कारिक वाटलं; तो माझ्या नवऱ्याचा गेल्या लढाईवरचा नोकर होता.

" त्यानं आंवढा गिळला आणि तो पुटपुटला, ' पोलिस सुपरिंटेंडंट खालीं आले आहेत, बाईसाहेब. '

" ' मग त्यांना काय पाहिजे ? ' मीं विचारलं.

" ' ते म्हणतात त्यांना आपल्या घराची झडती घ्यायची आहे. '

" पोलिसखातं आपल्याकरतां आवश्यक असतं हें मला पटतं, तरी पण मला तो व्यवसाय उच्च दर्जाचा वाटत नाहीं. मीं जरा चिडल्यासारखं विचारलं, ' इथं तपास काढायची जरूर ? आपल्याकडे कांहीं चोरी झाली नाहीं ! '

" दरवान म्हणाला, ' सुपरिंटेंडंट साहेबांना वाटतं कीं इथंच कुठं एक गुन्हेगार लपलेला असावा. '

" मला हें ऐकून थोडी भीति वाटूं लागली, आणि मीं सुपरिंटेंडंटना वर पाठवून द्यायला सांगितलं. तो अगदीं ठाकठीक पोषाख केलेला संभावित अधिकारी दिसत असून त्याच्या कोटावर गेल्या लढाईत कमाविलेलं एक पदक खोंचलेलं होतं. त्यानं अगोदर माझी माफी मागितली, आणि मला बजावून सांगितलं कीं, माझ्या नोकरमाणसांपैकीं एकजण तुरुंगांतून पळून आलेला कैदी आहे.

" मला धक्काच बसला. माझ्या सर्व नोकरांची हमी देण्याची माझी तयारी असल्याचं सांगून वाटल्यास त्याच्या समाधानाकरतां मी त्यांची नांवनिशी सुद्धां सांगेन असं म्हणालें. ' आमचा दरवान गणू, एक जुना लष्करी शिपाई, ' मीं सुरुवात केली.

" ' तो नव्हे, ' सुपरिंटेंडंट उत्तरला.

" ' आमचा ड्रायव्हर, जोगीसिंग, माझ्या वडिलांच्या एका शेतकऱ्याचा मुलगा. '

" ' तोही नाहीं. '

" ' वरकाम करणारा एक छोकरा, आमच्या जहागिरीवरच्या माझ्या विश्वासांतल्या एका शेतकऱ्याचा मुलगा. आणि त्याचा मदतनीस दुसरा पोऱ्या, तुम्हीं त्याला खालीं पाहिलंच असेल. '

" ' यांपैकीं कुणीच नाहीं. '

" ' मग मी म्हणतें तुम्हांला कुणीतरी चकवलं खास ! '

" ' माफ करा, बाईसाहेब, पण मला कुणीं चकवलं नाहीं अशी माझी खात्री आहे. त्याचा चेहेरा व अंगलट एखाद्या गुन्हेगारासारखी नसल्यामुळं तुम्हीं एक गोष्ट करूं शकाल ? इथं आपल्यासमोर तुमच्या सर्व,–झाडून सगळ्या,–नोकरांना बोलवाल काय ? '

" मी जरा बुचकळयांत पडलें, पण धीर धरून आपल्या सर्व गडीमाणसांना,–स्त्री आणि पुरुष दोघांनांही,–वर बोलावलं.

" सुपरिंटेंडंटनं सर्वांकडे एका नजरेनं पाहिलं आणि तो म्हणाला, ' सर्व आले नाहींत. '

" ' माफ करा, ' मी म्हणालें, ' माझी खाजगी दासी वगळून माझे इतकेच नोकर आहेत. आणि तिला गुन्हेगार ठरविणं म्हणजे—'

" ' मी तिला पाहूं शकेन काय ? '

" ' हो तर, त्यांत काय हरकत आहे ? '

" मीं घंटा वाजविली. लगेच जाई माझ्यासमोर येऊन उभी राहिली. ती उभी राहण्याचाच अवकाश, सुपरिंटेंडंटनं खूण केली, आणि मला न कळत दारामागं उभे असलेले दोन पोलिस पुढं झाले, त्यांनीं तिला धरलं, आणि तिचे हात बांधले.

" मी किंचाळलें आणि तिला सोडवायला उभी राहिलें. सुपरिंटेंडंटनं मला बसायकरतां खूण केली. ' बाईसाहेब, ही मुलगी म्हणजे रतीलाल छबिलदास नांवाचा एक मनुष्य आहे. जबरीसंभोग करून मग खून केल्याच्या आरोपावरून याला फांशीची शिक्षा झाली होती, पण ती मागाहून जन्मठेपेची करण्यांत आली. याला तुरुंगांतून फरारी होऊन आज चार महिने होतात. आम्हीं तेव्हांपासून याच्या शोधांत आहोंत.' तो म्हणाला.

" मला वाईट वाटलं. माझी वाचाच बंद झाली. माझा विश्वास पटेना. सुपरिंटेंडंट हंसत पुढं म्हणाला, ' मी फक्त एकच खूण तुम्हांला सांगतों. याच्या पोटावर गोंदलेलं आहे.' जाईचं पोट एका शिपायानं उघडं करून पाहिलं तों तें खरं होतं. सुपरिंटेंडंट म्हणाला, ' मला वाटतं आणखी इतर खाणांखुणांची तुम्हांला जरूर भासूं नये ! ' मिश्किलपणा नव्हता त्याचा असं म्हणण्यांत ?

" आणि तो माझ्या दासीला घेऊन गेला !

" तूं विश्वास ठेवशील तर तुला सांगतें कीं मी अशा प्रकारें बनविली गेल्यामुळं मला पहिल्यांदां राग आला. माझी फसवणूक झाली असून मी मूर्ख ठरविली गेलें होतें. मला कपडे घालणं, माझे कपडे काढणं, अंग रगडणं या सर्व गोष्टी त्या माणसानं केल्या होत्या त्याबद्दल मला लाज वाटली असं मी नाहीं म्हणणार; पण मला आपला अपमान,–एका स्त्रीचा अक्षम्य अपमान,—झाल्यासारखं वाटलं."

" तूं काय म्हणतेस तें नीट माझ्या लक्षांत आलं नाहीं, रोहिणी "

" हें पाहा, स्वाती, एक क्षणभर विचार कर. रतीलालला शिक्षा झाली होती, कशाकरतां?-त्यानं जबरीसंभोग केला होता म्हणून !-त्या तरुण देखण्या मर्दानं !-इतके दिवस एकांतांत माझ्या निकटतम सहवासांत मनाची चलबिचल न दिसूं देणाऱ्या पुरुषानं !-त्याचा मला अपमान वाटला, समजलं ?-आलं कां लक्षांत ?"

स्वातीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. ती अगदीं सरळ, आपल्या नाकासमोर, बग्गी हांकीत बसलेल्या आपल्या कोचमनच्या पाठीकडे नजर लावून पहात होती. तिच्या चेहेऱ्यावर स्त्रिया कधींकधीं हंसतात ते गूढार्थी स्मित विलसत होतें.

---

# कुरूप-

खरें सांगावयाचें म्हणजे आजच्या या समतेच्या युगांत कपड्यांची पद्धत, राहाणी, नीटनेटकेपणा, चेहऱ्याची ठेवण इत्यादि बाबतांत सर्वजण जी एकमेकांची नक्कल करीत सर्वत्र कायमठशाचा एकजिनसीपणा आणण्याचा प्रयत्न करीत आहेत, अशा वेळीं मला वाटतें एखाद्यानें कुरूप राहणें किंवा दिसणें हें केव्हांही श्रेयस्कर होय; येवढेंच काय, पण तें त्या व्यक्तीचें कर्तव्य आहे.

लीबोनें मात्र या अधिकाराचा सूडच घेण्याचा विचार केला होता असें म्हणणें भाग आहे. तो शौर्यानें या कर्तव्याचें पालन करीत होता. वर वर्णन केलेल्या एकजिनसीपणाच्या कक्षेंत न येणाऱ्या सर्वसाधारण कुरूप माणसांच्या मानानें देखील पाहिलें तरी लीबो एक विशिष्ट प्रकारचा कुरूप प्राणी होता.

इंग्लंडचा राजा तिसरा रिचर्ड इतका कुरूप होता म्हणतात कीं, तो रस्त्यानें जात असला म्हणजे त्याला पाहून कुत्रीं भुंकत असत. पण त्याच्या कुरूपपणांत असें कांहीं एक जबरदस्त आकर्षण आणि वैशिष्ट्य होतें कीं, त्यानें कितीतरी सुंदर स्त्रियांना वेड लावून सोडलें होतें. परंतु लीबोच्या कुरूपपणांत कुठल्याच प्रकारचें सौंदर्य नव्हतें. तो फक्त कुरूप होता येवढेंच; यापेक्षां कमीअधिक कांहीं नाहीं.

त्याचें कुबड निघालें नव्हतें, पाय वांकडेतिकडे नव्हते पोटाचा ढेरा झालेला नव्हता, हात अवास्तव लांब किंवा आंखूड नव्हते, आणि तरीही, एखाद्या चित्र-

काराच्या दृष्टीनें शरीराच्या आणि चेहेऱ्याच्या नीटनेटकेपणाचा आणि सौंदर्याचा जो मिलाफ मनुष्यप्राण्यांत प्रामुख्यानें व्हावयास पाहिजे, तो त्याच्यांत झालेला नव्हता हें एखादा कलावंत तर लांबच राहिला, पण रस्त्यांतला साधा मनुष्यही सांगूं शकला असता. तेवढेंच कशाला ? त्याच्याकडे कुणीही निरखून पाहिलें तरी त्याच्या तोंडून सहज उद्गार बाहेर पडे, "बापरे ! किती कुरूप आहे हा माणूस!"

त्याचे केंस चेहेरा, जिवणी, डोळे यांचें वर्णन करण्यांत लेखणी झिजवून, शेवटीं तो प्रयत्न निष्फळ होऊन पदरीं अपयश घेण्यापेक्षां, तो भाग 'वर्णन करण्यास अशक्य असा होता' म्हटलं म्हणजे त्यांत सर्व आलें. पण त्याच्या चेहेऱ्याचें वर्णन न केल्यामुळें तो कुरूप होता ही बाब दृष्टीआड होऊं देतां कामा नये; कारण कुणीही त्याला पाहिल्याबरोबर, लीबोहून जास्त कुरूप मनुष्य आपण अजून तरी पाहिला नाहीं. या गोष्टीची त्या माणसाला जाणीव होत असे. आणि सर्वात महत्वाचा मुद्दा म्हणजे लीबोच्या दुर्दैवानें त्याला स्वतःलाही आपण कुरूप आहोंत याची जाणीव होती.

यावरून वाचकाची कल्पना झाली असेलच कीं तो कुरूप होता तरी मूर्ख खास नव्हता. तसाच तो स्वभावानेंही वाईट नव्हता, पण दुःखी मात्र निःसंशय होता. दुःखी माणसाला आपल्या दुर्दशेशिवाय कसलाच विचार करावासा वाटत नाहीं, पण लोकांचा एक समज झालेला असतो कीं, चांगुलपणा आणि आनंदी वृत्ति ह्या परस्परपूरक आहेत, आणि म्हणून लोक लीबोला मूर्ख समजत, वाईट स्वभावाचा बेवकूफ समजत. तो इतका कुरूप होता म्हणून कोणाला त्याची कींवसुद्धां येत नसे.

त्याला आयुष्यांत एकच आनंद आणि विरंगुळा होता. तो अंधाऱ्या रात्रीं विशेष दिवे नसलेल्या रस्त्यांवरून भटकत फिरायचा. इतरांना हटकत त्याप्रमाणें त्यालाही, नीट न पाहतां, जेव्हां रस्त्यावर देहविक्रय करण्याच्या निमित्तानें फिरणाऱ्या वेश्यांपैकीं एखादीनें, "तरुण देखण्या मनुष्या, चलतोस कां माझ्याबरोबर घरीं," असें म्हटलें कीं त्याला अस्मान ठेंगणें वाटे.

पण हें सौख्य चोरटें होतें याची त्याला बरेच वेळां जाणीव झाली होती. एखादी बाई वयानें उतार किंवा दारू पिऊन झिंगलेली असली तरी, आपल्या खोलींतील प्रकाशांत जेव्हां ती या 'तरुण देखण्या मनुष्या' कडे पाही, तेव्हां उतारवयाचें म्हातारपणांत रूपांतर होई किंवा दारूचा कैफ खाड्दिशीं उतरून जाई.

आणि एकदांच नव्हे तर अनेकदां, या असल्या धंदेवाईक बायका जरी किळस गुंडाळून ठेऊन वाटेल त्या धाडसाकरितां फक्त पैसा मिळाला कीं तयार होतात, तरीही त्या लीबोला म्हणत, "पण कांहींही म्हणा, तुम्हीं फारच कुरूप आहांत!"

शेवटीं एक दिवशीं जेव्हां एका कुलटेनें त्याला उद्देशून म्हटलें, "तुमच्यासारखं ध्यान मीं आपल्याबरोबर आणलं यावरून मी अगदींच अन्नाला मोताद झालें असलें पाहिजे," तेव्हां त्याला फारच वाईट वाटून त्यानें रात्रीं भटकण्याचा नाद सोडून दिला.

केवळ दैवदुर्विपाक, दुसरें काय ? कारण खरोखर जर कुणी भुकेलेला असेल तर तो बिचारा लीबो होता. त्याला प्रेमासारख्या एखाद्या भावनेची तहान लागली होती, मग तें येवढेंसेंच कां मिळेना; त्याला हड्हड् करून हांकून लावलेल्या कुत्र्यासारखें जिणें जगूं नये असें वाटत होतें. तो फक्त कुरुप होता म्हणून कां त्यानें वाळींत पडून रहायचें ? एखादी कुरूपांतली कुरूप हिडिंबासुद्धां, जर तिनें तो कुरूप आहे असें मानलें नसतें तर, किंवा. तसें बोलून दाखविलें नसतें तर, त्याला अप्सरेसारखी भासली असती.

या विचारसरणीचा परिणाम असा झाला कीं, एक दिवस त्याला एक दरिद्री, चिपडलेल्या डोळयांची, चेहऱ्यावर खवडे असलेली, दारू प्यालेली, वक्रतुंड, गलिच्छ कपडे अंगावर लोंबकळत असलेली भिकारी बाई आढळली, आणि तिला एक नाणें देतांच तिनें जेव्हां त्याच्या पायाचें चुंबन घेतलें तेव्हां त्याला न राहवून तो तिला घरीं घेऊन गेला. त्यानें तिचें शरीर स्वच्छ करवून घेतलें, तिला चांगले कपडे घालायला दिले, आपली मोलकरीण म्हणून ठेवलें, मग घरांतलें सर्व काम तिच्यावर सोंपविलें. पुढें तिला त्यानें आपली राख म्हणून बाळगलें आणि शेवटीं तिच्याशीं लग्न केलें.

ती जवळपास त्याच्याइतकीच कुरूप होती! पण जवळपासच, अगदीं थेट त्याच्याइतकीच नव्हे! कारण ती कुरूप असून सुद्धां तिच्यांत एक प्रकारचें आकर्षण होतें; ज्या ओढीमुळें पुरुष स्त्रीकडे खेंचला जातो ती विशिष्ठ ओढ होती. आणि या आकर्षणाचें प्रत्यंतर तिनें त्याला लौकरच प्रत्ययास आणून दिलें. तिनें त्याच्याशीं बेइमानी सुरूं केली, एका परपुरुषाला त्याच्या नाकावर टिच्चून आपल्या जाळ्यांत ओढलें!

तो दुसरा मनुष्य मात्र लीबोपेक्षांही कुरूप होता. शारीरिक तसाच नैतिक दृष्ट्या कुरूप असून तिच्या पूर्वाश्रमींच्या भिकारी सवंगड्यांतूनच निवडलेला तो

भटक्या, तुरुंगाची हवा खाऊन आलेला होता, भीकमाग्या मुलींचा व्यापार करीत असे, गलिच्छपणाचें चालतें बोलतें प्रदर्शनच होता. त्याचे पाय बेडकासारखे होते, तोंड अवर्णनीय वेडेंवांकडें होतें, डोकें मांसपेशीविहित सांपळ्याची आठवण करून देणारें असून त्याच्या नाकाऐवजीं खरोखरच फक्त दोन छिद्रें शिल्लक राहिलीं होती.

आपल्या बायकोची प्रतारणा लक्षांत येतांच लीबो म्हणाला " तूं मला टाकून या मर्कटाला कवटाळलंस, आणि तेंही माझ्या स्वतःच्या घरांत ! आणि मीं तुला मुद्देमालासकट पकडावं या हेतूनं मुद्दाम काय ? कुलटे, हें तूं कां असं केलंस बरं ?–अग, तो माझ्यापेक्षांही कुरूप आहे ना ? "

" नाहीं, मुळींच नाहीं, " ती उत्तरली. " तुम्ही वाटेल तें म्हणा, मी घाणेरडी कुलटा आहे, नीच आहे, हलकट आहे,–पण तो मात्र–तुमच्याहीपेक्षां कुरूप आहे असं म्हणूं नका ! "

आमचा कथानायक हतबुद्ध होऊन तिच्याकडे पहातच राहिला. तो हरला होता. तिच्या शेवटच्या वाक्यानें त्याला केवढी धसकी बसली याची जाणीव न होऊन ती पुढें म्हणाली, "कारण असं पहा कीं, त्याचा कुरूपपणा त्याच्या स्वतःपुरताच असा एका विशिष्ठ प्रकारचा आहे, पण तुम्ही मात्र इतर कुरूप लोकांसारखे कुरूप आहांत ! "

---

## देवघेव-

श्री० घरलुटे, अॅडव्होकेट, यांनीं आतांपर्यंत शेंकडों गरजवंत स्त्री–पुरुषांचे घटस्फोटाचे दावे लढवून त्यांनां स्वातंत्र्य मिळवून दिलें होतें आणि प्रख्याति कमाविली होती. आज ते आपल्यासमोरील एका धिप्पाड, सशक्त, धड-धाकट माणसाशीं बोलत बसले होते.

" काय म्हणणं आहे तुमचं ? " त्यांनीं विचारलें.

" माझ्यातर्फे आपण काडीमोडाचा दावा चालवावा अशी माझी इच्छा आहे."

" तुमची हकीकत सांगा. मी ऐकतों आहे. "

" मी शेजारच्या शहरांतल्या लग्ननोंदणी रजिस्ट्रारच्या कचेरींतला एक जुना कारकून आहे."

" जुना ? इतक्यांतच ? "

" हो, साहेब, इतक्यांतच. माझं वय सदतीस वर्षांचं आहे."

" पुढं ? "

" मी लग्न करून एका घोंटाळयांत सांपडलों आहे.—फारच दुर्दैवी परिस्थितींत."

" तुमची एकट्याचीच अशी स्थिति आहे असं समजूं नका."

" मला त्याची जाणीव आहे, आणि मला इतरांची कींवही पण येते. पण माझी हकीकत अगदींच निराळी आहे, आणि माझी आपल्या बायकोविरुद्धची तक्रारही फारच चमत्कारिक कारणासंबंधीं आहे.— मी आपल्या लग्नापासून इतिहास सांगायला सुरुवात करतों. माझं लग्न आश्चर्यकारक परिस्थितींत घडून आलं.

" मी सरकारी नोकर आहे हें तुम्हांला सांगितलंच आहे. मी गरीब खास नाहीं, पण मिळेल तेवढ्यांत आपलं आयुष्य रेटणं भाग असल्यामुळें मला आपल्या कितीतरी आवडीनिवडी माराव्या लागत, नेहमीं विवंचना राही, काटकसर करावी लागे, अगदीं प्रत्येक बाबतींत. आणि माझ्या वयांत असं करणं भाग पडलं म्हणजे तें मनाला फारच जाणवतं.

" नोंदणीकचेरींतलाच मी कारकून असल्यामुळें वर्तमानपत्रांतील ' वधू पाहिजे, ' ' वर पाहिजे, ' या जाहिराती नेहमीं माझ्या वाचनांत येत. येवढंच काय, पण त्यांचा लक्षपूर्वक अभ्यास करून व पत्रव्यवहार चालवून मीं आपलीं कितीतरी गिऱ्हाइकं तयार केलीं होतीं.

" एके दिवशीं खालील जाहिरात मला आढळली.

" ' एक देखणी, फॅशनेबल, सच्छील मुलगी एखाद्या संभावित गृहस्थाशीं लग्न करायला तयार आहे. सोबत स्वतःची पांच हजार रुपयांची जंगम इस्टेट. मंडळें, ब्यूरो, वगैरेंनीं पत्रव्यवहार करूं नये. '

" अनायासें त्याच दिवशीं मी एक वकील आणि दुसरा कारखानदार अशा आपल्या दोघा मित्रांबरोबर मेजवानीला गेलों होतों. गप्पांच्या ओघाओघांत संभाषण लग्नाच्या विषयाकडे वळलं, आणि मीं त्यांना त्या पांच हजारांच्या बाईबद्दल माहिती सांगितली.

" कारखानदार म्हणाला, ' या बायांना काय वाटतं कुणास ठाऊक ! '

" वकीलानं मात्र आपण अशा अटींवर झालेलीं कितीतरी समाधानकारक लग्नं पाहिलीं आहेत असा हवाला दिला. तो माझ्याकडे वळून म्हणाला, ' तूं इथं स्वतःकरतां कां नाहीं प्रयत्न करून पहात ? तुझी सर्व काळजी नाहींशी होईल बघ. पांच हजार रुपये म्हणजे गंमत नाहीं ! '

" यावर आम्हीं तिघेही हंसलों. मग आमच्या इतर गप्पागोष्टी होऊन एका तासानंतर मी घरीं परतलों.

" त्या रात्रीं हवेंत विशेषच गारठा होता. शिवाय मी रहात होतों ती चाळसुद्धां बरीच जुनी होती. ती दिसण्यात आकर्षक तर नव्हतीच, पण मी जेव्हां जिना चढून वरच्या मजल्यावर जाऊं लागलों तेव्हां तो लोखंडी कठड्याचा निर्जीव थंड स्पर्श आणि अंधारांत भिंत चांचपडत जात असतांनाचा तो सफेदी नसल्यामुळें हाताला भासणारा चिकटपणा, यांनीं माझ्या अंगावर शहारे आले, आणि त्या घरांत आपण इतकीं वर्षं कशीं काढलीं याचं मला आश्चर्य वाटूं लागलं एकाएकीं माझ्या मनांत विचार चमकला, ' जर आपल्याला ते पांच हजार रुपये मिळतील तर ! '

" माझी ब्रम्हचाऱ्याची ती अजागळ खोली व तिच्यांतलं सामान मला किळसवाणं वाटूं लागलं. मीं अजून त्या जाहिरातींतल्या मुलीसंबंधीं विशेष विचार केला नव्हता, पण अंथरुणांत शिरल्यावर तिचे विचार माझ्या मनांत घोळूं लागले. मला बराच वेळ झोंप आली नाहीं.

" पहांटे डोळे उघडतांच आपणांला कामाकरतां आठ वाजतां शेजारच्या गांवीं जायचं आहे याची मला आठवण झाली. मला लौकर उठणं भागच होतं, आणि थंडी तर मी म्हणत होती ! जर या वेळीं माझ्याकडे पांच हजार रुपये असते तर !

" मीं त्या दिवशीं नेहमींप्रमाणें आपली कंटाळवाणी न्याहारी पुरी केली आणि कचेरींत,—त्या दमट वासांत आणि कागदांच्या ढिगाऱ्यांत, आपल्या नेहमींच्या सोबत्यांच्या सहवासांत आणि किलबिलाटांत,- आपलं कामही केलं; पण डोळ्यांसमोर त्या मुलीची काल्पनिक मूर्ति आणि तिचे पांच हजार सारखे नाचत होते.-ती कोण असावी ? तिला लिहून पाहिलं तर ? तिचा तपास कां काढूं नये ?

" शेवटीं, वकीलसाहेब, दोन आठवडे सतत हाच विचार माझ्या डोक्यांत पिंगा घालीत होता. माझ्या सर्व अडचणी, काळज्या, मला पूर्वीं भासत त्यापेक्षां

असह्य अशा भासूं लागल्या, आणि त्या नाहींशा होण्याचा एकमेव मार्ग म्हणजे त्या मुलीची व तिच्या पांच हजारांची प्राप्ति होय असं माझ्या मनानं घेतलं.

" मीं तिचा सर्व इतिहास आपल्या कल्पनाशक्तीनं तयार करीत होतों. जेव्हां एखादी गोष्ट आपणांला हवी असते तेव्हां स्वतःला रुचेल अशाच प्रकारें आपण तिच्यासंबंधीं अटकळ बांधत असतों. ही मुलगी ज्या अर्थी वर्तमानपत्रांतून जाहिरात देते, आणि वर पांच हजार रुपये सोबत आणते, त्या अर्थी ही एखादी खानदानी स्त्री नसावी हें तर स्वाभाविकच होतं. पण कदाचित् ती कुलशीलवान असूनही दुःखीकष्टी नसेल कशावरून ?

" बहुतकरून ही मुलगी एखाद्या श्रीमंत मनुष्याचं त्याच्या मोलकरणी-पासून झालेलं अपत्य असून तिच्या जनकानं तिच्याकरतां पैशांची सोय करून ठेवली असेल. ती एखाद्या पुरुषावर, त्याला तिची खरी परिस्थिति नकळत प्रेम करीत असून, त्याला तिचं जन्मरहस्य समजून येऊं नये, पण आपला कार्यभाग तर साधावा, अशा हेतूनं कदाचित् या मार्गाचा अवलंब तर करीत नसेल ?

" मी कांहींतरी भरमसाट विचार करीत होतों. मी त्यांच्यावर विश्वासदेखील ठेवीत असें. आम्हां लग्ननोंदणी कचेरींतल्या कारकुनांनीं कादंबऱ्या वाचूं नयेत, कारण मी या घटनेसंबंधीं आपल्या मनांत एक नवलकथा घडवूं लागलों होतों.

" शेवटीं मीं आपल्या सरकारी सहीनं, आणि एका अज्ञात इसमातर्फे म्हणून, तिला पत्र लिहिलं आणि उत्तराची वाट पाहूं लागलों. पांच दिवसांनंतर, तीन वाजतां दुपारीं, मी आपल्या कचेरींत काम करत बसलों असतां, पट्टेवाल्यानं माझ्याकडे कुणी कुमारी जगताप आली असल्याचं सांगितलं.

" ' त्यांना आंत पाठवून दे,' मी म्हणालों.

" आंत आलेली स्त्री जवळपास तीस वर्षं वयाची, किंचित् स्थूल, सांव-ळीशी आणि भांबावलेली अशी मला आढळून आली.

" ' बसा अशा, ' मीं तिचं स्वागत केलं.

" ती बसली आणि पुटपुटली, ' मी ती आहें, साहेब. '

" ' पण मीं तुम्हांला ओळखलं नाहीं अं—'

" ' तुम्हीं जिला पत्र लिहिलंत ती—'

" ' लग्नाबद्दल, होय ? '

" ' होय, साहेब..'

" ' असं काय ? ठीक. बहोत ठीक ! '

" ' मी स्वतःच आलें, कारण अशा गोष्टी प्रत्यक्षच झालेल्या बऱ्या. '

" ' बरोबर आहे तुमचं म्हणणं.—तर तुमची लग्न करायची इच्छा आहे, नाहीं ? '

" ' होय. '

" ' तुमचे कुणी आप्तसंबंधी आहेत काय ? '

" तिनं जरासा विचार केला, नजर खालीं वळविली, आणि ती पुटपुटली, ' नाहीं. माझे आईबाप-वारले. '

" मी चमकलों. एकूण मीं तिच्यासंबंधीं जें चित्र मनोमन रेखाटलं होतं तें मूळ मुद्याच्या बाबतींत खरं ठरलं अखेर !-आणि या दुर्दैवी स्त्रीबद्दल माझ्या मनांत एकदम सहानुभूति वाटूं लागली. पण मला आपल्या सरकारी स्वभाव-कठोरतेमुळें तिची विशेष गय करतां आली नाहीं. मी पुढं विचारलं, ' तुमची संपत्ति पूर्णपणें तुमच्या ताब्यांत आहे ना ? '

" ती अगदीं न थबकतां उत्तरली, ' हो तर ! '

" मीं तिच्याकडे निरखून पाहिलं, खरोखर तिच्यांत न आवडण्यासारखं कांहींच नव्हतं. फक्त ती थोडी वाजवीपेक्षां जास्त व्यवहारचतुर असावी,-मला हवी होती त्यापेक्षां किंचित् अधिक,-येवढंच. ती सुंदर होती, सशक्त होती, आणि व्यवहारदक्षही दिसत होती. आणि तिचा पैसा ही निव्वळ थाप नाहीं अशी आतां माझी खात्री झाल्यामुळें तिच्याशीं भावनामय प्रतारणा,-माझ्या दृष्टीनं,-करून पहावी; तिच्या भावी नवऱ्याचा ( माझ्या पत्रांतल्या अशिलाचा ) प्रति-स्पर्धी होऊन पहावं असं मला वाटलं. माझा अशील, म्हणजे तिचा भावी नवरा, हा एक खिन्न स्वभावाचा पण संभावित गृहस्थ असून किंचित् दुखणाईत आहे असं मीं तिला भासवलं.

" ती एकदम उद्गारली, ' खरं सांगूं, साहेब, मला लोकांनीं चांगलं व्हावं आणि रहावं असं मनापासून वाटत असतं ! '

" ' पण त्याची-तुमची चार पांच दिवस गांठ पडणार नाहीं, ' मी म्हणालों, ' तो कालच बाहेरगांवीं गेला. '

" ' हें ठीक झालं नाहीं, ' ती म्हणाली.

" ' मानलं तर वाईट, नाहींतर नाहीं, ' मी हंसत म्हणालों. ' तुम्हांला घरीं परत जायची घाई आहे कां ? '

" ' मुळींच नाहीं. '

" ' मग आमच्या शहरांतच घालवा ना चारपांच दिवस. तुमचा वेळ कंटाळवाणा न जाऊं देण्याचा मी आपल्यापरीं प्रयत्न करेन. '

" ' तुम्हीं फारच तसदी घेतां आहांत, साहेब. '

" ' तुम्हीं एखाद्या हॉटेलांत उतरलां आहांत वाटतं ? '

" ' तिनं आमच्या शहरांतल्या सर्वांत नामांकित वसतिगृहाचं नांव मला सांगितलं.

" ' मग बाईसाहेब, तुमचं भावी लग्न लावणारा हा कारकून आज रात्रीं तुम्हांला आपल्याकडे मेजवानीला बोलविण्याची परवानगी मागतो आहे. त्याला तुम्हीं उपकृत कराल काय ? '

" ती विचारांत पडलेली दिसली. पण थोड्या वेळानं उत्तरली, 'ठीक आहे.'

" ' मी तुमच्या वसतिगृहांत सात वाजतां येऊन तुम्हांला घेऊन जाईन.'

" ' बरं.'

" ' मग ठरलं तर,' असं म्हणून मीं तिला कचेरीच्या पायऱ्यांपर्यंत पोहोंचवायला गेलों.

" बरोबर साताच्या ठोक्याला मी तिच्या वसतिगृहांत पोहोंचलों. तिनं नीटनेटका श्रृंगार केला होता, व किंचित् लाजतमुरकत मला आंत बोलावलं. मीं तिला आपल्या घरीं नेऊन काळजीपूर्वक तयार करवून घेतलेल्या पदार्थांची चमचमीत मेजवानी दिली. एका तासानंतर आम्हीं एकमेकांचे मित्र झालों आणि मला तिनं आपली हकीकत सांगितली. तिची आई एक खानदानी बाई असून तिला एका श्रीमंत मनुष्यानं कुमार्गाला लावलं होतं, व त्याचं फळ ही झाली होती. तिचं बालपण शेतकरी लोकांत गेलं. पण ती आतां आपल्या जनक-जननीकडून मिळालेल्या संपत्तीमुळें श्रीमंत झाली होती. फक्त ती त्यांचीं नांवं मात्र कुणालाच आणि केव्हांहि सांगायला तयार नव्हती. मलादेखील तीं जाणून विशेष फायदा होणार नव्हता, म्हणून मीं तिच्या संपत्तीसंबंधानंच बारकाईनं चौकशी सुरू केली. ती किती व्यवहारदक्ष असावी याचं मला तिच्या उत्तरा-उत्तरांत प्रत्यंतर येऊं लागलं. तिची आंकड्यांबद्दलची माहिती, आपल्या हक्कांची जाणीव, संपत्ति गुंतवून ठेवण्याचे तिचे वेगवेगळे मार्ग, त्यांवरचं व्याज, रिबेट, डिव्हिडंड, बोनस, इत्यादि गोष्टी ती बिनचूक सांगूं लागली. मला तिच्या कर्तृत्वशक्तीबद्दल

विश्वास वाटूं लागला, आणि मी आपली तिच्यासंबंधींची आवड दाखविण्याइतका धीट होऊं लागलों. ती मला आवडूं लागली हें तिनं ओळखावं इतकं स्पष्ट होऊं लागलं.

" कदाचित् आनुवंशिक संस्काराचा परिणाम म्हणून असेल, पण ती आपल्या वागणुकींत पिढीजात पद्धतीचा आभास निर्माण करूं लागली. मीं-तिला थोडं उंची मद्य प्यायला लावलं आणि स्वतःही प्यालों. माझं डोकं मात्र सुन्न होऊं लागलं. आपण आतां जाळ्यांत सांपडणार असं मला वाटूं लागलं. पण मला स्वतः-बद्दल आणि तिच्याबद्दलही धास्ती वाटूं लागली. ती कांहीं विकारवश होणार नाहीं आणि आपल्या कचाट्यांत सांपडणार नाहीं अशी मला शंका वाटूं लागली. आपलं मन शांत करण्याकरतां मीं पुन्हां तिच्या संपत्तीबद्दल चौकशी सुरूं केली. माझा अशील धंदेवाईक असल्यामुळें त्याला या गोष्टी नक्की कळायला हव्यात अशी सबब मीं पुढं केली.

" तिची तयारी होतीच. 'मला त्याची जाणीव आहे,' ती म्हणाली, 'आणि मी बरोबर सर्व पुरावा देखील घेऊन आले आहे.'

" 'इथं, या शहरांत ?'

" 'होय.'

" 'होटेलांत असतील सर्व कागदपत्रं ?'

" 'होय, माझ्या खोलींतच आहेत सारे.'

" 'मला दाखवायला तुमची हरकत आहे ?'

" 'मुळींच नाहीं.'

" 'आत्तां ?'

" 'त्यांत काय हरकत आहे !'

" माझं सर्वतोपरी समाधान झालं. आम्हीं तिच्या वसतिगृहाकडे परत जायला निघालों. तिनं खरोखरच सर्व जमाखर्चाच्या चोपड्या आणल्या होत्या. मला शंका यायला कांहीं कारणच नव्हतं, कारण ते सर्व कागद माझ्या प्रत्यक्ष हातांत होते, मला त्यांचा स्पर्श होत होता, मीं ते वाचून पाहिले होते. मला इतका कांहीं आनंद झाला कीं, तिला आपल्या बाहूंत कवटाळण्याची अनावर इच्छा झाली. मला वाटलं, ही आपली इच्छा एका सद्वर्तनी, समाधान झालेल्या माणसाची सदिच्छा आहे येवढंच ! आणि मीं तिला खरोखरच मिठी मारली,-एकदांच नव्हे,

तर दोनदां, दहादां,–इतकी कीं मद्याच्या धुंदींत मी तिच्या–किंवा असं म्हणा, ती माझ्या,–वासनेला बळी पडली.

" मला नंतर चमत्कारिक वाटूं लागलं, वकील साहेब.–आणि तिला ? ती तर फुलून फुलून रडूंच लागली; तिचं हें गुह्य मीं उघडकीस आणूं नये म्हणून माझी विनवणी करूं लागली. नाहींतर तिचा सर्वनाश ठरलेलाच असं तिला वाटलं. मीं तिला तसं कांहीं न करण्याचं वचन दिलं, पण माझी मनःस्थिति मात्र फार विचित्र झाली होती.

" आतां काय करायचं ? मीं आपल्या अशीलाचा विश्वासघात केला होता. तो अशील खरोखरचा एखादा जिवंत प्राणी असता तर कांहीं विशेष बिघडलं नव्हतं; पण अशील अशी कुणी व्यक्तीच नव्हती. मीच तो अशील होतों, तो भोळा-भाबडा अशील, तो ठकविला गेलेला अशील, तिच्याकडून प्रतारणा केला गेलेला अशील ! काय विचित्र परिस्थिति येऊन ठेपली होती पहा. मीं तिला तसंच परत जाऊं दिलं असतं हें खरं; पण त्या पांचहजार कल्दारांचं काय ? ती संपत्तीही तिच्याबरोबर परत जाऊं पहात होती ! आणि एकदां तिच्याशीं संबंध घडून आल्यावर तिला बापडीला तसंच परत घालवून देणं हें तरी मला शोभलं असतं कां ?––पण यापुढचं तिचं–माझं आयुष्य ? अशा सहजासहजीं बळी पडणाऱ्या स्त्रीसंबंधीं पुढं कशीकाय खात्री बाळगायची ?

" मीं ती रात्र कशी घालविली तें मलाच माहीत, वकील साहेब. माझा कांहीं नक्की विचारच ठरेना. मी पश्चात्तापानं पोळत होतों, भीतीनं भांबावून गेलों होतों, बऱ्यावाईटासंबंधींच्या कल्पनांचे मला धक्के बसत होते. पण सकाळीं उठल्यानंतर माझं डोकं निःशंक झाल्यासारखं वाटलं. मीं नीटनेटके कपडे घातले, आणि अकरा वाजतां तिच्या वसतिगृहांतील खोलींत प्रवेश केला.

"मला पाहतांच तिनं लाजेनं मान खालीं घातली. मी तिला म्हणालों, 'मिस् जगताप, आपल्या हातून जो काल प्रमाद घडला त्याचं एकच प्रायश्चित्त घेणं शक्य आहे. मी तुम्हांला लग्नाची मागणी घालतों आहे.'

" ती पुटपुटली, ' मला कबूल आहे. '

" मीं तिच्याशीं लग्न केल्यानंतर सहा महिने सर्वकांहीं सुरळित चाललं होतं. मीं नोकरी सोडून दिली, आणि शेअरबाजारांतला सटोडिया झालों. मला कुरकुर करण्याला मुळींच वाव नव्हता. माझ्या पत्नींत मला कशाचीच उणीव दिसून आली नाहीं.

" मग मला आढळून आलं कीं ती वेळोवेळीं दोनदोन चारचार तासांकरतां बाहेर जात असे. हें मात्र ठराविक दिवशींच व्हायचं. एका आठवड्यांत ती मंगळवारीं फेरफटका करायला जाई, तर दुसऱ्या आठवड्यांत बुधवारीं. मला तिच्याबद्दल संशय येऊं लागला, आणि मीं एका मंगळवारीं तिच्यावर पाळत ठेऊन तिचा पाठलाग केला.

" एक वाजतां ती रस्त्यांमागून रस्ते कापीत पायींच स्टेशनाच्या रोखानं निघाली. प्रत्येक चौरस्त्यावर आल्यानंतर मात्र चोंहीकडे वळून आपणांला कुणी पहात तर नाहीं ना, अशा नजरेनं खात्री करून मग ती पुढं चालूं लागायची. ती स्टेशनाजवळ आली तशी पदोपदीं मागं वळून पाहून पुढं चालूं लागली.

" मीं वेषांतर केलं असल्यामुळें तिनं मला ओळखणं शक्य नव्हतं. तिचा प्रियकर पावणेदोनच्या गाडीनं येणार असावा अशी माझी खात्री झाली. मी प्लॅटफॉर्मवर स्वतः दिसणार नाहीं अशा बेतानं उभा राहून कायकाय होतं तें पाहूं लागलों. शिटी ऐकूं आली आणि गाडी स्टेशनांत शिरली. प्रवासी उतरूं लागले. ती एका डब्याकडे धांवली आणि शेतकऱ्यासारख्या दिसणाऱ्या एका माणसाबरोबरच्या तीन वर्षं वयाच्या मुलीला तिनं उचलून घेतलं आणि तिला कवटाळून ती तिचे मुके घेऊं लागली. नंतर ती मागं वळून पाहूं लागली, आणि दुसऱ्या डब्यांतून बाहेर निघत असलेल्या एका बाईच्या खांद्यावरील पहिल्या मुलीपेक्षां धाकट्या मुलीला तिनं फर्रकन् ओढून घेतलं आणि तिला ती कुरवाळूं लागली. थोड्या वेळानं इतर उतारूंबरोबर ती स्टेशनाच्या बाहेर आली, आणि तो शेतकरी, ती दाई आणि त्या दोन मुली यांच्याबरोबर स्टेशनाशेजारच्या बगीचांत शिरली.

" मी घरीं पोंहोंचलों तो विषण्ण मनःस्थितींतच. मला एकंदर प्रकाराची जाणीव झाली असं वाटे, पण मीं जो निष्कर्ष काढला त्यावर विश्वास ठेवणं जड वाटूं लागलं. संध्याकाळीं ती घरीं परत आल्यावर मीं तिला रागारागानंच विचारलं, 'तीं कुणाचीं मुलं आहेत ?'

" ' कोणतीं मुलं ? ' तिनं प्रश्न केला.

" ' तूं पावणेदोनच्या गाडीनं येण्याची ज्यांची वाट पहात होतीस तीं. '

" तिनं किंकाळी फोडली आणि ती बेशुद्ध झाली. ती शुद्धीवर आल्यानंतर तिनं रडत रडत मला सांगितलं कीं, तिला एकंदर चार अपत्यं होतीं, मंगळवारीं येणाऱ्या दोन मुली आणि बुधवारीं येणारीं दोन मुलं.—समजलं, वकीलसाहेब, तुम्हांला ?

" आणि हें तिच्या संपत्तीचं मूळ, बरं कां ? किती लाजिरवाण्या मार्गानं कमाविलेली होती ती ! चार बाप ! प्रत्येकाकडून तिला संतति झाली असल्यामुळें पुरेपूर नुकसानभरपाई !-आतां मीं काय करावं असा आपण सल्ला देतां ? "

घरलुटे कायदेपंडितांनीं क्षणभर विचार केला आणि म्हटलें, " मी म्हणतों तुम्हीं आपल्या हक्काचीं मानून तीं मुलं स्वतः बाळगा. "

---

# गद्धा मोतीराम—

" हें पाहा, हेमंत, " मी म्हणालों, " तूं पुन्हां ते तीन शब्द उच्चारले, ' तो गद्धा मोतीराम.' मी जेव्हां जेव्हां या मोतीरामचं नांव ऐकतों तेव्हां तेव्हां त्याच्यामागं ' गद्धा ' हें शेंपूट लागलेलंच असतं ? "

आमच्या जिल्ह्याचा असेंब्ली-मेंबर हेमंत राजकारणे घुबडासारखे डोळे करून माझ्याकडे पाहूं लागला. तो म्हणाला, " तूं इतके दिवस त्या शहरांत राहातो आहेस आणि तुला मोतीरामची गोष्ट अजून माहीत नाहीं? " मीं तशी कबुली दिल्यानंतर हेमंतानें आपले हात चोळले, व मला ती गोष्ट सांगण्यास सुरुवात केली.

" तूं मोतीरामला पाहिलं आहे ना ? त्याचं तुमच्या शहरांत हमरस्त्यावर कापडाचं जंगी दुकान होतं, तुला आठवतं ? "

" होय, चांगलं आठवतं . "

" ठीक. आठ वर्षांपूर्वी एकदां मोतीराम चैन करण्याकरितां मुंबईला जायला निघाला. आपण कापडखरेदीकरतां जात आहोंत असं त्यानं भासवलं, पण पंधरा दिवस मुंबईसारख्या शहरीं राहून एखाद्या साधारणशा शहरांतल्या साध्यासुध्या दुकानदाराची काय स्थिति होते, त्याचं रक्त कसं खळबळून येतं हें मीं तुला सांगायला नको. दररोज रात्रीं सिनेमा—नाटकं; संध्याकाळीं, रात्रीं, आपणांला खेटून कपडे सळसळत जाणाऱ्या स्त्रिया; हवी तेवढी मौज,-माणूस वेडा होऊन जातो. तंग कपडे, अर्धनग्न शरीरं, उघडे गळे, नागडे दंड, भरदार मांड्या, पुष्टस्तनांचं प्रदर्शन. सर्वसर्व कांहीं आपल्या अगदीं आटोक्यांत आहे असं भासतं. पण आपण त्याला स्पर्श करूं शकत नाहीं, किंवा तसं करण्याचा आपला हिय्या होत

नाहीं. खाण्यापिण्याच्या बाबतींतही जिभेचे चोंचले पुरविले जात असतात. आणि जेव्हां आपण परत जाऊं लागतों तेव्हां त्या सर्व अतृप्त वासनांचा विचार मनांत येऊन छाती धडधडूं लागते आणि चुंबनं घेण्याकरतां ओंठ फुरफुरत राहतात.

" रात्रीं ८-४०च्या गाडीनं परत जाण्याकरतां जेव्हां मोतीराम स्टेशनावर आला तेव्हां त्याच्या डोक्यांत असेच कांहीं विचार गर्दी करून राहिले होते. तिकीट काढून तो फलाटावर हिंडत असतां एक तरुण स्त्री एका वयस्क बाईचा मुका घेत असतांना त्याला दिसली. मोतीरामला वाटलं, ' काय हें सौंदर्य, बापरे! '

" तिनं त्या म्हाताऱ्या बाईचा निरोप घेतला; ती मुशाफरखान्यांत गेली, मोतीरामही तिच्यामागं तिकडे गेला; ती फलाटावर परत आली, मोतीरामही परत आला; ती एका रिकाम्या दोनबांकी डब्यांत शिरली, मोतीरामही तिच्या पाठोपाठ शिरला. त्या दिवशीं प्रवासी थोडे होते, इंजिनानं शिटी वाजविली, गाडी चालूं लागली. मोतीराम त्या मुलीला न्याहाळून पाहूं लागला. ती फार तर सोळा–सत्रा वर्षं वयाची असेल; गोरी, उंच असून तिचा चेहेरा लोभस होता. तिनं आपला रग पांघरला आणि ती बांकावर झोंपली.

" मोतीरामनं विचार केला, ' ही कोण असावी बरं ? ' आणि कितीतरी कल्पना त्याच्या डोक्यांत चमकून गेल्या. त्याचे विचार चालूंच होते. ' आग-गाडीच्या प्रवासांत कितीतरी हकीकती घडत असतात म्हणे; माझ्या बाबतींत या बाईसंबंधीं कांहीं घडणार नाहीं कशावरून ? कुणीं सांगावं ? असे योगायोगानं होत असलेले चमत्कार ताबडतोबच घडून येत असतात. फक्त मी थोडा धाडसी व्हायला पाहिजे. पण तेवढं धाडस माझ्यांत आहे कुठं ? तीच तर अडचण आहे ! जर आपणांला लोकांचीं मनं कळूं शकलीं तर ? माझी खात्री आहे कीं आपण रोज कितीतरी प्रकारच्या संधि आपल्या हातांत येऊन त्यांना घालवून लावतों. कदाचित् तिनं कांहीं थोडासा जरी सुगावा लागूं दिला तरी तिला काय पाहिजे हें आपणांला कळूं शकेल. '

" मग त्यानं काय केलं असतां आपणांला या बाबतींत यश मिळेल याचा विचार सुरूं केला. आपण कांहीं तरी धाडसी असं एखादं कृत्य करतों आहोंत किंवा तिच्या उपयोगी पडतों आहोंत, मग हळूंच संभाषणाला सुरुवात होत आहे, ओघाओघांत गोष्टी निघून ती आपणांला कबुली देत आहे, शेवट–तें सर्व मीं सांगायलाच पाहिजे असं नाहीं.



" तो एका झापेंत तिच्या अंगावर आला.

" पण त्याला तशी संधि मिळतांना दिसेना, तिच्याशीं बोलणं काढण्याची सबब सांपडेना; आणि अनायासें येणाऱ्या एखाद्या योगायोगाची वाट पहात व डोकं विचार करूनकरून शिणवीत, तो बसून राहिला. सबंध रात्र ओसरली, ती मुलगी निजलीच होती, आणि मोतीराम आपल्या अधःपाताबद्दलचा विचार सारखा करीतच होता. दिवस उजाडला, उन्हाची एक तिरीप खिडकींतून डब्यांत शिरली, आणि त्या निद्रित-सुंदरीच्या चेहऱ्यावर पडतांच ती आळस देत उठली, तिनं खिडकींतून बाहेर पाहिलं आणि मोतीरामकडे एक कटाक्ष टाकून मोकळेपणानं स्मित केलं. मोतीराम थरथरला. असो-नसो, तो रात्रभर ज्याची वाट पहात होता तेंच तें आमंत्रण देणारं स्मित होतं खास ! त्याचा अर्थ हाच, ' तूं किती खुळा, सरळ, बेअकली गद्धा आहेस रे ! तिथं आपल्या बांकावर रात्रभर एखाद्या पुतळ्यासारखा बसून राहिलास ?-माझ्याकडे पहा बरं ! मी किती लोभस आहें ! आणि एखाद्या साधुसंतासारखा रात्रभर तूं तिथं बसून होतास, आणि एक सुरेख स्त्री तुझ्या डब्यांत एकटीच झोंपलेली होती ! '

" ती त्याच्याकडे पहात हंसली. आपण कांहींतरी बोललंच पाहिजे या जाणिवेनं मोतीरामला डोकं फिरल्यासारखं वाटलं. पण बोलणार काय ? कांहीं सुचेना. अखेर मनाचा धडा करून त्यानं ठरविलं कीं, काय होणार असेल तें होवो, एकदां प्रयत्न करून तर पहायचाच ! आणि लगेच तो एका झापेंत तिच्या अंगावर आला, आपल्या पसरलेल्या बाहूंत त्यानं तिला कवटाळलं, आणि पट्कन् तिचं चुंबन घेतलं.

" ती घाबरून ' मेलें, मेलें ! कुणी धांवा हो ! ' अशी भीतीनं ओरडत दाराकडे धावली, तिनं दार उघडलं, आणि आपला हात बाहेर हालवीत ती खालीं उडी मारण्याचा प्रयत्न करूं लागली. इकडे मोतीराम स्वतः, आतां ती घाबरून उडी टाकणार या भीतीनं, पुढं सरसावला आणि त्यानं तिची साडी धरून तिला मागं ओढण्याचा प्रयत्न केला. तोंडानं तो पुटपुटतच होता, ' अहो बाई, ऐका तर ! असं काय करतां ? '

" गाडीचा वेग कमी झाला व ती एकदांची थांबली. गार्ड धांवतच त्या डब्याकडे आला, आणि त्याला पाहतांच ती मुलगी त्याच्या बाहूंत शिरली, व रडतच म्हणाली, ' पहा हो हा माणूस मला-माझी—' आणि ती बेशुद्ध झाली.

" गाडी पुढच्या जंक्शनवर आली आणि रेल्वे-पोलिसनं मोतीरामला आपल्या ताब्यांत घेतलं. ती मुलगी शुद्धीवर आली होती व तिनं आपली हकीकत पोलि-

सला सांगितली. बिचाऱ्या मोतीरामची तात्पुरती सुटका होऊन घरीं परत यायला त्याला रात्र झाली, पण त्याच्यावर सार्वजनिक स्थळीं विनयभंग करण्याच्या प्रयत्नाचा आरोप ठेवण्यांत आला होता.

## ( २ )

" त्यावेळीं मी आमच्या राजकीय पक्षाच्या वर्तमानपत्राचा संपादक होतों. माझी आणि मोतीरामची गांठ हटकून कुठंतरी रोज पडतच असे. हा प्रसंग घडल्यानंतर दुसरे दिवशीं तो मला भेटायला आला, त्याला आतां काय करावं हें सुचेना. मी त्याच्याबद्दलचं आपलं मत त्याला बोलून दाखविलं. 'तूं खरोखरच गद्धा आहेस, मोतीराम,' मी म्हणालों, 'कुणीही संभावित माणूस तूं वागलास तसा वागणार नाहीं.'

" तो रडूं लागला. त्याच्या बायकोनं त्याला मारलं होतं, त्याला आपला धंदा बुडणार अशी भीति वाटूं लागली होती, आपलं नांव बद्दू होणार म्हणून लाज वाटत होती, त्याचे मित्र त्याची सोबत सोडून देतील याचा खेद वाटत होती. शेवटीं मला त्याची कींव वाटूं लागली, आणि आपला सहकारी शरद् सहस्रबुद्धे याला मी बोलावूं पाठविलं. तो स्वभावानं जरी बडबड्या असला तरी अशा पेंचप्रसंगाच्या बाबतींत योग्य तो सल्ला देईल ही माझी खात्री होती

" त्यानं माझी ओळख असलेल्या मॅजिस्ट्रेटला या [illegible] भेटण्याचा सल्ला दिला. मीं मोतीरामला घरीं परत पाठविलं आणि स्वतः मॅजिस्ट्रेटकडे गेलों. त्यानं मला सांगितलं कीं, ती तरुण मुलगी शिकली-सवरलेली असून त्या जंक्शनच्या गांवीं रहात असलेल्या मेहेता नांवाच्या प्रतिष्ठित व्यापाऱ्याची पुतणी होती मोतीरामच्या खटल्यांतली सर्वांत मोठी घोंड म्हणजे त्या कारणानंच मोतीरामविरुद्ध तक्रार गुदरली होती. पण मॅजिस्ट्रेट असंही म्हणाला कीं, जर मेहेतानं फिर्याद काढून घेतली तर आपण पुढं प्रकरण चिघळूं न देण्याची [illegible]

" मी मोतीरामकडे परत गेलो तेव्हां तो काल[illegible] दगदगीनं शिणून अंथरुणावर पडला होता. त्याची पठाण, किंचित् [illegible] लावलेली उंच, धिप्पाड बायको त्याला सारख्या शिव्या देत होती [illegible] मला अंथरुणाजवळ नेलं व ती ओरडून म्हणाली, 'आतां तुम्हीं या गद्धयाला [illegible] आलांत वाटतं? पाहून घ्या माझ्या जिवलगाला!' आणि ती आपल्या [illegible] ठेऊन त्याच्या पलंगासमोर उभी राहिली. मीं मोतीरामला सर्व [illegible] सांगितली.

तेव्हां त्यानं मीं जाऊन त्या मुलीच्या काकाला भेटून यावं असं विनविलं. ही बात जरा नाजुकच होती, पण मीं कबूल केलं; तरी तो बिचारा पुन्हां मला बजावून सांगूं लागला, ' मित्रा, मीं तिचा मुकासुद्धां घेतला नाहीं रे ! अगदीं शपथ घेऊन सांगतों. '

" मीं म्हटलं, ' म्हणून काय झालं ? तूं गद्धा आहेस हें तर निर्विवादच आहे.' पण या कामाकरतां त्यानं दिलेले तीनशें रुपये मीं घेतले, आणि माझा एकट्याचा तिच्या काकाकडे जाण्याचा हिय्या होईना म्हणून शरद्‌ला सोबत चलायला सांगितलं. आम्हीं ताबडतोब निघायचं या कबुलीवर तो तयार झाला, कारण त्या दिवशीं संध्याकाळीं त्याला कांहीं महत्वाचं काम होतं.

" दोन तासांनंतर आम्हीं एका टुमदार बंगलीचं दार ठोठावलं. एक देखणी मुलगी दार उघडायला आली. तीच ती असावी अशी खात्री पटून मी शरद्‌च्या कानांत कुजबुजलों, ' मोतीरामनं कांहीं उगाच नाहीं गद्धेपणा केला ! '

" त्या मुलीचा काका आमच्याच पक्षाचा गृहस्थ निघाला. येवढंच काय, पण तो मधूनमधून आमच्या वर्तमानपत्राकरतां लेखही पाठवत असे म्हणे ! त्यानं आमचं अपूर्व स्वागत केलं, आणि दोघे संपादक आपले पाहुणे म्हणून आले हें आपलं केवढं थोर नशीब असं आम्हांला भासविलं. शरद् माझ्या कानांत कुज-बुजला, ' आपण त्या गद्धया मोतीरामच्या खटल्याचा निकाल समाधानकारकपणें लावूं शकूं असं मला वाटतं. '

" ती मुलगी घरांत गेल्यानंतर मीं त्या नाजुक विषयाला हात घातला. मीं तिच्या काकाच्या नजरेसमोर या गोष्टीचा किती गवगवा होऊं शकेल याचं भेसूर चित्र उभं केलं, हा प्रकार जिकडेतिकडे कळल्यानंतर त्याच्या पुतणीची किंमत किती कमी होईल याची त्याला जाणीव करून दिली. कारण त्या माणसानं तिचं फक्त चुंबनच घेतलं यावर कुणी विश्वास तरी ठेवला असता कां ?–तो भलामाणूस कांहींच ठरवूं शकला नाहीं, त्यानं सर्व आपल्या बायकोवर सोंपविलं. ती बाहेरगांवीं गेली होती आणि संध्याकाळीं परत येणार होती. पण लगेच त्यानं एक तोड सुचविली. तो म्हणाला, ' पण असंच करा ना ! तुम्हीं दोघे रात्रीं इथंच जेवा आणि झोंप घ्या. मी रात्रीं बायकोबरोबर या प्रश्नाचा खल करून तुम्हीं म्हणतां तसं करण्याकरतां तिचं मन वळवून पाहीन '

" शरद् आधीं कबूल होईना पण त्या गद्धया मोतीरामची सुटका करण्याचा हा प्रश्न असल्यामुळे तो कसाबसा तयार झाला, आणि आम्हीं मेहेताचं आमंत्रण स्वीका-

रलं. त्याला अतिशय आनंद झाला व त्यानं या खटल्याबद्दल सकाळीं बोलण्याचं आश्वासन देऊन आपल्या पुतणीला हांक मारली, आणि बगीच्यांत सहल करण्याचा बूट काढला. शरद् आणि मेहेता राजकारणाच्या गोष्टी करूं लागले, आणि मी व ती सुरेख, गोड मुलगी मागं रेंगाळलों. मीं फार जपूनच तिच्या आगगाडींतल्या प्रकारासंबंधींच्या गोष्टी काढून तिला आपल्या मताकडे वळविण्याचा प्रयत्न करून पाहण्याचं ठरविलं. ती मात्र मुळींच घाबरलेली दिसली नाहीं, आणि मीं जें कांहीं सांगत होतों तें एखाद्या त्रयस्थानं ऐकून त्याला बरं वाटावं अशा प्रकारें ऐकत होती.

" मी म्हणालों, ' तुम्हीं थोडा विचार करा कीं, तुमच्या दृष्टीनं ही गोष्ट किती तापदायक होईल ? तुम्हांला कोर्टांत हजर रहावं लागेल, लोक तुमच्याकडे वेगवेगळया दृष्टीनं पाहतील, तुम्हांला सर्वांसमोर बोलावं लागेल, आणि जाहीरपणें आगगाडींत काय काय घडलं त्याचं वर्णन करावं लागेल. तुम्हांला असं नाहीं कां माझ्यासारखंच वाटत कीं, त्या गाढवाला जरा दटावणी दाखवून, कुणाची मदत न मागतां, पुढच्या स्टेशनावर तुम्हींच दुसऱ्या डब्यांत बसायला जायचं असतं असं?' ती मनमोकळेपणानं हंसली आणि म्हणाली, ' तुम्हीं म्हणतां तें सगळं खरं ! पण मीं काय करायला पाहिजे होतं ?–मी भ्यालें होतें, आणि एकदां कां आपण भ्यालों म्हणजे सुसंगतपणें विचार करत असतों का ? माझ्या धाबरटपणाचा परिणाम पाहतांच मीं उगीच आरडाओरडा केला याबद्दल मला वाईट वाटलं. पण तेव्हां वाईट वाटून काय उपयोग ? तुम्हीं हेंही पण लक्षांत घ्या कीं, तो मूर्ख एखाद्या वेड्या इसमाप्रमाणें माझ्या अंगावर धांवून आला. तो एक शब्ददेखील बोलला नाहीं. त्याला काय पाहिजे होतं हें सुद्धां मला कळलं नाहीं.'

" तिनं माझ्या नजरेला नजर भिडविली. ती घाबरल्यासारखी किंवा हारल्यासारखी दिसत नव्हती. मला वाटलं, आहे खरी ही एक सरळ सरळ व्यवहारी मुलगी. मोतीरामच्या हातून चूक कां घडली हें आतां मला पटत चाललं, आणि मी थट्टेनं पुढं म्हणालों, ' आतां बिचाऱ्याची त्याची ही चूक नव्हती हें तुम्हीं सरळ कां कबूल करत नाहीं ? तुमच्यासारख्या देखण्या मुलीसमोर बसून तिचं चुंबन घेण्याचा मोह कोणत्या महाभागाला आंवरेल ? '

" ती आणखींच मोकळेपणानं हंसली. तिची शुभ्र दंतपक्ति चमकून दिसूं लागली व ती म्हणाली, ' म्हटलं, इच्छा आणि प्रत्यक्ष कृति यांमध्यें आदराला एक

विशिष्ट स्थान असतं ! ' तिचा खरा अर्थ काय याचं मला कोडंच पडलं, आणि मीं लगेच विचारलं, ' पण असं पहा, मीं जर आतां तुमचं चुंबन घेतलं तर तुम्हीं काय कराल ? ' ती थबकली, तिनं मला नखशिखान्त न्याहाळलं, आणि शांतपणें उत्तर दिलं, ' तुम्हीं ?—तुमची गोष्ट वेगळी आहे. '

" मलासुद्धां याची जाणीव होतीच म्हणा, कारण माझ्या शहरीं मला शेजारीपाजारी उगाचच कांहीं ' देखणा हेमंत ' म्हणून म्हणत नसत. मी त्या वेळीं तीस वर्षांचा होतों. पण मीं तिला मुद्दामच विचारलं, ' कां बुवा ? '

" तिनं आपले खांदे उडवीत उत्तर दिलं, ' कारण तुम्हीं त्याच्यासारखे गद्धे नाहीं ! ' आणि माझ्याकडे एक चोरटा कटाक्ष टाकीत ती पुटपुटली, ' आणि कुरूप पण नाहीं. '

" ती मला चुकविण्याचा प्रयत्न करणार तोंच मीं तिच्या गालाचा मुका घेतला. ती चमकून दूर सरली आणि म्हणाली, ' तुम्हीं बरेच धीटदेखील आहांत एकूण ! पण पुन्हां असं नाहीं करायचं अं ? '

" मी पश्चात्ताप झाल्यासारखा चेहेरा पाडून हळूंच म्हणालों, " माझ्याबद्दल विचारल तर मॅजिस्ट्रेटसमोर मोतीरामच्यासारख्या अपराधाकरतां उभं राहणं मला खात्रींनं आवडेल.'

" ' कां बरं ? ' तिनं विचारलं.

" आतां मीं तिच्या नजरेला नजर भिडवीत उत्तर दिलं, ' कारण तुम्हीं जगांतल्या अद्वितीय, देखण्या स्त्रियांपैकीं एक आहांत, कारण तुमच्यावर अशा प्रकारची सक्ती करणं हा मला स्वतःचा गौरव वाटला असता, आणि लोक तुमच्याकडे पाहिल्यानंतर म्हणाले असते, " हेमंताला शिक्षा झाली तें ठीकच झालं, पण तो नशीबवान आहे येवढं खास ! " '

" ती पुन्हां गोडसं हंसली आणि उद्गारली, ' किती थट्टेखोर आहांत हो तुम्हीं ! ' आणि तिचं वाक्य पुरं होतं न होतं तोंच मीं तिला आपल्या बाहूंत कवटाळलं आणि तिच्या चेहेऱ्यावर जिथं जिथं मला जागा सांपडत गेली तिथं तिथं, कपाळावर, डोळ्यांवर, गालांवर, ओंठांवरसुद्धां तिचीं भराभर चुंबनं घेऊं लागलों. शेवटीं तिनं आपली सुटका करून घेतली. ती लाजली होती व रागारागानंच म्हणाली, ' तुम्हीं फारच गैरवर्तणूक करतां आहांत. मीं उगीच तुमचं इतका वेळ ऐकलं. '

" मीं जरा घाबरतच तिचा हात आपल्या हातांत घेतला. मी पुटपुटलों, 'मला क्षमा करा, बरं कां ? मीं एखाद्या पशूसारखं वर्तन केलं ! पण माझ्यावर रागवूं नका. जर तुम्हांला कळलं— '

" मी कांहींतरी सबब शोधण्याचा प्रयत्न करीत होतों, पण तिनं लगेच म्हटलं, 'मला कांहीं कळायला नको आहे.' तेवढ्यांत मला एक सबब सांपडलीच. मी गहिंवरून म्हणालों, 'लाडके, मी तुझ्यावर प्रेम करतों !'

" आतां मात्र तिला खरोखरच आश्चर्य वाटलं. तिनं वर नजर करून माझ्याकडे पाहिलं तसा मी म्हणालों, 'हो, हें खरं आहे ! आणि कसं तेंही ऐक. मोतीरामचा माझा कांहीं संबंध नाहीं, आणि त्याचं काय होईल याची मला पर्वाही पण नाहीं. त्याला उद्यां जर हातकड्या पडल्या व त्याच्यावर रीतसर खटला चालू झाला तर मला मुळींच वाईट वाटणार नाहीं.—मीं तुला इथं गेल्यावर्षी पाहिलं, आणि इतका भारून गेलों कीं तुझा विचार या क्षणापर्यंत माझ्या अंतकरणांत ठाणं मांडून बसला आहे. तुझा या गोष्टीवर विश्वास असेल किंवा नसेल याची मला तमा नाहीं. तूं मला तेव्हां सौंदर्यसाम्राज्ञी वाटलीस, आणि तुला पुन्हां केव्हां पाहीन असं मला झालं होतं. आतां मी त्या गद्धया मोतीरामची सबब पुढं करून इथं आलों आहे. संभाषणाच्या ओघांत मी वाहवलों, व माझ्या हातून होऊं नये ती चूक झाली, पण आतां मला क्षमा करणं सर्वस्वीं तुझ्या हातांत आहे.'

" तिला माझ्या डोळ्यांत खरेपणाचं प्रत्यंतर मिळालं असावं, पण ती हंसणार तोंच विचार बदलून उद्गारली, 'लबाड कुठले !' पण मीं आपला हात वर करून प्रामाणिक आवाजांत म्हणालों, (त्यांत अप्रामाणिक असं कांहीं खरोखरच नव्हतं), 'मी शपथ घेऊन सांगतों कीं मी जें कांहीं बोललों तें सर्व खरं आहे.' ती फक्त येवढंच म्हणाली, 'असं ?'

" आम्हीं एकटेच होतों, अगदीं एकांतांत; कारण शरद् आणि तिचा काका दुसरीकडेच कुठंतरी फिरतफिरत निघून गेले होते. मीं तिचे नाजुक हात दाबून त्यांचीं चुंबनं घेत तिला आपल्या प्रामाणिक प्रेमाचीं वचनं दिलीं. तीही मी बोलत होतों त्यांत सत्याचा अंश कितपत होता हें न कळल्यामुळें, व हा सात्विक अनुभव नवीनच पण आनंदमय वाटत असल्यामुळें, मुग्ध राहून मला बोलूं देत होती. शेवटीं मी जें कांहीं बोलत होतों त्यावर माझा स्वतःचाच विश्वास बसूं लागला. मी घाबरट, उत्सुक आणि प्रेममय होऊन गेलों व आपल्या बाहूनं तिच्या कंबरे-

भोंवतीं विळखा घातला. तोंड तिच्या कानांजवळ नेऊन मी हळूंहळूं प्रेमीजनांचा फालतूपणा तेथें ओतूं लागलों. ती शांतपणें सर्व सहन करीत होती.

" नंतर तिच्या हाताचा स्पर्श माझ्या हाताला झाला व तिनं माझा हात किंचित् दाबलासा केला. मीं तिच्या कंबरेचा आपला विळखा घट्ट केला. ती किंचित् माझ्या बाजूला कलली, आणि मीं तिच्या गालाचं चुंबन घेतलं. नकळत तिचे ओंठ माझ्या ओठांना लागले, आणि आम्हीं एकमेकांच्या अधरामृताचं सुधापान बेभानपणें करूं लागलो. आम्हीं त्या समाधिस्त स्थितींत किती वेळ बसून राहिलों असतों तें सांगवत नाहीं, पण इतक्यांत शेजारीं ' हं, हं, ' असा शब्द आणि खांकरण्याचा आवाज कानांवर आल्यामुळें ती मला सोडून शेजारच्या झुडुपाकडे पळाली, आणि मीं मागून शरद्‌ला येतांना पाहिलं. तो न हंसतां म्हणाला, 'एकंदरींत त्या गद्धया मोतीरामची भानगड ही अशी तडीस नेणार आहेस वाटतं तूं ? '

" मी अहंमन्यपणेंच उत्तरलों, ' दोस्ता, आपापल्या हातून जेवढं होऊं शकेल तेवढं प्रत्येकानं केलंच पाहिजे. तिकडे काकांशीं तूं काय ठरवलंस ? तूं त्याला संभाळ. पुतणीची जबाबदारी माझ्याकडे लागली '

" ' मी त्याच्याबाबतींत अजून इतका यशस्वी झालों नाहीं, ' तो उत्तरला. मी शरद्‌च्या हातांत हात घालून बंगलींत परत गेलों.

## ( ३ )

" रात्रीं जेवणाच्या वेळीं तर माझी शुद्धबुद्धच हरपल्यासारखी झाली. मी तिच्या शेजारींच बसलों होतों, आणि आम्हीं एकमेकांकडे चोरट्या नजरेनं पहात, गालांतल्यागालांत हंसून वेळ घालवीत होतों.

" जेवणानंतर आम्हीं चांदण्यांत फिरण्याचं ठरविलं. मला जेवढे कांहीं मंजुळ प्रेमानं भरलेले शब्द आठवत होते तेवढे मी तिच्या कानांत कुजबुजूं लागलों; शरद् आणि तिचा काका पुढं पुढं, राजकारणाचा काथ्याकूट करीत, चालले असतांना मी मागं रेंगाळत मधून मधून तिचीं चुंबनं घेत होतों. आम्हीं घरांत आल्यानंतर तारेच्या शिपायानं एक तार आणून दिली. घरमालकीण दुसऱ्या दिवशीं सकाळीं सातच्या गाडीनं परत येणार असा तिच्यांत मजकूर होता.

" बरं, ज्योत्स्ना, आतां असं कर, या गृहस्थांना त्यांच्या खोल्या दाखवून दे, ' तिचा काका म्हणाला. आमच्याकडे वळून तो उद्‌गारला, ' आतां आपण विश्रांति घ्या; सकाळीं उठून सर्व ठरवून टाकूं. '

"ज्योत्स्नेनं शरदूला त्याची खोली अगोदर दाखविली. तो माझ्या कानांत कुजबुजला, 'तुझी खोली आधीं दाखविली असती तर कांहीं बिघडलं नसतं.' ती मला माझ्या खोलींत घेऊन गेल्यानंतर मीं तिला लगेच आपल्या बाहुपाशांत लपेटलं, आणि भडकवण्याचा प्रयत्न करूं लागलों. पण तिला स्वतःच्या मनावरचा ताबा उडतासा दिसूं लागतांच ती झटकली, आणि आतां रात्रभर जागरण करीत आपणांला पडून रहावं लागणार या हताश कल्पनेनं मी अंथरुणांत शिरलों. मीं ही छान संधी कशी गमावली याचा विचार करीत होतों इतक्यांत दारावर थाप पडली. कोण आहे असं मीं विचारतांच उत्तर आलं, 'मी.'

"मी ताड्दिशीं उठलों आणि दार उघडलं. ज्योत्स्नेनं विचारलं, 'तुम्हांला सकाळीं चहा, कॉफी, कोको वगैरे काय हवं असतं तें मी मघां विचारायचं विसरलें होतें?' मी उत्तर देण्याच्या मनःस्थितीत नव्हतोंच. मीं तिला आंत ओढलं आणि तिचं चुंबन घेत पुटपुटलों, 'मला-तूं, ज्योत्स्ना तूं-हें-' पण ती पुन्हां निसटली आणि आपल्या खोलीकडे पळाली. मी आतां वेडा झालों होतों. मीही तिच्या मागोमाग बाहेर आलो.

"आतां काय करायचं? मी विचार करण्याकरतां थांबूं शकत नव्हतों. मला फक्त तिला शोधून काढायचं होतं, आणि तें तर मी करणारच हें ठरवून टाकलं. मी कांहीं पावलं पुढं गेलों देखील; पण लगेच विचार केला कीं, समजा आपण तिच्या काकाच्या खोलींतच जाऊन ठेपलों, तर त्याला काय सांगणार? मी लगेच थबकलों. माझं डोकं सुन्न झालं होतं, काळीज धडधडत होतं.

"मला थोड्याच वेळांत उत्तर सुचलं. आपण म्हणणार, 'मी शरद्ला शोधत होतों, त्याच्याशीं एका महत्वाच्या बाबतींत खलबत करायचं होतं.' मी प्रत्येक दाराकडे पाहूं लागलो, आणि मनाचा घडा करून त्यांपैकीं एक उघडून आंत गेलों. अहाहा! माझी प्रेमदेवता ज्योत्स्ना आपल्या अंथरुणावर बसून अश्रू गाळीत होती. तिनं माझ्याकडे पाहिलं. मीं सथपणें दार बंद केलं, आणि तिच्याजवळ जाऊन म्हणालों. 'मला कांहीं वाचायला देशील कां हें मी मघां विचारायचं विसरलों होतों.'

"मीं कोणतं पुस्तक वाचलं हें तुला स्पष्टपणें सांगितलंच पाहिजे कां? कारण ती एक अप्रतिम आणि गोड नवलकथा आहे, अमरांतलं अमर काव्य आहे; व मी जेव्हां पहिलं पान उलटवलं तेव्हां ज्योत्स्नेनं मला हवीं तेवढीं पानं उलटवूं दिलीं, आणि आम्हीं इतकीं प्रकरणं वाचलीं कीं सांगतां सोय नाहीं.

" मीं तिचे आभार मानून चोरट्या पावलांनीं आपल्या खोलीकडे परत जात असतांना मला कुणींतरी मागून झटक्यानं धरून ओढलं, आणि शरद्चा आवाज माझ्या कानांत शिरला, ' अजून तूं मोतीरामची भानगड मिटविली नाहींच वाटतं ? '

" सकाळीं सात वाजतां तिनं स्वतःच जो चहा मला आणून दिला तो इतका चवदार होता कीं कप ओंठांपासून दूर करवेना. ती परत गेल्यानंतर लगेच शरद् माझ्या खोलींत आला, आणि झोप न झालेल्या माणसासारखा चिडून म्हणाला, ' तूं जर असा फाजीलपणा करत राहशील तर त्या गद्धया मोतीरामचं प्रकरण बिघडवून बसशील. '

" आठ वाजतां ज्योत्स्नेची काकू आली. एकंदर गोष्टीचा खुलासा करायला आम्हांला फारच थोडा वेळ लागला, आणि त्या शहरांतल्या गोरगरीबांना देणगी म्हणून अडीचशें रुपये मी मेहेताच्या स्वाधीन केले. आम्हीं आणखीं एक दिवस मुक्काम वाढवून शेजारचीं लेणीं पहावीं असा मेहेता पतिपत्नींनीं आग्रह केला; आपल्या काकाच्या मागं उभी असलेली ज्योत्स्नासुद्धां मला खुणावून थांबण्याकरतां सुचवूं लागली, पण शरद् मुळींच ऐकेना. मीं त्याला एकीकडे नेऊन त्याची शक्य तेवढी मनधरणी केली, पण तो अगदीं चिडून उत्तरला, ' त्या गद्धया मोती-रामची भानगड झाली तेवढी पुरे झाली, समजलास ! '

" मलाही त्याच्याबरोबर जाणं भागच पडलं. पण आमच्या विरहाचा तो क्षण माझ्या आयुष्यांतला एक अत्यंत कठिण प्रसंग होता. मी जिवांत जीव असेतों ती भानगड मिटवीत राहण्याचं कबूल केलं असतं. आम्हीं आपल्या डब्यांत बसल्यावर तिचा निरोप घेतला तेव्हां मी शरद्ला म्हणालों देखील, ' तूं निव्वळ पशू आहेस ! ' पण तो येवढंच उद्गारला, ' मित्रा, मला तुझी भीति वाटूं लागली होती. '

" आम्हीं कचेरींत पोहोंचतांच मला तिथं लोकांची गर्दी आढळून आली. आम्हांला पाहतांच त्यांनीं विचारलं, ' त्या गद्धया मोतीरामची भानगड शेवटीं तुम्हीं मिटविली कीं नाहीं, संपादक महाराज ? ' सर्व शहरभर या प्रकरणाबद्दल खळबळ माजून राहिली होती हें उघड होतं. शरद्चं डोकं प्रवासांत ताळ्यावर आलं होतं; तो हंसतच उत्तरला, ' होय बाबा, पण त्याबद्दल हेमंताचे आभार मानायला पाहिजेत. '—आम्हीं मोतीरामच्या घरीं गेलों.

" तो एका आरामखुर्चीवर बसला होता. पायांवर मोहरीच्या पोटिसाचीं पुटं आणि डोक्यावर थंड पाण्याच्या घड्या अशा अवतारांत स्वारी हताश होऊन पडली होती. तो मोठ्या कष्टानं खांकरत होता, पण माणसाला शेवटच्या क्षणीं होतो तसा हा खोकला त्याला कुठं जडला हें कुणी सांगूं शकला नसता. त्याची बायको तर त्याला खायला टपून बसलेल्या वाघिणीसारखीच तिथं उभी होती. आम्हांला पाहतांच मोतीराम उठून बसण्याचा निष्फळ प्रयत्न करूं लागला, पण त्याला शांत करीत मी म्हणालों, ' आम्हीं सर्व ठरवून आलों बरं कां, मोतीराम; पण पुन्हां असं कांहीं करूं नकोस. '

" तो धडपडत उठून बसला, माझे हात आपल्या हातांत घेऊन त्यांचे मुके घेऊं लागला. तो रडत होता, बेशुद्ध होण्याच्या बेतांत आला होता; पण त्यानं अगोदर शरद्‌ला आणि नंतर आपल्या बायकोलाही मिठी मारली. पण त्या चांडाळणीनं त्याला असा एक धक्का दिला कीं तो परत खुर्चीवर धप्पकन् जाऊन पडला.

" मोतीराम या प्रकरणानंतर पुढं सांवरूच शकला नाहीं. त्याला लोकांनीं नेहमींकरतां गद्धाच ठरवून टाकलं होतं तें त्यांचं मत थोडंच बदलणार होतं? दोन वर्षांनंतर तो मेला.

" दहा वर्षांनंतर मी निवडणुकीच्या दौऱ्यावर निघालों असतांना शेजारच्या एका शहरीं एका सरकारी अधिकाऱ्याकडे त्याच्या मताची याचना करण्याकरतां गेलों तेव्हां उंच, देखण्या, ऐषआरामांत वाढलेल्या अशा त्याच्या पत्नीनं माझं स्वागत केलं.

" ' तुम्हीं मला ओळखलं नाहीं ? ' ती म्हणाली.

" मी पुटपुटलों, ' क्षमा करा अं,-मला-नीट-आठवत-'

" ' ज्योत्स्ना मेहेता ? ' ती हंसत म्हणाली.

" ' अँ ? ' येवढाच उद्गार माझ्या तोंडून कसाबसा बाहेर पडला. मी शरमलों. पण ती मात्र मुळींच भांबावलेली दिसली नाहीं.

" ती घरांत निघून गेल्यावर जेव्हां आम्हीं दोघेच पुरुष गोष्टी करूं लागलों तेव्हां माझा हात आपल्या हातांत कृतज्ञतेनं दाबून तो गृहस्थ म्हणाला, ' मी आज कितीतरी दिवस तुमची भेट घेईन घेईन म्हणतों, संपादक महाराज, पण योगायोग जुळूनच येत नाहीं माझ्या बायकोनं तुमच्याबद्दल मला कितीदांतरी सांगितलं. तुमची तिची भेट कशा विचित्र परिस्थितींत झाली, तुम्हीं किती समंजस-

पणें वागलांत, तुम्हीं किती खुबी दाखविली त्या–' तो अडखळला, आणि आवाज धिमा करीत आपण कांहींतरी अश्लील बोलतों आहोंत या भावनेनं पुढं म्हणाला, '–त्या गद्ध्या मोतीरामच्या प्रकरणांत—' ''

---

# युक्ति-

म्हातारे डॉक्टर आणि त्यांची तरुण पेशंट असे दोघे तिच्या घरीं गप्पा-गोष्टी करीत बसले होते. तिला कांहीं विशेष व्यथा होती अशांतला भाग नव्हता; फक्त सुरेख स्त्रियांना मधूनमधून जडत असलेल्या नेहमींच्या किर-कोळ आजारांपैकीं एक तिलाही जडलासें वाटत होतें येवढेंच. किंचित् रक्ताचा अभाव, थोडासा घाबरटपणा आणि थकवा,–लग्न झाल्यावर एका महिन्यानंतर प्रेमी जोडप्यांना हटकून येत असणारा तो थकवा असावा बहुतेक,–हीं तिच्या रोगाचीं लक्षणें होतीं.

ती कोचावर आळसून रेलली होती, आणि म्हणाली, '' डॉक्टर तुम्हीं कांहींही म्हणा, पण बायका आपल्या नवऱ्याशीं कशा बेइमान होऊं शकतात हेंच मला कळत नाहीं. बायकोचं आपल्या नवऱ्यावर प्रेम नसेल, तिला लग्नांत देवां–ब्राम्हणांसमोर घेतलेल्या शपथांची चाड वाटत नसेल, तरीहीपण ती कुठल्याही एका परक्या पुरुषाच्या बाहूंत स्वतःला लोटून द्यायला कबूल होईल हेंच मला पटत नाहीं. तिचा हा चोरटा व्यवहार लोकांच्या नजरेंतून लपून राहील तरी कसा ? एकीकडे धडधडीत असत्याचरण आणि विश्वासघात करीत असतांना दुसरीकडे प्रेम करत राहणं हें शक्य तरी आहे ? ''

डॉक्टर हंसले. ते म्हणाले, '' हें अगदीं सोपं आहे. स्त्रीनं एकदां वांकडं पाऊल टाकायचं ठरवलं म्हणजे मग ती या किरकोळ तपशीलाचा विचारच करत नाहीं याबद्दल मी खात्री देतों. एका मोठ्या लेखकानं म्हटलं आहे त्याप्र-माणें दिवसभर बऱ्यावाईट शब्दांची देवाण-घेवाण आणि रात्रीं चालचलाऊ आलिं-गनां-चुंबनांची परतभेट यापलीकडे विशेष महत्व नसलेल्या लग्नानंतरच्या धिसा-डघाईंत कांहीं काळ आयुष्य घालविल्यानंतरच स्त्रीच्या मनांत खऱ्या प्रेमाचं बीं रुजत असतं असंही मला वाटूं लागलं आहे. कोणतीही स्त्री तिचं लग्न झाल्या-शिवाय जिवाभावानं प्रेम करूं शकतच नाहीं हें अगदीं वज्रलेप सत्य आहे.

" चकवाचकवीबद्दल म्हणाल, तर अशा प्रसंगीं बायका ती वाटेलतशी करूं शकतात. त्यांतल्यात्यांत भोळ्याभाबड्या दिसणाऱ्या तर या बाबतींत खूपच तरबेज असतात, आणि अशा प्रसंगीं दुर्दम्य अडचणींतूनही सफाईनं आपली सुटका करून घेतात. "

डॉक्टरांनीं आपले हात वर केले. " तुम्हीं म्हणतां, तसं होऊंच कसं शकतं ? आतां माझ्या एका पेशंट बाईची हकीकतच मी तुम्हांला सांगतों म्हणजे हे तुमच्या लक्षांत येईल.–या बाईला मी सद्गुणांची पुतळी समजत असे.

" ही एक साधारण मोठ्या शहरांतली गोष्ट आहे. एके दिवशीं रात्रीं मी गाढ झोंपीं गेलों होतों, आणि पूर्वरात्रींतल्या त्या झोंपेंतून उठण्याची आपली साहजिकच इच्छा नसते. पण त्या झोंपेंत घरासमोरून आग विझवणाऱ्या पाण्याच्या बंबाची मोटार जातांना जशी घण्घण् घंटा वाजवते तसा आवाज मला स्वप्नांत आल्यासारखा वाटला, आणि मी खाड्दिशीं जागा झालों. पण माझ्या घरांतली खालचीच घंटा जोरजोरानं वाजत होती, व नोकरानं लौकर दार उघडलं नाहीं म्हणून मीं आपल्या अंथरुणाशेजारचं त्याच्या घंटेचं बटन दाबलं. त्याच्या पायाची चाहूल मला लागली, आणि थोड्या वेळांत तो एक चिठ्ठी घेऊन आला: ' डॉक्टर श्रीनिवास, कृपा करून तावडतोब माझ्या घरीं येण्याचें कराल काय ?– सौ० सविता ठक्कर. '

" मला क्षणभर विचार पडला. मला वाटलं, असेल कांहींतरी घाबरटपणा, साधी पोटदुखी, वाफारा वगैरे देण्याची जरूर,–फालतूपणा मोठ्या लोकांचा!– आपणांला आतां आळस येतोय्, सकाळीं पाहूं. मीं उत्तर पाठविलं, ' डॉक्टर श्रीनिवासनां बरें वाटत नसल्यामुळें सौ. ठक्करनीं कृपा करून डॉक्टर सुखात्म्यांना बोलावून घ्यावें. '

" मीं नोकराला चिठ्ठी दिली आणि पुन्हां झोंपीं गेलों, पण अर्ध्या तासानंतर खालची घंटा फिरून वाजली, आणि नोकर येऊन म्हणाला, ' खालीं कुणीतरी आलं आहे. तो इतका कपड्यांत गुरफटला आहे कीं तो माणूस कां बाई तें मला ओळखतां आलं नाहीं. पण त्याला तुमच्याशीं तावडतोब बोलायचं आहे. तो म्हणतो, दोन माणसांच्या जगण्यामरण्याचा प्रश्न आहे. ' मी उठून बसलों आणि त्या व्यक्तीला वर पाठवून द्यायला सांगितलं.

" तो व्यक्ति आंत आल्यावर तिनं चेहऱ्यावरचा बुरखा वर केला. ती सविताबेन ठक्कर, गेलीं तीन वर्षं लग्न झालेली, त्या शहरांतल्या एका प्रसिद्ध

व्यापाऱ्याची तरुण बायको होती. त्या भागांत ती सर्वांत सुंदर गणली जात असे.

"त्या बाईचा चेहेरा अगदीं फिक्कट पडला असून ती ओंठांची आणि डोळयांची एखाद्या वेड्या बाईसारखी हालचाल करीत होती. तिचे हात थरथर कांपत होते. तिनं दोनदां बोलण्याचा प्रयत्न केला आणि अखेर ती कशीबशी पुटपुटली, 'चला-डॉक्टर-लौकर चला. चला ना,-माझा-माझा प्रियकर आत्तां माझ्या निजण्याच्या खोलींत मेला.' तिचा कंठ दाटून आला, आणि ती पुढें म्हणाली, 'शेठजी इतक्यांत-क्लबांतून घरीं परत येतील.'

"मीं ताड्दिशीं पलंगावरून खालीं उडी मारली व कपडे चढवूं लागलों. 'तुम्हींच आत्तां थोडया वेळापूर्वी आलां होतां काय?' मीं विचारलं.

"'नाहीं,' ती एखाद्या पुतळ्यासारखी स्तब्ध राहून उत्तरली. 'माझी दासी आली होती-तिला सर्व माहीत आहे.' ती थोडा वेळ चुप राहिली आणि मग म्हणाली, 'मी तिथंच-त्याच्या जवळच होतें.' तिनं एक किंकाळी फोडली, आणि ती आंवढा गिळल्यासारखं करून मुसमुसून रडूं लागली. एकदोन मिनिटांनीं तिचे अश्रू थांबले, आणि ती पुन्हां पूर्ववत् शांत होऊन म्हणाली, 'चलतां ना लौकर?'

"मी तयार होतों, पण म्हणालों, 'मी मोटार काढायला सांगायचं विसरलों.'

"'मी घेऊन आलें आहे,' ती म्हणाली. 'ती त्यानंच आणलेली आहे आणि त्याच्याकरतांच थांबून होती.' तिनं पुन्हां बुरखा नीट घेतला व आम्हीं निघालों.

"आम्हीं मोटारींत बसून ती चालू झाल्यावर सौ. ठक्करनं माझा हात आपल्या हातांत धरून खूप जोरानं दाबला व ती कांपऱ्या आवाजात म्हणाली, 'मला या वेळीं काय यातना होतात त्या मी तुम्हांला कशा सांगूं, डॉक्टर? माझं त्याच्यावर प्रेम होतं, मी त्याला एखाद्या वेडीप्रमाणें गेले सहा महिने आपलं जीवितसर्वस्व मानून घेतलं आहे.'

"'तुमच्या घरांत कुणी जागे आहेत काय?' मीं विचारलं.

"'नाहीं, राधेशिवाय कुणींच जागं नाहीं. आणि तिला सर्व माहीत आहे.'

"मोटार ठक्करांच्या दाराशीं थांबली. घरांत शुकशुकाट दिसत होता. सविताबेननं बाहेरच्या दाराची कडी काढली, आणि आम्हीं आंगठ्यांवर चालत जिना चढूं लागलों. घाबरलेली दासी वरच्या पायरीवर मुकाट्यानं बसून होती.

मीं बाईच्या निजावयाच्या खोलींत प्रवेश केला तों तिथलं सामान धिंगामस्तीमुळें व्हावं तसं अस्ताव्यस्त पडलं होतं. पलंगावरच्या अंथरुणावरची चादर फरदिशीं ओढून खालीं फेंकून दिलेली होती, आणि दोनतीन ओले हातरुमाल,-कदाचित् त्या माणसाचा चेहेरा पुसलेले,-खालीं लोळत होते. खोलीभर अमोनियाचा वास दरवळत होता.

" मृत माणसाचं शरीर खोलीच्या मधोमध हातपाय लांब ताणून पडलं होतं. मीं त्याच्याजवळ गेलों, त्याच्याकडे पाहिलं, व त्याला स्पर्श केला. मीं त्याच्या पापण्या वर करून पाहिल्या, नाडी तपासली, आणि चोरट्यासारख्या उभ्या असलेल्या त्या दोन स्त्रियांना म्हणालों, ' याला पलंगावर निजवूं या. जरा धरा पाहूं एकीकडून. ' आम्हीं हळूंच त्याला अंथरुणावर निजविल्यानंतर मीं त्याचं काळीज तपासलं, खिशांतला छोटा आरसा काढून नाकपुड्यांसमोर धरला आणि जाहीर केलं, ' सर्व कांहीं संपलं याच. आपण झटपट याला कपडे घातले पाहिजेत. ' तें दृश्य भयानकच होतं !

" मी त्याचे एकएक अवयव आळीपाळीनं धरून ठेवींत होतों, आणि त्या बाया एखाद्या मोठ्या भावल्याला चढवावे तसे त्याचे कपडे,-मोजे, चड्डी, पँट, शर्ट वगैरे त्याला घालीत होत्या. पण त्याच्या कोटांत त्याचे हात घालतांना बरीच अडचण पडली.

" जोड्यांचेंही तसंच झालं. त्याचीं पावलं किंचित् सुजून आलीं असल्या-मुळें व एकदोन छिद्रांतून बंद निघून गेले असल्यामुळें बूट बांधतांना बायांना आपल्या डोक्यांतील आंकड्यांचा उपयोग करावा लागला. प्रेताचा येथवरचा भयंकर शृंगार आटोपल्यावर मीं त्याच्याकडे पाहिलं, आणि म्हटलं, ' याचे केस नीटनेटके विंचरायला हवेत.' दासी आपल्या मालकिणीचा मोठा कंगवा आणि ब्रश घेऊन आली, पण तिचे हात थरथरूं लागले व केंस ओढल्या जाऊं लागले. हें पाहून सविताबेननं पुढं होऊन स्वतःच हळुवारपणें त्याचे केंस चोंपूनचापून विंचरून दिले. जणूंकाय तो जिवंतच आहे या भावनेनं तिनं त्याच्या छोट्याशा मिशीचे आंकडे देखील पिळून वर चढविले. कदाचित् याचा तिला त्याच्या जिवंतपणीं सरावसुद्धां असेल !

" लगेच तिनं आपल्या प्रियकराचा निर्जीव चेहेरा आपल्या दोन्ही हातांत धरला आणि हताश नजरेनं आतां कधाही आनंदी न दिसूं शकणाऱ्या त्या तोंडाकडे

ती टक लावून पाहूं लागली. मग तिनं आपले हात मागं घेऊन धाड्दिशीं त्या प्रेतावर पडून त्याला आपल्या बाहुपाशांत कवटाळलं आणि त्याचं तोंडभर चुंबन घेतलं. तिनं त्याच्या मिटलेल्या ओंठांवर, डोळ्यांवर, कपाळावर, गालांवर चुंबनांचा वर्षाव केला, आणि त्याच्या कानाजवळ तोंड नेऊन एखादी गुजगोष्ट सांगून त्याला वेडा करावा अशा आविर्भावानं पण केंविलवाण्या स्वरांत ती पुटपुटली, ' चाललास, लाडक्या ?—जातोस ना मला सोडून शेवटीं ?—'

" घड्याळांत बाराचे ठोके पडतांच मी भानावर आलों. ' क्लब बंद व्हायची वेळ झाली, ' मी म्हणालों. ' चला, बाईसाहेब, आतां थांबण्यांत अर्थ नाहीं ! '

" माझे शब्द ऐकतांच तीही शुद्धीवर आली. मी पुढं म्हणालों, ' याला अगोदर खालीं दिवाणखान्यांत नेला पाहिजे. '—आम्हीं त्याला खालीं नेऊन दिवाणखान्यांत एका कोचावर निजवून दिवे लावले तोंच समोरच्या दाराचा आवाज झाला. घरमालक परत आला होता. मी मोठ्यानं म्हणालों, ' राधा, पाण्याचं भांडं आणि दोनतीन रुमाल घेऊन ये. खोली नीटनेटकी कर लौकर. शेठजी आले वाटतं '

" मला त्याच्या पावलांची चाहूल लागली होती. तो आमच्याच रोखानं येत होता. ' या इकडे, ठक्कर शेठजी, ' मी म्हणालों. ' पाहिलंत हा काय अपघात झाला तो ! '

" चिरूट तोंडांत धरलेली घरमालकाची मूर्ति दारांत उभ्याउभ्याच विचारती झाली, ' काय, झालं तरी काय ? काय आहे ही भानगड ? '

" ' मित्रा, ' मी शांतपणें म्हणालों, ' आम्हीं फार अडचणींत सांपडलों आहोंत. दोन तासांपूर्वी मी आणि माझा हा मित्र त्याच्या मोटारींतून तुमच्या घरीं आलों, आणि बाईसाहेबांशीं गप्पागोष्टी करीत बसलों असतांना याला एकाएकीं घेरी आली, आणि माझे प्रयत्न चालूंच आहेत तरी तो शुद्धीवर येण्याचीं लक्षणं दिसत नाहींत. शेजाऱ्यापाजाऱ्यांना उगीच बोलावणं माझ्यासारख्या डॉक्टरला पसंत नाहीं, पण जर तुम्हीं याला मोटारीपर्यंत नेऊं लागण्याकरतां मला मदत कराल तर मी याला याच्याच घरीं घेऊन जाऊन मला योग्य वाटतील ते उपचार करीन. '

" ठक्करशेठजींना आश्चर्य वाटलं असावं, पण संशय खास आला नाहीं. त्यानं टोपी काढून ठेवली, व त्या प्रेताला खाकांखालीं हात घालून उचललं. हा

गेले सहा महिने आपला सवत्या होता व तो आतां तसा राहण्याची भीति नको याची त्याला कल्पनाही नसेल! मीं प्रेताच्या तंगड्या धरल्या आणि आम्हीं दारा-बाहेर मोटारीपाशीं पोहोंचलों. सविताबेन ठक्कर आमच्यामागं येत होती. मग मीं एकट्यानं तें प्रेत धरलं आणि त्याला उद्देशून म्हणालों, 'ऊठ रे आतां, पुष्कळ वेळ झाला. मला वाटतं तुला बरं सुद्धां वाटूं लागलं असेल. जरा प्रयत्न तर करून पाहशील!' पण तें जड धूड माझ्या हातांतून घसरूं लागलं होतं, म्हणून मीं त्याला मागून एक धक्का दिला व तो आंतल्या बैठकीवर जाऊन पडला. मी लगेच त्याच्या पाठोपाठ आंत जाऊन दार बंद केलं.

"शेठजीला आतां जरा काळजी वाटूं लागली कीं काय, तो म्हणाला, 'डॉक्टर कांहीं कमीजास्त तर नाहीं हो?' मी लगेच हंसून उत्तरलों, 'छट्,' आणि मीं सविताबेनकडे पाहिलं. सौ० ठक्कर आपल्या हक्काच्या नवऱ्याच्या हातांत हात घालून मोटारीच्या आंत डुंकून पाहण्याचा प्रयत्न करीत होती.

"मीं घरमालकाला नमस्कार करून ड्रायव्हरला मोटार हांकल्यास सांगितलं. मोटार चालत असतां तें प्रेत पुनःपुन्हां माझ्या अंगावर पडत होतं.–आम्हीं त्याच्या घरीं पोहोंचल्यावर तो घरीं येतांना रस्त्यांत बेशुद्ध झाला असं मीं सांगितलं, त्याला घरांत नेलं, आणि पुन्हां एकदां वैद्यकीय तपासणीची बतावणी करून तो मेला असं जाहीर केलं–शेवटीं मी घरीं पोहोंचल्यावर प्रेमीजनांच्या नांवानं खडे फोडतच पुन्हां अंथरुणांत शिरलों."

डॉक्टर थांबले. त्यांच्या चेहेऱ्यावर पुसट हंसूं विलसत होतें. त्यांची तरुण पेशंट फारच घाबरल्यासारखी दिसली. तिनें विचारलें, "तुम्हीं ही भयंकर गोष्ट मला कशाला सांगितली डॉक्टर?"

ते उठून उभे राहिले. "कधीं जरूर पडल्यास तुम्हीं माझी आठवण असूं द्यावी म्हणून," ते म्हणाले. "नमस्ते!"

---

# बचावलें !-

यामिनी चेंडूसारखी दारांतून झपाट्यानें आंत आली. तोंडांतून शब्द काढण्याच्या आधींच तिनें हंसायला सुरुवात केली; हंसतां हंसतां तिच्या डोळ्यांत अश्रू तरंगूं लागले. आपला नवरा निव्वळ गाढव आणि मत्सरग्रस्त असा वाटत असल्यामुळें त्याच्याशीं सूडाखातर, पण फक्त एकदांच तेवढी, आपण कशीकाय प्रतारणा केली होती हें तिनें आपल्या मैत्रिणीला एका महिन्यापूर्वी सांगितलें होतें, तेव्हां ती अशीच हंसत सुटली होती.

सुभगानें ती वाचत असलेलें पुस्तक सोफ्यावर फेंकून दिलें आणि ती कुतूहलपूर्वक यामिनीकडे पाहूं लागली. तिला स्वतःलाही हंसूं आलें आणि तिनें शेवटीं विचारलें, " आतां आणखीं काय पराक्रम करून आलीस तूं ? "

" अग बाई, मी-काय-अन्-कसं-सांगूं-तुला ! हाः-हाः-अशी मजेदार गंमत झाली कीं नाहीं,-तुला पटेल कां मीं सांगितलं तर ? मी बचावलें गडबाई बनावलें,-खरंच बचावलें ! "

" काय, बचावलीस ? "

" हो, हो, बचावलें ! "

" अग पण कशापासून ? "

" माझ्या नवऱ्याच्या हातून मी बचावलें, सुभगा ! मी मोकळी झालें ! मुक्त, अनिर्बंध, स्वतंत्र ! "

" स्वतंत्र ? आणि कोणत्या बाबतींत ? "

" कोणत्या ? काडीमोड ! घटस्फोट ! मला आतां घटस्फोट मिळालाच असं समज ! "

" म्हणजे तुला घटस्फोट मिळाला कीं काय ? "

" अग अजून नाहीं मिळाला. तूं तरी अगदीं हीच आहेस ! तीन तासांत कां कुणाला घटस्फोट मिळत असतो ? पण आतां त्याच्या बदफैलीपणाबद्दल माझ्याजवळ सबळ पुरावा आहे.-त्याला अगदीं मुद्देमालासकट उघडकीला आणलं मीं-समजलं कां तुला ?-अगदीं प्रत्यक्ष कृती करत असतां !-आतां सांग पाहूं तो कसा निसटेल तें ? "

" मग तर मला सर्व कांहीं सांगूनच टाक, यामिनी. शेवटीं त्यानं तुला फशीं पाडलं तर ! "

" हो, म्हणजे नाहीं -हो आणि नाहीं - मला तें काय तें नक्की सांगतां यायचं नाहीं.-पण एकंदरींत मला बळकट पुरावा लाभला आहे, आणि तो मिळणं हेंच तर मुख्य काम असतं ! "

" पण तूं कसं काय घडवून आणलंस हें ? "

" कसं घडवून आणलं ? म्हटलं, तेंच सांगतें आतां तुला. मी गेले कांहीं दिवस खटपटींत आहे, सारखी खटपटींत. गेले तीन महिने तो अगदीं लोचट, पशूसारखा, दांडगेश्वर आणि निर्दय झालेला आहे. एका शब्दांत सांगायचं म्हणजे तो मला नकोसा झाला आहे. तेव्हां मीं विचार केला कीं हें असं चालायचं तरी कुठवर ? आपण आपला काडीमोड करावा म्हणजे झालं ! पण तें घडून कसं येणार ?-या गोष्टी वाटतात तेवढ्या सोप्या नसतात कांहीं ! त्यानं मला मारहाण करावी म्हणून मीं प्रयत्न करून पाहिला, पण तो तसं करीना. सकाळपासून रात्रींपर्यंत तो मला सतावून सोडी. माझी बाहेर जायची लहर लागत नसे तेव्हां तो मला घराबाहेर हांकलायचा; मी आपल्या मैत्रिणीकडे जाईन म्हटलं तर मला धरून हलूं देईना. दर दिवशीं आणि आठवडेच्या आठवडे तो मला आपला जीव नकोसा करी, पण मारहाण मात्र करायचा नाहीं.

" मग त्याची एखादी रखेली आहे कीं काय याची मीं चौकशी चालविली. त्याची मेनका नांवाची एक बया आहे असं मला कळलं. पण तिची भेटगांठ घेण्याच्या बाबतींत तो भलताच दक्ष असे. त्यांना एकत्र पकडणं अशक्य होतं. मग मीं काय केलं असेल असं तुला वाटतं ?-सांग पाहूं ? "

" मला नाहीं बाई सुचत कांहीं. "

" कध्धींच नाहीं सुचायचं तुला.- त्या अवदसेचा एक फोटो मिळवून द्यायला मीं आपल्या भावाला सांगितलं. माझ्या भावाला एकंदर दहा रुपये खर्चावे लागले. त्यांत संध्याकाळपासून मध्यरात्रीपर्यंतच्या सबंध कार्यक्रमाचा खर्च आला,- एक खाना, सिनेमा आणि फोटोग्राफ "

" पण मला वाटतं, तुझ्या भावाला इतर कोणतीही युक्ति करून,-म्हणजे त्या फोटोवालीलाच न घेतांही तिचा फोटो मिळवितां आला असता, नाहीं ? "

" अग नाहीं ग, ती तशी सुरेख आहे.- आणि तसं पाहिलं तर माझ्या भावाला देखील तसा विधिनिषेध होता असं थोडंच आहे ? शिवाय मला तिच्या

बाबतींत खडानूखडा माहिती पाहिजे होती ती ?-तिच्या शरीराची रचना, तिची छाती, रंग, म्हणजे कित्ती कित्ती तरी तपशील."

"मला हें कोडं उलगडत नाहीं बाई, यामिनी."

"येईल तें हळूंहळूं तुझ्या लक्षांत -मला जेव्हां हवी होती ती सर्व माहिती मिळाली तेव्हां मी या धंद्यांतल्या एका,- म्हणजे ते नसतात कां ग ? सर्व प्रकारचे धंदे करतात ते कंत्राटदार,—प्रसिद्धी भानगड वगैरे या पंचाइतींत मुरलेले,-त्या व्यापाऱ्याकडे गेलें.-आतां बाकी तुला हें समजायला पाहिजे हं, सुभगा !"

"जवळपास आलं माझ्या ध्यानांत तें. पण तूं त्याला काय सांगितलंस ?"

"मीं त्याला मेनकेचा फोटो दाखवून सांगितलं 'हें बघा, मला या बाईसारखी एक दासी हवी आहे. ती सुरेख, स्वच्छ आणि चुणचुणीत असायला पाहिजे. मा तिला जेवढा जरूर असेल तेवढा पैसा देईन. मला पन्नास-शंभर रुपये खर्च आला तरी हरकत नाहीं. मला ती फक्त तीन महिन्याकरतां हवी आहे.'

"तो दलाल जरा आश्चर्यचकित होऊन माझ्याकडे पाहूं लागला, आणि म्हणाला, 'तुम्हांला सालस गुणांची नोकर पाहिजे आहे काय ?' मी किंचित् ओशाळलें आणि पुटपुटलें, 'हो तर, ती प्रामाणिक असली पाहिजे.' त्याचा दुसरा प्रश्न, 'आणि-नीतीच्या दृष्टीनं ?'-तोंडानं बोलून दाखवायचा माझा हिय्या होईना-मी फक्त हळूंच मान हलविली. आणि लगेच माझ्या नकाराचा त्यानं भलताच अर्थ तर केला नसेल असं वाटून मी बोलून गेलें, 'हें पहा, ती मला खरोखर माझ्या पतीकरतां हवी आहे. मला त्यांनां चकित करून सोडायचं आहे.'

"हें ऐकून तो मनुष्य हंसला आणि मग आपली फजीती झाली नाहीं असं मला वाटूं लागलं. मी किती धिराची आहे असंही त्याला वाटलं असावं बहुतेक. तो म्हणाला, 'बाईसाहेब, एका आठवड्याच्या आंत तुम्हांला जें हवं आहे तें मिळेल. मला माझ्या यशाबद्दल खात्री आहे म्हणून तुमचं काम फत्ते होईपर्यंत माझी फी न दिली तरी चालेल.-आणि हा आपल्या यजमानांच्या रखेलीचा फोटो आहे, नाहीं कां ?'

"मीं म्हटलं, 'होय.'

"'सुरेख आहे ही बाई. विशेष लठ्ठही नाहीं — आणि अत्तर ?'

"मला त्याच्या प्रश्नाचा उलगडा झाला नाहीं. मीं पुटपुटलें, 'अत्तर ?'

" तो हंसला. 'होय, बाईसाहेब, पुरुषाला जाळ्यांत पकडायला सुगंधाची फार आवश्यकता असते. कारण त्याला नकळत विशिष्ठ प्रकारचे सुवास त्याच्या आठवणी जागृत करीत असतात आणि त्याला कार्यप्रवृत्त करतात. तो एका विशिष्ठ सुगंधामुळं भाबावून जातो आणि वेडा होतो.—तेव्हां त्यांची रखेली कुठल्या प्रकारचं अत्तर वापरते तें मला कळवा. तसंच आपले यजमान तिच्या इथं जेवतात तेव्हां कोणत्या कोणत्या विशिष्ठ चिजांवर ताव मारतात याचाही तपास काढून ठेवा. म्हणजे ज्या दिवशीं तुम्हांला त्यांना पकडायचं असेल त्या दिवशीं नेमक्या त्याच वस्तू त्यांना खायला मिळतील अशी तजवीज करतां येईल.—तुम्हाला शंका वाटायचं कांहींच कारण नाहीं; आपण त्यांना पकडलंच असं समजा !' तो म्हणाला.

" मी परत जायला निघालें ती आनंदांतच, कारण मला हा दलाल भेटला तो खूपच हुशार असावा असं वाटलं.

" तीन दिवसांनंतर एक उंच, सावळी, तरुण मुलगी माझ्याकडे आली. ती देखणी असून तिची नजर शालीन आणि धीट दोन्ही प्रकारची,—म्हणजे तशा प्रकारच्या बायांची असावी तशी,—होती. ती माझ्याशीं फारच विनयशीलपणानं वागली, आणि मलाही तिला कसं हांक मारावं हें सुचेना; पण तीच म्हणाली, 'बाईसाहेब, मला नुसतं गुलाब म्हणूनच हांक मारीत चला.'

" 'बरं गुलाब, तूं इथं कां आलीस हें कळलं कां तुला ?' माझा प्रश्न.

" 'मला त्याची जाणीव आहे, बाईसाहेब,' गुलाबचं उत्तर.

" 'ठीक आहे. पण कां ग, तुला हें विशेष भानगडीचं तर वाटणार नाहीं ?'

" 'मुळींच नाहीं, बाईसाहेब. हा माझा आठवा घटस्फोटाचा कार्यक्रम आहे. मला या गोष्टींचा सरावच आहे मुळीं !'

" 'जमलं तर मग एकूण ! तुला बरेच दिवस लागतील कां ?'

" 'तें सर्व आपल्या यजमानांच्या स्वभावावर अवलंबून आहे. मीं त्यांची पांच मिनिटं एकांतांत गाठ घेतली तर तुम्हांला वेळेसंबंधीं सांगू शकेन.'

" 'मी लौकरच त्यांची-तुझी गाठ घालून देईन, गुलाब.-पण ते देखणे नाहींत हें लक्षांत असूं दे हं !'

" 'त्याची मला विशेष पर्वा नाहीं. मीं कांहींकांहीं कुरूप माणसांचा देखील काडीमोड घडवून आणला आहे.-पण त्यांना कोणतं अत्तर आवडतं याची माहिती तुम्हीं काढली आहे ना ?'

" ' होय, गुलाब, तुझ्याच नांवाचं. '

" ' माझ्या मनासारखं झालं एकूण. कारण मला तें अत्तर फार आवडतं. पण मालकांची बाई दुपारीं पातळाखालून रेशमी कपडे वापरते कीं काय, आणि रात्रीं निजतांना काय वापरते याची कांहीं दखल तुम्हांला आहे काय ? '

" ' रेशीम नाहीं; सॅटिन् आणि लेस. '

" ' ओहो ! एकंदरींत ही बाई बरीच वरच्या दर्जाची दिसते बरं कां, बाईसाहेब ! कारण हें रेशमाचं बंड अलीकडे फारच अतिसर्वत्र झालेलं आहे. '

" ' आहे खरं तूं म्हणतेस तसं. '

" ' ठीक आहे, बाईसाहेब; तर मी आतां तुमच्याकडे नोकरीला राहिलें असं समजा ' असं म्हणून तिनं सराव असलेल्या दासीप्रमाणें घरांत वावरायला सुरुवात देखील करून दिली.

" एका तासानंतर माझा नवरा घरीं आला. गुलाबनं त्याच्याकडे वर नजर करून पाहिलं देखील नाहीं, पण त्यानं मात्र तिला निरखून घेतलं. तिच्या कपड्यांना गुलाबाचा वास येऊं लागला होता. पांचच मिनिटांत ती आंतल्या खोलींत गेली, आणि आमचे यजमान विचारते झाले, ' ही छोकरी कोण आहे ग ? '

" ' माझी नवी दासी आहे. '

" ' कुठून मिळविली ही ? '

" ' सुभगानं शिफारस करून पाठविली आहे. '

" ' आहे ब्बुवा ! '

" ' असं वाटतं कां तुम्हांला ? '

" ' दासी पण दासी आहे ! '

" माझा आनंद पोटांत मावेना. मला वाटलं मासा गळाला लागत चालला. संध्याकाळीं गुलाब मला सांगूं लागली, ' एका पंधरवड्याच्या वर वेळ लागेल असं वाटत नाहीं, बाईसाहेब. मालक इतके लवकर हुरळतील अशी माझी कल्पना नव्हती. '

" ' म्हणजे प्रयोग सुरूं झाले वाटतं ? '

" ' तसं नव्हे. त्यांनीं फक्त मला माझं नांव विचारलं, कारण त्यांना माझा आवाज ऐकायचा होता. '

" ' ठीक आहे, गुलाब. चालूं दे तुझे प्रयत्न. '

" ' त्यांत काळजी करण्यासारखं कांहींच नाहीं, बाईसाहेब. मी विशेष ताणून धरणार नाहीं; योग्य त्या संधीचा फायदा घेईन येवढंच. '

" एका आठवड्यानंतर माझा नवरा घराबाहेर जाईनासा झाला. दिवसभर तो घरांतल्या घरांत घोंटाळत राही, येवढंच काय, पण मीं बाहेर जाईन म्हटलं तर तो कां कूं करीना. आणि मी,-मी देखील तासचेतास घराबाहेर राहून त्याला मोकळीक देत असें !

" नवव्या दिवशीं रात्रीं माझे कपडे बदलतांना गुलाब बिचकत मला म्हणाली, ' आज दुपारीं आटपलं बरं कां ! '

" मला जरा आश्चर्यच वाटलं. म्हणजे जें काय झालं त्याबद्दल नव्हे, पण तिनं ज्याप्रकारें सांगितलं त्याबद्दल. मी जरा बावरलेंच म्हणना ! माझे शब्द अडखळतच निघाले, ' आणि-सगळं-सुरक्षित-पार-पडलं ? '

" ' तर काय ! गेले तीन दिवस ते लगट करताहेत, पण मलाच घाई करायची नव्हती. आतां मात्र तुम्हांला आम्हां दोघांना केव्हां पकडायचं आहे तें सांगून ठेवा. '

" ' अवश्य!—मला वाटतं,-येत्या गुरुवारीं ? '

" ' ठीक आहे, बाईसाहेब. त्या दिवसापर्यंत आतां मालकांना वाट पहात ठेवीन म्हणजे काम फत्ते !'

" ' तुला अपयश तर येणार नाहीं ?—हो, आपली विचारून ठेवतें ! '

" ' त्याचं नांवच नका घेऊं, बाईसाहेब. मी त्यांना इतकं वेड लाऊन ठेवीन कीं तुम्हीं म्हणाल त्या घटकेला ते माझ्याजवळ आलेच पाहिजेत ! '

" ' मग त्या दिवशीं पांच वाजतां संध्याकाळीं, काय ? '

" ' बहोत ठीक. आणि जागा ? '

" ' माझ्या निजायच्या खोलींत. '

" ' ठरलं.—तुमच्याच खोलींत ! '

" नंतर मीं काय केलं तें तुझ्या लक्षांत आलं असेलच बहुतेक. मीं आई-बाबांना आधीं बोलवून आणलं, मग काकांना, आणि शेवटीं माझ्या नवऱ्याचे मित्र ते न्यायाधीश नाहींत कां, त्यांनाही. मीं त्यांना काय दाखविणार हें सांगितलं नव्हतं, पण त्यांनीं फक्त दबकत दबकत माझ्या खोलीच्या दारापर्यंत जायचं येवढंच सांगून ठेवलं. बरोबर पांच वाजतांपर्यंत मी थांबलें. पण माझ्या

काळजाचे ठोके काय पडत होते म्हणशील! मीं खालून आपल्या दरवानाला देखील बोलावून घेतलं होतं. हो, जेवढे साक्षीदार मिळाले तेवढेच बरे!–आणि मग–मग घड्याळांत पांचाचे ठोके पडूं लागतांच मीं दार सताड उघडलं! हाः-हाः–तो तिथं होताच!–काय सांगूं तुला तें दृश्य,–सगळं कसं स्पष्ट होतं! काय पण त्याचा तो चेहरा!–आणि बेअक्कली मागं वळून पहायलाही पण लागला!–काय ध्यान दिसत होतं ना तें!–मला कीं नाहीं हंसूं आवरेना!–बाबा तर इतके संतापले कीं ते त्याला मारतात कीं काय असं वाटूं लागलं. आणि आमचा दरवान बिचारा! तो कितीही झालं तरी इमानी नोकर होता,–पुढं होऊन साहेबांना कपडे घालायला मदत करूं लागला.– हो, आमच्या देखत! त्यानं त्याला सुतना घालून दिला,–काय पण गंमत वाटली मला!–गुलाबबद्दल म्हणशील तर तिचा एकंदर आविर्भाव अगदीं जसा असावा तसा होता. ती रडली, काय पण रडली ती! मी म्हणतें खरं खरं कसब आहे त्या पोरींत.–तुला जर कधीं तिची गरज पडली तर विसरूं नकोस!

" आणि ही मी अशीच तुझ्याकडे आलें, सर्व आटपल्यावर लगेच मी तुला सगळा इतिहास सांगायला धांवत आलें.–मी आतां स्वतंत्र झालें, सुभगा. घटस्फोट जिंदाबाद! "

आणि ती खोलीभर नाचूं लागली. तिची मैत्रीण सुभगा जरा खट्टू झालीशी दिसली. ती येवढेच म्हणाली. " तें पहायला मला कां नाहीं ग बोलवून घेतलं, यामा? "

---

# इषारा–

यामिनी अजून आपल्या सुवासिक अंधाऱ्या खोलींत झोंपलेलीच होती.

आपल्या स्प्रिंगच्या ठेंगण्या पलंगावर मऊमऊ, गुबगुबीत आणि गुळगुळीत अंथरुणापांघरुणांत ही घटस्फोटित स्त्री आनंदी आणि शांत अशी झोंप घेत असतांना तिला त्या आवरणांचा स्पर्श चुंबनांइतका सुखद वाटत होता.

शेजारच्या निळ्या दिवाणखान्यांत कुणीतरी जोरजोरानें बोलत असल्यामुळें तिला जाग आली. तिनें आपल्या आवडत्या मैत्रिणीचा, सुभगाचा, आवाज ओळखला.

ती यामिनीच्या दासीशीं तिच्या आंतल्या खोलींत जाण्याबद्दल हुज्जत घालीत होती. मग यामिनी उठली, तिनें दार उघडलें, आणि पडदा किलकिला करून आपलें डोकेंच फक्त दिसेल अशा बेतानें दिवाणखान्याकडे पाहिलें.

" तुला येवढ्या पहांटे यायला काय झालं ग ? " तिनें विचारलें, " अजून कांहीं नऊ वाजले नाहींत. "

सुभगाचा चेहेरा फिक्कट, घाबरट आणि टापसलेला दिसत होता. ती म्हणाली, " मला तुला कांहीं सांगायचं आहे. एक भयंकर प्रकार घडून आला आहे. "

" मग आंत ये कीं ! "

त्या दोघी खोलींत गेल्या, त्यांनीं एकमेकींचें चुंबन घेतलें, यामिनी परत अंथरुणांत शिरली व तिच्या दासीनें उजेड आंत येऊं देण्याकरितां खिडक्या उघडल्या. ती बाहेर निघून गेल्यानंतर यामिनीनें विचारलें, " हं, आतां सांग काय झालं तें. "

सुभगाला रडूं कोसळलें, व स्त्रीच्या मोहकपणाचें वैशिष्ट्य असे अश्रू तिच्या गालांवरून ओघळूं लागले. ते पुसण्याचा प्रयत्न करतांना डोळे लाल करून घेण्याच्या भानगडींत न पडतां ती म्हणाली, "मला जो कांहीं अनुभव आला, यामिनी, तो अगदीं किसळवाणा आहे असंच मला म्हणावं लागतं. मला रात्रभर झोंप लागली नाहीं. माझ्या पापण्यासुद्धां मिटल्या नाहींत, कळलं ? माझं काळीज पहा हवं तर, किती धडधडतं आहे तें. "

आणि तिनें यामिनीचा हात धरून खरोखरच आपल्या वक्षःस्थलाच्या डाव्या बाजूकडे दाबून ठेवला. हेंच तें स्त्रियांच्या हृदयावरचे ठसठशीत वर्तुलाकार आवरण, जें पुरुषांना पुरेसें वाटतें, व म्हणून त्यांना त्याखालच्या हृदयाचा थांग लागत नसतो. पण सुभगाचें काळीज खरोखरच धडधडत होतें.

ती पुढें सांगूं लागली, " काल दुपारीं तें घडून आलं मला वाटतं चार किंवा फारतर साडेचार वाजले असतील, मला नक्की वेळ सांगतां यायची नाहीं. तुला आमचं घर माहीतच आहे, आणि माझ्या दिवणखान्यांतली ती हमरस्त्याकडची खिडकीही तुझ्या परिचयाची आहे. मला त्या खिडकीशीं बसून रस्त्यावरून जाणाऱ्या-येणाऱ्या लोकसमुदायाकडे पहात बसून राहण्याचं किती वेड आहे हेंही तूं जाणतेसच. स्टेशनाशेजारचा तो रस्ता मोठा मजेदार आहे, लोकांची तिथं एक-

सारखी जिवंत रीघ लागलेली असते, आणि हेंच मला विशेष आवडतं.—तर काल मी आपल्या खिडकीशेजारच्या नेहमींच्या ठेंगण्या खुर्चीवर बसलें होतें, खिडकी उघडी होती, आणि माझ्या मनांत अमुकच असा कोणताच विचार आलेला नव्हता. मी नुसती हवा खात होतें म्हण ना. कालचं वातावरण किती प्रसन्न होतं, नाहीं ?

"मध्येंच माझी नजर समोरच्या खिडकींत लाल साडी नेसून बसलेल्या एका बाईकडे गेली. मी अंजिरी पातळ नेसलें होतें; तुला आठवतं, नाहीं कां, माझं तें आवडतं ? माझी आणि त्या बाईची, तिला तिथं येऊन एक महिना झाला होता तरी, ओळख नव्हतीच, आणि गेला महिनाभर सतत पाऊस पडत असल्यामुळें मी तिला कधीं पाहिलं पण नव्हतं. पण आतां तिला पाहतांक्षणींच ती वाईट चालीची असावी हें मीं ओळखलं. माझ्याप्रमाणेंच ती देखील खिडकीशीं बसून असावी याबद्दल मला आधीं कसंसंच वाटलं, जवळजवळ चीडच आली; पण हळूं हळूं तिच्याकडे लक्ष लावून पाहण्यांत मला मौज वाटूं लागली.

" ती आपल्या हातांचीं कोपरं खिडकीवर टेंकून येणाऱ्या-जाणाऱ्या पुरुषां-कडे पहात होती, आणि माणसंही,—जवळपास सर्वच,—तिच्याकडे नजर फेंकीत. असं वाटत होतं कीं जणूंकाय तिच्या घराशेजारीं येतांच कुत्र्यांना जसा आपल्या पारधाचा वास येतो तसा कांहीं मागमूस या पुरुषांना येत असावा; कारण ते तिच्या खिडकीखालीं येतांच वर पहात, आणि तिची व त्यांची नजरानजर होई. त्या नजरांचा संदेश मला असा आढळून आला कीं, जणूं काय ती विचारी, ' तुमची इच्छा आहे काय ? ' आणि त्यांची नजर उत्तर देई, ' मला सध्यां वेळ नाहीं, ' ' उद्यां बघूं या, ' किंवा ' माझा खिसा रिकामा आहे, ' अथवा ' चालती हो, सटवे ! '

" तिचे हे व्यवहार पहात असतांना किती मौज वाटत असेल याची तुला कल्पना येणार नाहीं. पण तो तिचा धंदाच होता.

" मधूनच ती एकदम खिडकी लावून घेई, आणि खालच्या दारांतून एखादा पुरुष तिच्या घरांत शिरतांना दिसे. तिच्या गळाला मासा लागला असं समजायला मग हरकत नव्हती. मी आपल्या घड्याळाकडे पाही, व तो माणूस परत निघून जायला बारा ते वीस मिनिटांच्या वर वेळ लागत नसे. तिच्या-बद्दल,—त्या नागिणीबद्दल,—मला शेवटीं कौतुक वाटूं लागलं. तरीही ती मुळींच देखणी नाहीं बरं !

" मीं स्वतःशींच विचार केला कीं, ही आपलं मन या पुरुषांना उकलून कसं सांगत असावी बरं ? आणि तेंही इतकं बिनचूक आणि पुरेपूर ! ती आपल्या नजरेशिवाय डोकं हलवून किंवा हाताचा इषारा करून तर आपलं मन उलगडून दाखवीत नसेल ? आणि मीं लगेच आपली दुर्बीण आणून तिच्या हावभावांचं परीक्षण करूं लागलें.

" काय सांगूं तुला, यामिनी, किती सोपी होती ग तिची युक्ति ! पहिला नजरेचा कटाक्ष, मग चेहऱ्यावर स्मिताची लकेर आणि हळूंच डोक्याची ती हाल-चाल; तिन्हींचा एकदम एकच अर्थः ' तुला वर यायचं आहे कां ? ' पण या तिन्ही खुणा इतक्या हळुवार, नकळतशा आणि चलाख होत कीं, तसं करून पहा-यला खरंच कसब पाहिजे असं मला वाटलं. मीं विचार केला, ' हिच्यासारख्या कसबी खुणा मला करतां येतील कां ? किती बेमालूम आणि नाजुक आहेत हे इषारे, आणि कशा सरावानं करत असते ती ! ' कारण तिचा आविर्भाव फारच गोड होता हें निर्विवाद.

" मी घरांत गेलें आणि आरशासमोर उभी राहून तालीम करून पाहूं लागलें. मी तुला सांगतें, यामा, तिच्यापेक्षां खात्रीनं कितीतरी पट चांगले मला ते इषारे करतां येऊं लागले. मला खूप समाधान वाटलं, आणि मी पुन्हां खिड-कींत येऊन बसलें.

" त्यानंतर ती बिचारी कुणालाच आपल्या जाळ्यांत पकडूं शकली नाहीं. तिचं नशीब फिरलं. अशाप्रकारें पोट भरणं खरोखरच भयंकर असेल यांत संशय नाहीं.-आणि कधींमधीं मजेदारही भासत असेल तें, कारण रस्त्यावरून जाणाऱ्या पुरुषांपैकीं कांहीं कांहीं छान असतात !

" पुढं पुढं सर्व पुरुष रस्त्यावर माझ्या घराकडच्या बाजूला येऊं लागले,—तिच्या बाजूला कुणींच फिरकेना. ते एकामागून एक यायला लागले, तरुण, वयस्क, काळे, सांवळे, गोरे, अर्धवट पिकल्या केंसांचे, आणि डोक्यावर पांढऱ्या तागाचा भारा असलेले सुद्धां ! त्यांतले कांहीं तर फारच छान असावेत असं मला वाटलं, बाई; माझ्या आणि तुझ्या नवऱ्यापेक्षां सुद्धां !-तुझा म्हणजे तुझ्या घट-स्फोटामुळें पेन्शनवर गेलेला नवरा, बरं कां ! आतां तुला निवड करायची असेल तर यांपैकीं कुणाची खुशाल करून घे.

" माझ्या मनांत पुन्हां विचारमालिका सुरू झाली, ' मीं,—माझ्यासारख्या संभावित, गरती बाईनं,-जर यांना खूण केली तर त्यांना बोध होईल काय ? '—

आणि त्यांना इषारा करून पाहण्याचा सैतान माझ्या डोक्यांत ठाण मांडून बसला. मला तसं करून पाहिल्याशिवाय चैनच पडेना. अशा लहरी मला मधून मधून येत असतात. हें किती वेडपटपणाचं आहे असं तुला नाहीं वाटत ?--मला वाटतं, आपणां स्त्रियांचे आत्मे माकडांचे असावेत. आणि मला आमच्या डॉक्टरांनी सांगितलंही पण आहे कीं वानरांचा मेंदू अगदीं मनुष्यजातीसारखाच असतो. आपण कुणाची नक्कल केल्याशिवाय आपणांला चैनच पडत नाहीं. लग्न झाल्या-नंतर पहिले कांहीं महिने, आपल्या नवऱ्यांवर प्रेम करत असतांना आपण त्यांची नक्कल करतों, नंतर आपल्या प्रियकरांची, आपल्या मैत्रिणींची, ज्या ज्या म्हणून आपल्या आवडत्या आहेत त्या सर्वांची. आपण त्यांची विचारसरणी उचलतों, त्यांच्यासारखं भाषण करतों, त्यांच्या हावभावांची नक्कल करतों, सर्वकांहीं कधीं-कधीं करून पाहतों. मूर्खपणा आहे हा सगळा झालं !

" पण माझ्या बाबतींत म्हणशील तर, मला जर एखाद्या गोष्टीचा मोह अना-वर झाला तर तो मी केल्याशिवाय मागें पाऊल घेत नसतें.—माझा विचार ठरला. ' हा प्रयोग आपण एकदां,—फक्त एकदांच, आणि तोही एकाच माणसावर करून पाहणार! बघूं या तर काय निष्पन्न होतं तें? होऊन होऊन काय होणार? मी हंसेन, तो हंसेल,—आणि संपलं! मी वरून आपली नामानिराळी ! '

" मग मीं निवड करायला सुरुवात केली. मला कुणीतरी उत्तमसा पुरुष,—फारच छानदार,--आपल्या प्रयोगाकरतां हवा होता, आणि तसा एक मला लगेच आढळूनही पण आला. मला गोरीं माणसं आवडतात, तुला माहीत आहे ना ?— मीं त्याच्यावर नजर रोंखली, त्यानंही माझ्याकडे पाहिलं; मी गालांतल्यागालांत हंसलें, त्यानंही स्मित केलं; मी डोक्यानं ती खूण केली.- अगदीं इषारेवजा, बरं कां ?—आणि त्यानंही मान वांकवून ' हो ' म्हटलं;—आणि पुढं ?—पुढं काय ?— तो वर चढून माझ्या दारासमोर हजर !

" त्या क्षणीं माझ्या मनांत विचारांचं कसं थैमान चाललं असेल याची तुला कल्पनादेखील करतां येणार नाहीं. मला वाटे मी वेडी होणार ! भीति आणि धास्ती तर अशी वाटली मला !-आतां तो नोकरांशीं बोलणार ! त्या मेल्या हिरो-जीशीं, माझ्या नवऱ्याच्या विश्वासांतल्या खाटकाशीं ! तो तरी हेंच नाहीं समजायचा कां, कीं माझी आणि या माणसाची बराच काळपासूनची गट्टी असेल म्हणून !

" मीं काय करायला पाहिजे होतं, तूंच सांग पाहूं, यामिनी ? तो आतां एका क्षणानंतर दाराची कडी वाजविणार हें नक्की. आतां मीं काय करूं बाई, असं



" ' उमदा पण न आवडणारा असा प्राणी दिसतो.

मला झालं.–शेवटीं ठरवलं कीं, आपणच त्याला भेटायचं आणि सांगायचं कीं तुमची कांहींतरी चूक झाली, तुम्हीं परत जाल तर बरं होईल. त्याला खात्रीनं माझी बापडीची दया येईल. कितीही झालं तरी मी बाईमाणूस आहे, तो कांहीं इतका कठोरपणा दाखविणार नाहीं.

" म्हणून मी घांईत जाऊन तो कडी वाजविणार इतक्यांत दार उघडलं, आणि कांहींतरी बोलायचं म्हणून पुटपुटलें, ' तुम्हीं परत जाल ना ? मला वाटतं तुमचा कांहींतरी गैरसमज झालेला आहे.–भयंकरच घोंटाळा झाला,–मला तुम्हीं अगदीं माझ्या एका स्नेह्यासारखे भासलांत. माझ्यावर येवढी मेहेरबानी करा. '

" पण तो नुसता हंसला, बरं कां, आणि म्हणाला, ' तें सगळं ठीक आहे, रंभाबाई, मला या गोष्टींचा सराव आहे. तुझं लग्न झालेलं आहे म्हणून तुला पांचाच्या ऐवजीं दहा रुपये हवेत, येवढंच ना ? मी देईन तुला दहा रुपये, मग तर झालं ? चल, दाखव वाट घरांतली ! '

" त्यानं मला हळूंच आत लोटून दार ओढून घेतलं, आणि मी त्याच्या-समोर घाबरून व बावरून पुतळ्यासारखी उभी होतें तशीच त्यानं मला जवळ ओढली, माझं चुंबन घेतलं, आणि कमरेभोंवतीं आपल्या हाताचा विळखा घालून दिवाणखान्याच्या उघड्या दारातून तो मला आंत नेऊं लागला नंतर एखाद्या लिलांव पुकारणाऱ्या व्यापाऱ्यासारखा त्या खोलीभर नजर फिरवून तो उद्गारला, ' बापरे, तुझा दिवाणखाना भलताच ऐश्वर्यात सजवलेला दिसतोय्; आपल्याला अगदीं मना-पासून आवडला बुवा !-तुला हे खिडकींतले धंदे करणं भाग पडलं त्यावरून मात्र सध्यां तुझं नशीब फारच खडतर झालेलं असावं असं वाटतं. '

" मग मी पुन्हां त्याची मनधरणी करूं लागलें, ' तुम्हीं परत जाल कां आलांत तसे ? ऐका ना माझं म्हणणं ! माझे पति इतक्यांत घरीं परत येतील–त्यांची यायची वेळ झाली आहे. मी शपथ घेऊन सांगतें कीं तुमचा गैरसमज झाला आहे–चूक झाली आहे ! ' पण तो अगदींच शांतपणें उत्तरला, ' चल लाडके, पुष्कळ झाला आतां हा फालतूपणा !-आणि समज तुझा नवरा आलाच, तर मी त्यालाही रुपया, दोन रुपये देईन, म्हणजे तो शेजारच्या गुत्त्यांत जाऊन पिऊन येईल ! ' इतक्यांत भिंतीवर टांगलेल्या माझ्या नवऱ्याच्या फोटोकडे त्याचं लक्ष गेलं. त्यानं विचारलं , ' हाच कां तुझा नवरा ? '

" ' होय, हेच ते. '

" ' उमदा पण न आवडणारा असा प्राणी दिसतो.–आणि हो कोण ग ? तुझी एखादी मैत्रीण वाटतं ? '

" यामा, तो तुझा मीं आवडीनं काढून घेतलेला फोटो होता. मीं नकळत उत्तर दिलं, ' हो, ती माझी एक मैत्रीण आहे. '

" ' फक्कड छोकरी आहे ! माझी-तिची गांठ तूं घालून दिली पाहिजे, काय ! '

" घड्याळांत पांचाचे ठोके पडले, आणि माझा नवरा घरीं साडेपांचला येत असतो. समजा तो जर हा तिऱ्हाईत परत जायच्या अगोदर येऊन गेला तर कसं होणार ? तेव्हां त्या परिस्थितींत मी अगदींच भांबावून गेलें. मला सुचेना-मीं विचार केला-म्हटलं कीं-काय करूं ?-असं केलं तर ?-हाच सर्वांत-सोपा उपाय नाहीं कां ?-या माणसाची-शक्य तितक्या लवकर-रवानगी करून दिली-तर ?-अगदीं झटपट ?-ताबडतोब आटपलं तर ?-म्हणजे-तें काय तें तुला समजलंच असेल ! "

* * *

यामिनीला आतां हंसूं लोटलें होतें; ती खदखदून हंसूं लागली. तिनें आपलें डोकें आपल्या मऊमऊ उशींत खुपसलें व तिचा पलंग तिच्या हंसण्यामुळें वर-खालीं होऊं लागला. किंचित् शांत झाल्यावर तिनें विचारलें, " अग, सुभगा, पण तो देखणा होता ना ? "

" होय तर ! "

" आणि तरीही तूं कुरकुर करतेस ? "

" पण-पण-गडे यामा, तुला माहीत नाहीं. तो म्हणाला, तो काय म्हणाला, म्हणे मी उद्यां याच वेळीं येईन, बरं कां ?-आणि मला कीं नाहीं, बाई, भीति वाटते आतां. तुला नाहीं ठाऊक तो कसा आहे ते-भारी लोचट, दांडगेश्वर आणि हट्टी आहे !-मग सांग बरं, आतां मीं काय करूं तें ? "

यामिनी विचार करण्याकरितां अंथरुणांत उठून बसली. ती लगेच म्हणाली, " त्याला कैद करवून टाक ! "

सुभगाला कांहीं बोध होईना. ती पुटपुटली, " म्हणतेस तरी काय तूं, वेडे ? त्याला हातकड्या घालवायच्या ? आणि सबब कोणती सांगणार ? "

" अग, ते अगदीं सोपं आहे ! आज पोलिस कमिश्नरांच्या बंगल्यावर जा आणि त्यांना म्हणावं, ' गेले तीन महिने एक मनुष्य माझा माग खा पाठलाग करीत असतो. आणि काल तर तो घरचे पुरुष घरीं नसताना देखील आला होता, आणि लोचट आणखी उद्यांही येईन अशी धमकी देऊन गेला -मला सरकारची

मदत मिळाली पाहिजे.' म्हणजे तो तुझ्याबरोबर दोन शिपाई ताबडतोब लावून देईल, आणि ते त्याला चतुर्भुज करून घेऊन जातील ! "

" पण गडे, जर कां तो कांहीं बकला तर-"

" अग, ते त्याच्यावर विश्वासच ठेवायचे नाहींत. किती बावळट आहेस तूं तरी, सुभगा ! तूं आपली हकीकत जर खुलवून पोलिस कमिश्नरला सांगितली तर तो त्या भिकार माणसावर विश्वास ठेवील कीं तुझ्यासारख्या संभावित, गरती बाईचा शब्द खरा मानेल ? "

" पण माझा नाहीं, बाई, हिम्मत होत असं करायला. "

" येवढं धाडस तूं केलंच पाहिजे, नाहींतर तुझ्या फजीतीला पारावार नाहीं!"

" पण तो,-तो माझा अपमान नाहीं कां करणार, त्याला पोलिसांनीं पकडला तर ? "

" तें तर आणखींच चांगलं. तुला आपोआप साक्षीदार मिळतील, आणि मग त्याच्या नशीबींची शिक्षा चुकायलाच नको ! "

" कोणती शिक्षा ? "

" अग, अब्रूनुकसानीची भरपाई ! अशा बाबतींत माणसानं जरा कठोर-पणानंच वागावं. "

" नुकसानभरपाईची गोष्टच निघाली म्हणून आठवलं मला, एका गोष्टी-बद्दल मला फार चुटपुट लागून राहिली आहे. तो जातांना माझ्या टेबलावर पांचपांचाच्या दोन नोटा ठेऊन गेला ! "

" दोन पांचाच्या ? "

" हो. "

" बस तेवढ्याच ? आणखीं कांहीं जास्त ? "

" ऊं हूं: "

" फारच थोडं दिलं त्यानं. मला तेवढ्यांत आपला अपमान झाल्यासारखा वाटला असता.-बरं मग ? "

" मग काय ? त्या पैशाचं काय करणार मीं ? "

यामिनी क्षणभर विचारांत पडली. मग ती गंभीर आवाजांत उत्तरली, " मला वाटतं, लाडके, या पैशांची,-त्या रुपयांची,-तूं एखादी सुरेखशी वस्तू घेऊन आपल्या नवऱ्याला देणगीदाखल बक्षीस देऊन टाक ! तसं करणंच अगदीं योग्य ठरेल. "

---

# खोड -

सर्व खिडक्या-दारांना आकर्षक रंगीत पडदे लावलेल्या त्या छोट्याशा दिवाणखान्यांत फुलांचा आणि अत्तराचा सुगंध ओझरता दरवळत होता. शेकोटींत धडधडीत जाळ पेटून राहिला होता, आणि कोपऱ्यांतला दिवा त्या खोलींत बसलेल्या दोघां व्यक्तींवर सौम्य प्रकाश पाडून राहिला होता.

ती पांढऱ्या शुभ्र केंसांची म्हातारी बाई त्या घराची मालकीण होती. तिच्यासारख्या न सुरकुतलेल्या मऊ कातडीच्या, तरुणपणीं सौंदर्यप्रसाधनें वापरल्यामुळें रंध्रांतून अजूनही मधुर सुवास येत असणाऱ्या त्या काळच्या सौंदर्यसाम्राज्ञी आतां क्वचितच आढळतात.

तो त्या कुटुंबाचा एक जुना मित्र होता. त्यानें कधींही गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला नसून तो या कुटुंबाशीं एकनिष्ठ मैत्रीच्या बंधनांनीं बांधला गेला होता. आपलीकडे त्या दोघांचें कोणतेंच नातें नव्हतें

ते दोघेही दोनचार मिनिटें स्तब्ध बसले असून टक लावून शेकोटींतल्या विस्तवाकडे पहात होते. मित्र झाले म्हणून एकमेकांशीं बडबडच करीत राहिलें पाहिजे असें थोडेंच आहे ? असें एकमेकांच्या सान्निध्यांत फक्त बसून राहिलें तरी परस्परसहानुभूतीचा जो एक प्रवाह मित्रांमित्रांतून वाहत असतो त्याची महति संभाषणापेक्षां कितीतरी पटींनीं श्रेष्ठ असते एकाएकीं शेकोटींतलें एक लांकडाचें खोड बाहेर लवंडून पडलें. तें उडी मारून आल्यासारखें बैठकीवर पडलें आणि त्यांतल्या ठिणग्या इतस्ततः पसरल्या. वयस्क घरमालकीण एक अस्फुट किंकाळी मारून चट्दिशीं उभी झाली आणि दाराकडे जाऊं लागली, पण त्या गृहस्थानें बुटाची एक लाथ मारून तें खोड परत शेकोटींत ढकललें आणि बुटाच्या तळव्यानें ठिणग्या विझवून टाकल्या.

पुन्हां सर्व स्थिरस्थावर झाल्यावर सुगंधाऐवजी त्या खोलींत जळका वास घुमूं लागला होता. घरमालकीण परत येऊन बसली होती त्या खुर्चीच्या समोरच्या खुर्चीवर बसून त्या मनुष्यानें तिच्याकडे पाहिलें, हंसल्यासारखें केलें, व तो म्हणाला, " या अपघातावरून मीं लग्न कां केलं नाहीं त्याची मला आठवण आली. "

तिनें आश्चर्यानें त्याच्याकडे पाहिलें. बायका आपणांला सर्व कांहीं कळावें या जिज्ञासेनें, आणि तारुण्य ओसरून गेलेल्या स्त्रिया खवचटशा उत्सुकतेनें पाहतात तशी तिची नजर भासली. " तें कसं काय बरं ? " तिनें विचारलें.

" ती एक लांबलचक हकीकत आहे, " तो उत्तरला. " कदाचित् ती तुम्हांला आवडायची नाहीं आणि ऐकून वाईटही वाटेल.

" सुरेश आणि मी इतके जिवश्चकंठश्च मित्र असून एकाएकीं आम्हीं दोघांनीं परस्परांचा सहवास सोडून दिला हें पाहून माझ्या सर्व मित्रांना त्या वेळीं राहूनराहून आश्चर्य वाटत होतं. त्यांना हेंच कळेना कीं, एक ताट वाढून घेणारे आम्ही, एकमेकाना परके झालों तरी कसे ! मी आतां तुम्हांला त्याचं कारण सांगतों.

" एकेकाळीं आम्हीं दोघेही एका खोलींत रहात असूं. आमचे सर्व व्यवहार एकमेकांच्या संगतींत चालत असत. आमची मैत्री इतकी घनिष्ट झालली होती कीं आम्हां कोणत्याच कारणामुळं दूरावूं शकणं शक्य नव्हतं.

" एके दिवशीं संध्याकाळीं तो खोलीवर परत आला आणि आपण लग्न करणार असं त्यानं मला सांगितलं. जणूं काय त्यानं माझी चोरी केली किंवा माझा विश्वासघात केला असा धक्का मला बसला. एखाद्या माणसाच्या मित्रानं लग्न केलं कीं त्या दोघांची मैत्री संपुष्टांत आली असं खुशाल समजावं. दोघा मित्रांत जें अभेद्य आणि मोकळेपणाचं बंधन, मनाची आणि अंतःकरणाची आपुलकी बसत असते, एकमेकाबद्दलचा ठाम विश्वास नकळत उत्पन्न झालेला असतो, तो पत्नीच्या मत्सरी प्रेमाला, त्या किंचित् संशयी, शंकेखोर आणि शारीरिक स्नेहबंधनाला सहन होईनासा होतो.

" पुरुष आणि स्त्री यांना एकत्र आणणारं प्रेम कितीही उच्च प्रतीचं असेना कां, पण पुरुष आणि स्त्री मन आणि बुद्धीच्या बाबतींत नेहमीं निरनिराळींच राहणार; त्यांचे खटके उडण्याचा संभव असतोच, ते मुळीं वेगळया जातीचेच प्राणी असतात थोडक्यांत. दोघांपैकीं एक जित आणि दुसरा जेता ही भावना नेहमीं त्या दोघांच्या मनांत वसत असते; एक मालक, दुसरा दास,–आज हा तर उद्यां तो, येवढाच काय तो फरक,–पण ते दोघेही सारख्या दर्जाचे असणं शक्यच नसतं. ते एकमेकांचे हात धरतील, प्रेमविव्हल होऊन दाबत राहतील, पण ज्यामुळें मनुष्याचं अंतःकरण उघड होऊन मर्दानी अभेद्य मैत्रीची चटकन् जाणीव होते

त्या स्नेहभावाचं प्रतीक असं तें प्रदीर्घ, बळकट आणि इमानीपणानं हातांत हात देणं, या आणि त्या दोहोंत जमीन अस्मानाची तफावत आहे. पुरातनकालीन तत्वज्ञानी म्हातारपणच्या समाधानाकरतां नेहमीं एखाद्या चांगल्या खात्रीलाईक मित्राच्या शोधांत रहात असत आणि परस्परांच्या मानसिक वार्तालापांत आपली वृद्धापकाळची कालक्रमणा करीत असत. त्यांना लग्न करून वयांत आल्यानंतर दूरावणारी संतति उत्पन्न करणं कबूल नसे.

" एकूण माझा मित्र सुरेश यानं लग्न केलं. त्याची बायको शोभना देखणी, लोभस, कुरळ्या केंसांची, गुबगुबीत शरीरयष्टीची,चलाख छोकरी होती, आणि ती त्याला आपला देव मानीत असे. सुरुवातीला मी त्यांच्या घरीं क्वचितच जाई, त्यांच्या प्रेमाच्या मार्गांत आपली धोंड कशाला?—हा माझा हेतु पण नकळत त्यांनीं मला आपली ओढ लावली, ते मला नेहमीं आपल्याकडे येण्याचा आग्रह करायचे, आणि माझ्याबद्दल आसक्ति दाखवायचे. मी देखील हळूंहळूं त्यांच्या जीवनाशीं समरस होत जाऊन त्यांच्या आयुष्याबद्दल मला आपुलकी वाटूं लागली. मी बरेचदां त्यांच्याकडे जेवीत असें आणि कधींकधीं रात्रीं एकटा घरीं परतलों म्हणजे आपणही आपल्या ओक्याओक्या घरांत लग्न करून एक घरमालकीण आणावी असं मला वाटे. त्या दोघांचं एकमेकांवर फारच प्रेम होतं असं दिसलं. त्यांना परस्परांचा विरह सहन होईना

" एके दिवशीं रात्रीं जेवणाबद्दल सुरेशची मला चिठ्ठी आली. अर्थात् मला जाणं भागच पडलं.

" ' उल्हास,' तो म्हणाला, ' जेवणानंतर लगेच मला कामानिमित्त बाहेर जायचं आहे. मी फारफार तर अकरा वाजेपर्यंत परत येईन. तोंपर्यंत तूं शोभनेच्या सोबतीला राहशील कां ? '

" शोभना हंसली. ' तुम्हांला बोलवून घ्यायची कल्पना माझीच होती, बरं कां ?' ती म्हणाली.

" मीं मान वांकविली. ' तुमच्या विचारीपणाचं मला नेहमींच कौतुक वाटत असतं,' मी म्हणालों.

" आम्हीं आठ वाजतां जेवण आटपलं आणि सुरेश बाहेर निघून गेला.

" तो घराबाहेर गेल्यानंतर आम्हां दोघांना एकाएकीं विचित्र परिस्थितींत असल्यासारखं वाटूं लागलं. आम्हीं दोघंच असे अजून कधींही एकत्र बसलों

नव्हतों, आणि आमचा परिचय वाढला होता तरी फक्त दोघांनींच एकमेकांच्या सान्निध्यांत राहणं मनाला जरा चमत्कारिक वाटत होतं. अशा प्रसंगीं कशी-तरी वेळ मारून न्यावी म्हणून मीं इकडच्या तिकडच्या, धड शेंडा ना बुडखा, अशा कांहीं गप्पा करण्याचा प्रयत्न केला, पण शोभनेचं तिकडे लक्ष नव्हतं. ती खालीं पहात, एखाद्या गूढ विषयावर विचार करीत असावी अशी, स्वस्थ बसून होती. तिनं तोंड उघडलं नाहीं. बडबड चालू ठेवण्याकरतां निवडलेल्या विषयांचा माझा सांठा संपत आला होता म्हणून मी देखील स्तब्ध झालों. काय आश्चर्य असतं पहा,–कधींकधीं आपण कांहींतरी बोलूं म्हटलं तर तें साधत सुद्धां नाहीं.

" आणि त्या वातावरणांत, माझ्या रोमारोमांत म्हणा वाटल्यास, मला नीट समजावून सांगतां न येण्यासारखं कांहींतरी घडणार अशी जाणीव होऊं लागली. आपल्यासंबंधीं आपणांसमोर बसलेल्या व्यक्तीच्या मनांत कांहीं गुप्त खळबळ,– बऱ्याकरतां अथवा वाईटाकरतां,–पण चालली असावी असा ज्या एका अज्ञात संदेशाचा भास होतो, तसा मला होऊं लागला.

" ती असह्य स्तब्धता आणखीं थोडा वेळ टिकली. मग शोभना मला म्हणाली, ' शेकोटींत एक खोड घालतां ? ती विझून चालली आहे. '

" मीं ओंडक्यांची पेटी उघडली आणि त्यांतला एक उचलून विझत चाल-लेल्या शेकोटींत घातला. पुन्हां आम्हीं स्तब्ध बसलों.

" थोड्याच वेळांत तें खोड धडधड पेटूं लागलं, आणि आम्हांला आंच लागूं लागली. शोभनेनं माझ्याकडे नजर वर करून पाहिलं; तिच्या नजरेंत एक प्रकारच्या उन्मादाचा भास मला दिसून आला.

" 'खूपच उकडतंय् ,' ती म्हणाली, 'त्या पलीकडच्या कोंचावर बसूं या.'

" आम्हीं कोंचावर जाऊन बसलों. मग तिनं एकदम माझ्या नजरेला नजर भिडवून विचारलं, ' जर एखाद्या स्त्रीनं तुम्हांला आपण तुमच्यावर प्रेम करीत आहोंत असं सांगितलं तर तुम्हीं काय कराल ? '

" ' मी ?– मी ? ' मला उत्तर सुचेना म्हणून मी पुटपुटलों, ' मला अशा परिस्थितीची कल्पना करवत नाहीं.–पण माझं उत्तर बहुतांशीं त्या बाईवर अवलंबून राहणार असं वाटतं. '

" ती हंसली. पण तिचं हास्य मोकळं आणि प्रसन्न नसून त्यांत चिडखोर-पणा, उपहास, कुत्सितपणा यांची झांक होती. माझ्या कानांना तें बरं वाटलं

नाहीं. ' पुरुष कधींच धाडसी आणि चाणाक्ष नसतात, ' ती म्हणाली. नंतर थोड्या वेळानं ती पुढं म्हणाली, ' उल्हास, तुम्हीं कधीं कुणावर प्रेम केलं आहे ?' मी कांहीं बायकांच्या तडाख्यांत सांपडलों होतों हें मला कबूल करणं भागच होतं, आणि मी तशी कबूली दिल्यावर तिनं मला त्यासंबंधींची माहिती सांगण्यास फर्माविल्यामुळें मीं कशातरी एकदोन गंमती तिला सांगितल्या. मी बोलत असतां ती मधूनमधून माझ्या कृत्यांवर बरीवाईट टीका करत होती, पण माझं संपल्यावर लगेच उद्गारली,

" ' नाहीं, तुम्हांला या विषयासंबंधीं कांऽहीं कळत नाहीं. मला वाटतं खऱ्याखऱ्या प्रेमामुळें मनांत भयंकर खळबळ माजायला पाहिजे, डोकं फिरून जाऊन देहभान विसरून जायला पाहिजे,–तें प्रेम,—कसं बरं सांगतां येईल ?– धाडसी, धोक्याचं आणि भयंकर, जवळजवळ गुन्ह्याच्या स्वरूपाचं आणि नीतीनियमबाह्य असायला पाहिजे. प्रेम म्हणजे एक प्रकारचा विश्वासघात, संभावितीच्या मर्यादा तटातट् तोडून बंधनापलीकडे जाणार उन्माद, अशा स्वरूपाचं असेल तरच तें प्रेम !–शांत, संथ, सहजासहजीं मिळणाऱ्या कायदेशीर, बिनधोक्याच्या बंधनाला कां कुठं प्रेम म्हणतां येईल ? '

" तिला देण्याकरतां मला कांहींच उत्तर सुचेना. फक्त येवढाच तत्वज्ञानी विचार सुचला, ' कमाल आहे या स्त्रीजातीच्या मेंदूची ! तो असा कधींकधीं उघड्यानागड्या परिस्थितींत पहायला मिळत असतो ! '

" ती बोलत असतांना तिनं लाडिकपणाचा पण गंभीर आविर्भाव आणला होता, आणि उशांवर रेलून तिनं पाय लांब करून माझ्या खांद्यावर आपलं डोकं टेकलं. पाय लांब करतांना ते किंचित् उघडे पडले होते, आणि शेकोटीच्या तांबड्या प्रकाशांत मोहक दिसत होते.

" थोड्या वेळानं ती पुढं बोलली, ' मीं तुम्हांला घाबरवून सोडलं, नाहीं ? ' मीं तें नाकबूल केलं तेव्हां तिनं आपलं डोकं चक्क माझ्या छातीवर ठेवलं, आणि माझ्याकडे न पाहतां विचारलं, ' मीं जर तुम्हांला सांगितलं, उल्हास, कीं माझं तुमच्यावर प्रेम आहे, तर तुम्हीं काय कराल ? '

" आणि माझं उत्तर तोंडांतून निघण्यापूर्वींच तिनं आपले बाहुपाश माझ्या गळ्याभोंवतीं घालून माझं डोकं खालीं वाकविलं, आणि माझं तोंड चुंबनानं मोहोरबंद करून टाकलं.

" मला तें बरं वाटलं नाहीं. मीं सुरेशचा विश्वासघात करायचा? या लंपट, मूर्ख, विकृत विचारसरणीच्या चलाख स्त्रीचा प्रियकर व्हायचं? हिचा नवरा हिला पुरेसा होत नव्हता म्हणून मीं आपल्या मित्राशीं बेइमान व्हायचं? नुसता तोंडाशीं घांस येऊन ठेपला म्हणून क्षणिक सुखासाठीं जन्माचा धोका पत्करून आजन्म, अखंड मैत्रीवर निखारा ठेवायचा?-तें माझ्याकडून होणार नाहीं!-मग मीं करावं तरी काय हा प्रश्नच होता? ही धाडसाकरतां उद्युक्त झालेली, बेइमानीच्या आगीनं पेटलेली, देहसमर्पणाकरतां तळमळत असलेली वेडी मला आपल्याकडे ओढत असतां मी निराकार, निर्विकार बुद्धभगवान् होऊन तरी कसा स्वस्थ बसून राहूं हें मला सुचेना. माझ्या तेव्हांच्या मोहवशतेबद्दल मला तुम्ही दोष द्या पाहिजे तर.

" आतां आणखीं एखादा मिनिटच लोटायला पाहिजे होता, म्हणजे मी तिच्या,-नव्हे, ती माझ्या,-इतक्यांत खोलींत कसलातरी जोराचा आवाज झाला आणि आम्हीं दोघेही ताड्दिशीं उठून उभे राहिलों. मीं शेकोटींत टाकलेलं खोड खालीं बैठकीवर येऊन पडलं होतं आणि सतरंजीनं पेट घेतला होता.

" मीं घाबऱ्याघाबऱ्या पुढं होऊन चिमट्यानं उचलून तें खोड परत शेकोटींत टाकलं, इतक्यांत सुरेशनं दाराची कडी वाजविली.

" ' माझं काम आटपलं, ' तो आंत येत उद्गारला. ' माझ्या अपेक्षेच्या आधींच मी मोकळा झालों. '

" तुम्हीं विचार करा, तें खोड जर कां नेमकं घरंगळून खालो आलं नसतं तर मी मुद्देमालासकट पकडला गेलों असतों, आणि पुढं काय झालं असतं याचा तर विचारच करवत नाहीं.

" त्यानंतर अशी परिस्थितीच येऊं नये म्हणून मी भलताच दक्ष रहात गेलों.-पुन्हा तशी परीक्षा मला नको होती. थोड्याच दिवसानंतर सुरेश माझ्याशीं फटकून वागूं लागला. त्याच्या बायकोनं त्याचं मन माझ्याबद्दल कलुषित करण्याचा प्रयत्न केला असला पाहिजे हें उघड होतं. पुढं पुढं तो मला विसरला,-आतां तर आम्हीं एकमेकांना भेटत सुद्धां नाहीं.

" या सर्व प्रकरणावरून, मला वाटतं, आतां तुमच्या लक्षांत आलंच असेल कीं मीं लग्न कां केलं नाहीं तें?"

---

# अप्सरा—

काहीं वर्षांपूर्वी ब्रॅनीझा शहरीं एक प्रसिद्ध यहुदी रहात असे विद्वत्तेबद्दल, शहाणपणाबद्दल आणि त्याच्या देवभीरुपणाबद्दल जेवढी त्याची ख्याति होती तेवढीच त्याच्या सुरेख बायकोबद्दलही त्याची प्रसिद्धी होती. लोक तिला ‘ ब्रॅनीझाची अप्सरा ’ म्हणत आणि तें नांव तिनें सार्थ केलें होतें. ती स्वतः तर सुंदर होतीच, पण त्यांतल्यात्यांत ती टाल्मड् ग्रंथांत पारंगत असलेल्या एका धार्मिक पुरुषाची अर्धांगी होती, आणि यहुदी तत्वज्ञान्यांच्या बायका हटकून कुरूप तरी असतात किंवा त्यांना एखादें शारीरिक व्यंग तरी असतें.

टाल्मड् ग्रंथांत याचें स्पष्टीकरण असें केलेलें आहेः लग्नें स्वर्गांतच ठरवून टाकलेलीं असतात हें सर्वविदितच आहे; तसेंच प्रत्येक मुलाच्या किंवा मुलीच्या जन्माच्या वेळीं एक दैवी वाणि त्याच्या भावी वधूचें किंवा तिच्या भावी वराचें नांव जाहीर करीत असते. पण ज्याप्रमाणें धोरणी बाप घरांतल्या चांगल्या वस्तू बाहेर खपवून फक्त डागळलेलाच तेवढा माल आपल्या मुलांकरितां घरांत वापरतो त्याप्रमाणें परमेश्वर टाल्मड्च्या अनुयायांना इतर लोक स्वीकारणार नाहींत अशा स्त्रिया अर्पण करीत असतो.

पण यहुद्यांच्या परमेश्वरानें या टाल्मड्भक्ताच्या बाबतींत आपला सर्वसाधारण नियम धाब्यावर बसविला होता असें म्हणावें लागतें, कारण त्यानें त्याला एक अप्सरा बहाल केली होती. कदाचित् या अपवादामुळें त्याला आपल्या नियमाला बळकटी आणावीशी वाटली असेल. या तत्ववेत्त्याची बायको एखाद्या राजाची राणी शोभली असती. ती उंच असून तिचे लोभस अवयव भरदार होते, आणि दाट, कुळकुळीत, लांब कुंतल असलेलें तिचें डोकें ती मोठ्या अभिमानानें आपल्या नाजुक खांद्यांवर तोलून ठेवीत असे. तिचे मोठे, काळे डोळे लांब पापण्यांखालीं चमकत अथवा भारावलेले दिसत आणि तिचे हात तर जणूं काय हस्तीदंताचे कोरून केलेले अवयवच भासत.

जिला निसर्गानें लोकांवर अधिकार गाजविण्याकरितांच घडविली असावी, मूर्तिकारांच्या अवजारांचा, चित्रकारांच्या कुंचल्यांचा आणि कवींच्या लेखणीचा जिनें विषय होऊन रहावें, जिच्या पायांशीं दासांनीं अहोरात्र लोळण घ्यावी, अशी

ही अद्वितीय स्त्री मात्र एखाद्या रार्खाव बागेतील कोंडलेल्या असाधारण पण सुंदर फुलाचें आयुष्य कंठीत होती. ती सबंध दिवसभर अंगाभोंवती मौल्यवान कपडे गुंढाळून खालीं रस्त्याकडे स्वप्नवत् पहात बसून रहात असे.

तिला संतति नव्हती. तिचा तत्वज्ञानी नवरा सकाळपासून रात्रींपर्यंत ग्रंथवाचन, प्रार्थना, मग पुन्हां ग्रंथपठण करीत काळ घालवीत असे. टाल्मडचे अनुयायी ज्या कब्बाला देवीला ' बुरख्यांतली सुंदरी ' म्हणतात ती या तत्वज्ञान्याची आदिदेवता होती.

ब्रॅनीझाच्या अप्सरेला ती श्रीमंत असल्यामुळें घरांत कामकाजाकडे लक्ष करण्याची जरूर भासत नसे, आणि किल्ली दिलेल्या घड्याळाप्रमाणें घरातले सर्व व्यवहार सुरळित चालत असत. तिला भेटायला कुणी येत नसे आणि ती घराबाहेर कुठें जातही नसे. ती फक्त बसून राही, स्वप्नें पाही, विचार करी आणि जांभया देई.

* * *

एके दिवशीं खूपच सोंसाट्याचें वादळ होऊन मेघांचा गडगडाट आणि विजांचा कडकडाट शहरावर ओसरल्यानंतर घराच्या खिडक्या उघडल्या गेल्या त्यावेळीं नेहमींप्रमाणें ही यहुदी अप्सरा आपल्या खुर्चीवर भरभक्कम पांघरून बसली असून देखील कुडकुडत होती आणि तिचें विचारचक्र चालूं होतें. एकाएकीं खालीं बैठकीवर बसून पुढेंमागें झोके घेत टाल्मड ग्रंथाचें परिशीलन करीत असलेल्या आपल्या पतीवर नजर स्थिरावून तिनें प्रश्न केला, " मला सांगा पाहूं, डेव्हिडचा पुत्र मेसायस् कधीं येईल तें ? "

तत्वज्ञान्यानें उत्तर दिलें, " टाल्मड् म्हणतो कीं जेव्हां सर्व यहुदी एकतर पूर्णपणें सात्विक आणि सालस तरी होतील तेव्हां, किंवा ते असात्विक आणि अनीतिमान तरी होऊन जातील तेव्हां तो पृथ्वीवर अवतरेल. "

" यहुदी लोक कधींकाळीं सात्विक होतील यावर तुमचा विश्वास आहे काय ? " अप्सरेनें दुसरा प्रश्न केला.

" यावर मी कसा काय विश्वास ठेवणार ? "

" म्हणजे एकूण सर्व यहुदी अनीतिमान झाल्यानंतरच मेसायसचं आगमन होणार तर ? "

तत्वज्ञान्यानें उत्तरादाखल फक्त आपले खांदे उडविले, आणि पुन्हां ग्रंथ-वाचन सुरू केलें या ग्रंथसागरांत बुडी मारून आतांपर्यंत फक्त एकच प्राणी मेंदू शाबूत ठेऊन परत येऊं शकला अशी आख्यायिका आहे. खिडकीशेजारीं बसलेली सौंदर्यसाम्राज्ञी स्वप्नाळूपणें बाहेर पडत असलेल्या पावसाकडे पाहूं लागली. तिचीं ` ” तिच्या अंगवस्त्राशीं चाळा करीत होतीं.

*                *                *

तो यहुदी तत्वज्ञानी एके दिवशीं हव्यकव्यासंबंधींच्या एका महत्वाच्या मुद्याचा खल करण्याकरितां शेजारच्या गांवीं गेला होता. त्याच्या अगाध विद्वत्ते-मुळें त्या प्रश्नाचा निर्णय त्याला वाटत होतें त्यापेक्षां लौकरच लागला, आणि अगोदर ठरल्याप्रमाणें दुसरे दिवशीं सकाळीं परत येण्याची वाट न पाहतां तो आपल्या एका विद्वान मित्राबरोबर त्या दिवशीं रात्रींच परतला. वाहनांतून ते दोघे त्या मित्राच्या घरीं उतरले आणि हा पायींच आपल्या घराकडे निघाला. आपल्या घराच्या खिडक्यांतून येणार झगझगीत प्रकाश पाहून त्याला किंचित् आश्चर्य वाटलें, आणि समोरच्या पायरीवर बसून एका लष्करी अधिकाऱ्याचा हुजऱ्या तंबाखू ओढीत बसलेला पाहतांच तें द्विगुणित झालें.

“ तुम्हीं इथं कसे काय बसलां आहांत ? ” त्यानें शिपायाला सौम्य भाषेत पण उत्सुकपणें विचारलें.

“ यहुदी अप्सरेचा नवरा अचानकपणें येऊन जाऊं नये म्हणून मी पहा-ऱ्यावर बसलों आहे. ” शिपाई बेपर्वाईनें बोलला.

“ असं ? ठीक आहे. पण जरा नीट लक्ष असूं दे बरं कां ! ” असें म्हणून तत्वज्ञान्यानें आपण परत जात आहोंत असें भासविलें, पण तो बगीच्यांतील मागील दारानें घरांत शिरला.

तो पहिल्या खोलींत येतांच त्याला टेबलावर दोघेजण नुकतेच मेजवानी करून उठल्यासारखें दिसलें. दुसऱ्या खोलींत त्याची बायको नेहमींप्रमाणें आपल्या खिडकीशीं कपडे लपेटून बसली होती. पण तिचे कपोल नेहमींपेक्षां जास्त गुलाबी दिसत होते आणि तिचे काळे डोळे नेहमींसारखे भारावलेले नसून तिनें ते आपल्या नवऱ्यावर रोंखले तेव्हां त्यांत समाधान आणि चिडविणारा मिस्किलपणा दिसून येत होता. त्यानें एक पाऊल पुढें टाकलें, तों तें एका वस्तूला ठेंच लागून थांबलें. खालीं वांकून त्यानें ती वस्तू उचलली व उजेडांत पाहिली. तो गुळगुळीत चामड्याचा कमरपट्टा होता.

" तुझ्याबरोबर इथं कोण होतं ? " यहुद्यानें विचारलें.

यहुदी अप्सरेनें तुच्छतेनें आपले खांदे उडविले, पण उत्तर दिलें नाहीं.

" मी सांगूं ? शहरांतला लष्करी अधिकारी तुझ्याकडे आला होता ! " यहुदी म्हणाला.

" पण त्यानं इथं माझ्याकडे कां येऊं नये ? " आपल्या शालीवरून आपलीं नाजुक बोटें फिरवीत तिनें विचारलें.

" बये ! तूं शुद्धीवर आहेस कां ? "

" माझं डोकं अगदीं ताळ्यावर आहे, " ती उत्तरली. आणि तिच्या लालबुंद मादक ओंठाभोंवतीं मिश्किल स्मित विलसूं लागलें. ती पुढें म्हणाली, " पण मेसायसला पृथ्वीवर आणून आम्हां अनाथ यहुद्यांचा उद्धार करण्याकरितां मीं आपल्यातर्फे कांहीं मदत नको कां करायला ? "

---

# हूल—

" मला हार्मोनियम पेट्यांची फार चीड येते, " सुभाष मित्रा म्हणाला. "त्यांतल्यात्यांत त्या पायपेट्या तर दिवाणखान्यांतला एक कोंपराच अडवून टाकतात.–कुठं हे भिकार खोके, आणि कुठं त्या आमच्या वीणा, दिलरुबा, सतार, सारंगी यासारखीं कोमल स्वर काढणारीं वाद्यं ! त्याची आठवण आली म्हणजे आपल्यासमोर त्यांतील एखादं वाद्य आपल्या नाजुक बोटांनीं छेडून ऐकणारांचं देहभान हरपून टाकणाऱ्या गौरांगी, नाजुक, सुंदर ललनांचा मला भास होतो. संगीताला जिवंतपणा आणि सौंदर्य आणावं त्यांनींच; नाहींतर घरांत कोंडल्या गेलेल्या या खोक्याच्या पट्ट्या दाबून संगीताचा आभास,–विडंबन म्हणा ना,–करणाऱ्या अलीकडच्या तरुण मुली म्हणजे संगीताची प्रेतयात्राच काढत आहेत असा मला भास होतो.

" आणि तरीहां ती वेडी निशा जेव्हां माझ्यावर प्रेम करूं लागली आणि 'एक बाजाची पेटी घेऊन या ' म्हणून हट्ट धरून बसली तेव्हां तिनं पोटभर तिच्या पट्ट्या दाबूनदाबून खिळखिळ्या करून टाकाव्या या हेतूनं मीं तिला ती घेऊन

दिली. त्याचं मुख्य कारण असं कीं, एखाद्या नवख्या सुवासानं सुगंधित, नजरेंत वाटेल तेवढ्या इच्छापूर्तींचीं वचनं सांठवलेली, आपले रसाळ, लाल ओष्ठसंपुट नेहमीं चोखण्याकरतां पुढं करणारी एखादी अप्सरा जेव्हां मला कोणती वस्तू भेटीदाखल मागते, तेव्हां ती वस्तू मला कितीही अप्रिय असली तरी नजर न करणं माझ्याच्यानं होत नाहीं.

" आणि मीं ती पेटी हप्तेबंदीच्या कबूलीनं विकत घेतली व महिना एक ठराविक रक्कम द्यावयाची असा करार केला.

" त्या वेळीं मी ज्या खोल्यांत रहात होतों त्यांत सर्व सुखसोयी मला हव्यात तशा करून घेतल्या होत्या. हिंवाळयांत उन्हं खेळूं शकतील अशा, भरपूर हवाशीर पुढं आणि मागं दारांची व्यवस्था असलेल्या त्या खोल्या होत्या, आणि त्यांची-माझी सर्व सोय पाहण्याकरितां जी मोलकरीण कामावर होती ती फक्त खुणेनं मला काय हवं-नको तं समजण्याइतकी चलाख होती.

" माझ्या ब्लॉकचं वैशिष्ठ्यच असं होतं कीं, एखादी स्त्री तिथं प्रवेश करती झाली म्हणजे तिला बाहेर जाण्याचा हिय्याचा होऊं नये; तिला त्या खोल्यांतल्या कोच, पलंग, गाद्या-गिरद्यांचा असा कांहीं मोह पडावा कीं एखाद्या मांजरीप्रमाणें कोचावरची पलंगावर , पलंगावरची कोचावर जाऊन कांहीं वेळ अंगाच मुटकुळं करून तिनं त्यांची ऊबच घेत बसावं. येवढंच काय, पण माझा मखमली कोच पाहतांच कामविव्हल झाली नाहीं अशी बाई मीं अजून तरी पाहिली नाहीं. माझ्या रंगमहालांतले किनखापी पडदे आंतले आवाज आणि हंसूं बाहेर न जाऊं देण्यास समर्थ होते आणि त्यांना खोलींत दरवळत असलेल्या फुलांचा आणि अत्तरांचा सुवास येत असे.

" त्या खोल्यांचा महिमाच असा होता कीं, त्यांत पाऊल ठेवलेली स्त्री काळवेळ विसरून जाई, आग्रहानं दिलेल्या चहा-कॉफीच्या कपाचा स्वीकार करी, गोड, खुमासदार केकच्या तुकड्याचा आस्वाद घेई, लाजत-मुरकत आपलीं बोटं आपल्या सवंगड्याच्या तप्त हातांत राहूं देई, आणि क्रमाक्रमानं आपल्या मनावरचा ताबा सैल होऊं देतदेत आपल्या सर्वस्वाचं दान करी.

" कदाचित् त्या बाजाच्या पेटीनंच ती दुर्घटना घडवून आणली असेल, पण निशा नुकतीच कुठं तिच्यावर दोनचार गाणीं वाजवायला शिकली न शिकली तोंच ती नाहींशी झाली.-अगदीं चुटकीसरशी. ' बरं, जातें हं मी; नमस्ते ! '-कदाचित

आड्या टेबलाच्या कप्प्यांतील इतर स्त्रियांचीं प्रेमपत्रं तिनं वाचलीं असतील. किंवा तिला आपला जिवलग बदलावासा वाटला असेल, कारण एकालाच आयुष्यभर चिकटून राहणारी गोचीड ती नव्हती.

" मी तिच्यावर हाय खाण्याइतकं प्रेम करीत नव्हतोंच म्हणा, तरीपण अशा प्रकारच्या विरहांचा मनुष्यावर परिणाम होतोच. आपली प्रेयसी आपणांला सोडून गेली म्हणजे चुकल्याचुकल्यासारखं खास वाटतं. कारण पुन्हां मनासमोर तोच प्रश्न उभा ठाकतो, पुन्हां एखादं दुसरं पांखरूं आपल्या जाळ्यांत पकडण्याचे प्रयत्न, पांखरूं हस्तगत झाल्यावर त्याला माणसाळविण्याचा गोड सायास; कितीतरी गोष्टी. हा एक चाळाच आहे तसं पाहिलं तर; शेकडों वेळां हा खेळ खेळून पुन्हां दाखवायला जवळ काय असतं म्हणाल तर कांऽहीं नाहीं.

" आपल्या खोल्यांत आपल्या एखाद्या मित्राला राहूं देणं यासारखी अप्रिय गोष्ट दुसरी नसेल. खोलीमालकाची स्मरणशक्ति पदोपदीं जागृत करून तींत गोड झिणझिण्या उत्पन्न करणाऱ्या आंतील सर्व वस्तू आणि त्यांचा सहवास, कोंचापलंगांभोंवतीं रेंगाळणारीं चुंबनं-आलिंगनं, कोन्याकोंपऱ्यांतून उठूं पाहणारे हास्याकिलबिलाटाचे पडसाद या सर्व प्रियस्मृति परक्या माणसाच्या सहवासानं डागळून गेल्यासारख्या वाटतात. आपलं जिवंत विलासालय एखाद्या धर्मशाळेतल्या चार भितींतली मधली रिकामी जागा आणि तिथली खाट, जिथं कुणीही दोघा नवऱ्यांनीं यावं आणि वाटेल ते लपवे, चोरटे व्यवहार करावे त्या योग्यतेचं होऊन जाईल अशी भीति वाटते.

" तरीही जेव्हां बिचारा प्रमोद गांगुली ' माझ्याकरतां येवढं कर ' म्हणून गळ घालूं लागला आणि आपण सुरेखा घोषवर कित्ती कित्ती प्रेम करतों याचं रसभरित वर्णन करूं लागला तेव्हां मला त्याची कींव आली. या कपटनाटकांतला चांडाळ नवरा विलक्षणच संशयी होता. तो शिकारीहून किंवा क्लबांतून भलत्याच वेळीं परत यायचा, एखाद्या चिठ्ठीचे तुकडे दिसले तर तें प्रेमपत्र होऊं शकेल काय या आशेनं जुळवून पाहायचा, दारांजवळ जाऊन कानोसा घ्यायचा, आणि स्वतः मर्दपणांत जेमतेमच असूनही आपल्या बायकोला पकडण्याकरतां टपून बसलेला असायचा. निशेच्या विरहानंतर मी जेव्हा देशपर्यटनाला निघालों तेव्हां मीं प्रमोदला आपला ब्लॉक वापरण्याची परवानगी देऊन गेलों.

" त्या दोघांनीं या संधीचा फायदा कितपत घेतला याचा विचार तुमचा तुम्हींच करून घ्या; पण खरोखर तुम्हांला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य आहे असं

मला वाटत नाहीं. मी फारफार तर कांहीं आठवडे बाहेर भटकणार होतों,-मला निशेचा विसर पडून शक्य तर एखादी नवी मैत्रीण मिळविणं येवढाच या सफरीचा मुख्य उद्देश होता. पण मला जे स्त्री सौंदर्याचे एकापेक्षां एक नमुने आढळले त्यांत मी रमून गेलों आणि निवड करण्याकरतां बराच अवधि लागेल असं मला वाटूं लागलं. तिकडे प्रमोद माझ्या वसतिस्थानांत स्वतःच्या घराइतक्या मोकळेपणानं राहूं लागला होता.

" माझी हरकामी मोलकरीण प्रमोदच्या या धाडसांत हिरीरीनं भाग घेत होती. तिच्याच सांगण्यावरून मला कळलं कीं, ते दोघे एकापाठीं एक आले म्हणजे ती दारावर पहारा करीत रहात असे. सुरेखा येई ती अगदीं बुरखाच घेऊन, पाठीमागं एखादा वाघ लागला आहे अशी, आणि कावरीबावरी होतसाती. प्रमोद मात्र बरेच दिवसांनंतर आपल्या पत्नीची भेट घ्यायला येणाऱ्या पतीसारखा धिमेपणानं खोलींत प्रवेश करीत असे.

" एके दिवशीं सचैल स्नान केल्यानंतर ताजीतवानी होऊन प्रमोदची प्रिया सुरेखा, अशा प्रसंगीं बिनबोलतां आपल्या प्रियकराच्या बाहूंत अर्धवट डोळे मिटून स्त्रिया पडून राहतात तशी, त्याला चिकटून रेलली असतांना, अगाऊ परवानगी न मागतां माझी पहारेकरी मोलकरीण घाबरत घाबरत खोलींत आली आणि प्रमोदला म्हणाली, ' आत्तां एक नीटनेटका पोषाख केलेला गृहस्थ बरोबर दोघां आडदांड दिसणाऱ्या लोकांना घेऊन आला होता, आणि कारण न सांगतां त्यानं मला, " सुभाषचंद्र मित्रा याच घरांत राहतात कीं नाहीं ? " असं हडसून-खडसून विचारलं. तो म्हणाला, " मला त्यांची भेट करवून दे. " मी म्हणालें, " घरांत सध्यां कुणीं रहात नाहीं, जे कुणी पूर्वी रहात होते ते बाहेरगांवीं गेले आहेत. " तेव्हां घोषमहाशय,-कारण तेच ते गृहस्थ असावेत,-हंसूं लागले आणि म्हणाले, " ठीक आहे, मी पोलिस इन्स्पेक्टरलाच बोलावून आणतों म्हणजे तर तूं आम्हांला आंत येऊं देशील ? " '

" आणि ती एकीकडे ही हकीकत सांगत असतां इकडेतिकडे पहात सुरेखाचे कपडे, तिची चड्डी, पातळ, बॉडिस, जंपर, बुरखा, जें जें कांहीं घालून ती तिथं आली होती तें सर्व एकएक करून पलंगावरून उचलूं लागली. तिनं प्रमोदच्या प्रियेला ओरडूं किंवा घाबरूं देण्याची संधि न देतां अलगद एखाद्या लहान मुलीसारखं उचललं व प्रमोदला फर्माविलं, ' तुम्हीं पुरुष आहांत, या प्रसंगांतून कसं

बचावून निघायचं तें आपलं आपण पाहून घ्या. माझ्या बाईला मी या भिंतीं-तल्या फरताळांत लपवून ठेवणार आहें. तिची जबाबदारी माझ्याकडे लागली.' प्रमोदकडे लक्ष न देतां ती सुरेखाला कपडे चढवूं लागली.

"तिला वाटलं या वेळीं आपण इथं उभं राहून तिच्या खाष्ट नवऱ्याला, त्या येऊं घातलेल्या पोलिस इन्स्पेक्टरला, येवढंच काय पण सर्व जगाला ओरडून सांगावं कीं, घटकाभर आपल्या आवडत्या मर्दाबरोबर गमतीनं खेळत असलेल्या या लोभस स्त्री-कुसुमाला धक्का लावण्याची तुम्हांला हिंमत होते तरी कशी? तुम्हीं सर्व पुरुष एकजात हरामखोर असून कवडीमोल आणि छटेल बायकांबरोबर नाहीं नाहीं ते व्यवहार करतांना तुम्हांला कसलीच खंत वाटत नाहीं, आणि ही सुकुमार छोकरी स्वतःकरतां एक जिवलग शोधून काढते तें तुमच्या डोळ्यावर येतं? आपण हें एखाद्या कोर्टांतसुद्धां सांगायला कचरणार नाहीं असा तिनं निश्चय केला.

"सुरेखाचा पोशाख पुरा झाल्यानंतर तिनं तिला मिठी मारत आश्वासन दिलं, 'तूं घाबरूं नकोस, मुली; मी इथं आहे तोंपर्यंत हे कुणी तुझ्या केंसाला धक्का लावूं शकणार नाहींत. रडूं नकोस अशी!'

"पण सुरेखा बेशुद्ध व्हायच्या बेतांत आली होती. ती फक्त येवढंच पुटपुटली, 'आतां कसं होणार बाई; मी करूं तरी काय?'–परंतु फरताळांत तिच्या नजरेसमोर जो देखावा उभा राहिला होता तो फार भयानक होता. तें कोर्ट, ते वकीललोक, ते न्यायाधीश, ते तिच्या अब्रूवर शिंपडलेले शिंतोडे, तो तिच्या आयुष्यांतल्या पहिल्याच गोड प्रसंगाचा झालेला विचका, ते वर्तमानपत्रां-तले जाडजाड मथळे, तें दारांदारांतलं चटोर मैत्रिणींचं कुजबुजणं,–तिला वाटलं आपल्या आयुष्याची इतिश्री होण्याकरतां शिल्लक तें काय राहिलं?

"मोलकरीण मात्र जिवाचे कान करून बाहेरच्या खोलीपर्यंत आलेल्या त्या परक्या माणसांची चाहूल घेत होती.

"इतक्यांत ती विशेष लक्ष लावून ऐकूं लागली व तिच्या तोंडांतून 'औं?' आणि पाठोपाठच 'आलें बरं!' असे उद्गार बाहेर पडले. तिनं फरताळाचं दार उघडून सुरेखाला बाहेर काढलं, खुर्चीवर बसविलं, व ती म्हणाली, 'तरी मला वाटलंच कीं मी त्यांच्या पावलांचा आवाज कांहीं चुकायची नाहीं! अग, मागच्या दारानं गेलेले प्रमोदबाबू समोरच्या खोलींत येऊन बसले आहेत, आणि मला हांक मारताहेत. मी जाऊन येतें कशी! आपण बचावलों बरं कां!'

" प्रमोद चिडल्यासारखा दिसत होता. तो म्हणाला, ' काय गडबड केलीस ग तूं ? वास्तविक कांहींच झालं नाहीं. तो पागल सुभाष आपली खोली मला देऊन गेला, पण गेले पांच महिने त्या कुठल्याशा बाजाच्या पेटीचे हप्ते भरायला विसरला. म्हणून त्या कंपनीचे मालक आणि नोकर आपल्या पैशांची वसूली करण्याकरतां पोलिसांची मदत घेऊन या घरीं आले होते.-लाडके, ' तो आपल्या प्रियतमेकडे वळून उद्गारला, ' माझा यांत कांहीं दोष नाहीं बरं ! '

" ' पण मीं यांच्या नवऱ्याला कधीं पाहिलं होतं कां ? मला काय माहीत तो विचारपूस करणारा माणूस यांच्याकडचा नव्हे म्हणून ? ' मोलकरीण पुटपुटली. ' जळकी मेली ती बाजाची पेटी ! ' "

---

# चूक–

माझी आणि श्रीमती सर्व्वाधिकारीची ओळख या हिंवाळ्यांत शहरांत झाली. लगेच ती मला आवडूं लागली. तुम्हीं तिला माझ्याइतकंच ओळखतां,-चुकलों, जवळपास माझ्याइतकंच. तिला काव्याची आणि अकल्पित-वादाची आवड आहे हें तुम्हांला माहीतच आहे. ती वागणुकींत मोकळी, किंचित् उतावीळ, धैर्यवान, धाडसी, पण मनांत अढी ठेवणारी, आणि तरीही विचारी, नाजुक, थोडक्यांत दुखविली जाणारी, मायाळू आणि विनयशील अशा विचित्र स्वभावाची आहे हेंही तुम्हीं जाणतांच.

ती विधवा,-आणि माझ्या निव्वळ आळशी स्वभावामुळें मला विधवा फार आवडतात. मी एका पत्नीच्या शोधांत होतोंच,-तेव्हां मीं तिच्याशीं प्रियाराधन सुरूं केलें. मी तिला ओळखून होतों आणि ती मला पसंत होती. होतां होतां आतां आपण मागणी घालायला हरकत नाहीं अशी परिस्थिती आली. मी तिच्या-वर प्रेम करूं लागलों होतों आणि थोडा आणखी थांबलों असतों तर माझी स्थिति असह्यय झाली असती. मनुष्यानें लग्न करतांना आपल्या बायकोवर प्राणांपलीकडे प्रेम करूं नये, कारण तो पुढ आपल्या बुद्धीवरचा ताबा गमावून बसतो, त्याची दृष्टि शाबूत रहात नाहीं, आणि तो एकसमयावच्छेदेंकरून बेवकूफ आणि निर्दय

असा होत असतो. माणसानें आपला वरचष्मा ठेवायला पाहिजे. जर कां त्यानें मनावरचा ताबा सुरुवातीलाच सोडला, तर एका वर्षानंतर तो आपली किंमत गमावून बसतो.

तेव्हां एके दिवशीं मी नीटनेटका पोषाख करून तिच्या घरीं गेलों, आणि म्हणालों, " बाईसाहेब, माझं तुमच्यावर प्रेम बसलं आहे हें सांगतांना मला अभिमान वाटतो. माझं नांव पत्करून आपलं आयुष्य माझ्या स्वाधीन करण्याएवढी माझी पात्रता आहे कीं काय हें मला तुमच्या तोंडून कळेल तर मी तुमचा फार आभारी होईन. "

तिनें शांतपणें उत्तर दिलें, " काय पण प्रश्न विचारलांत तुम्हीं ? तुम्हीं मला आवडाल किंवा नाहीं, तेंही आत्तांच किंवा नंतर, हें मी आज कसं बरं सांगूं शकणार ? पण माझी या बाबतींत प्रयोग करून पहायला मुळींच हरकत नाहीं. पुरुष या दृष्टीनं मला तुमच्यांत कांहीं खोट दिसत नाहीं. पण तुमचं मन, शील आणि संवयी कशाकाय आहेत हें मला अजून कळायचं आहे. मलातरी वाटतं कीं, विवाहित आयुष्यांचा बोजवारा उडतो त्याचं मुख्य कारण म्हणजे लोक परस्परांच्या आवडीनिवडी न जाणून घेतां वागतात म्हणूनच. एकमेकांशीं प्रेमाच्या बेडीनं जखडलेली प्रेमी स्त्री पुरुषांची जोडी कधींकधीं शत्रुभावानं वागायला क्षुल्लकसं कारण पुरेसं असतं. एखाद्या नैतिक किंवा धार्मिक तत्वाबद्दल एकाची विशेष आस्था,–मग ती चूक कां असेना,–संवयींतली एखादी न आवडणारी लहानशी खोड, स्वभावांतली एखादी विशिष्ठ मख्खी,–कितीतरी बारिकसारीक गोष्टी. तेव्हां मला ज्या पुरुषाशीं लग्न करायचं असेल त्याच्या स्वभावातील आणि मनांतील काना, कोंपरा, तळ यांची माहिती झाल्याशिवाय मी त्याची सहचरी होणं शक्य नाहीं. कमींतकमी एक महिनाभर तरी मी त्याच्या स्वभाव–संवयींचं शांतपणें परीक्षण करेन.

" माझी अशी सूचना आहे कीं, माझ्या खेडेगांवच्या इस्टेटीवर तुम्हीं या उन्हाळ्यांत एक महिना येऊन रहावं, आणि मग आपण एकमेकांना अनुरूप आहोंत किंवा कसं तें ठरवूं – तुम्हांला हंसायला येतं कीं काय ?–तुम्हांला शंका येत असेल कदाचित् !–पण येवढं लक्षांत असूं द्या कीं, माझी स्वतःबद्दल पूर्ण खात्री असल्याशिवाय मी अशी सूचना करायची नाहीं !–तुम्हीं पुरुष ज्याला प्रेम, प्रेम म्हणतां त्या प्रेमाचा मला इतका तिटकारा आहे कीं, त्या जाळ्यांत मी फसणं अशक्य आहे !–मग आहे कां तुम्हांला माझी सूचना पसंत ? "

मला यांत हरकत वाटली नाहीं. " मग केव्हां निघायचं जायला ? " मीं विचारलें.

" मे महिन्याच्या दहा तारखेला "

" ठरलं तर मग ! "

एका महिन्यानंतर आमची तिच्या इस्टेटीवरच्या वाड्यांत स्थापना झाली. ती बाई खरोखर तऱ्हेवाइकच होती. सकाळपासून रात्रीपर्यंत ती माझी परिक्षा घेत असे. तिला घोड्यावर बसण्याचा नाद असल्यामुळें आम्हीं रोज आजूबाजूच्या प्रदेशांतून रपेट मारत असूं. आमचीं कितीतरी विषयांवर संभाषणें होत, पण ती माझ्या प्रत्येक हालचालीकडे आणि विचारसरणीकडे लक्ष लावून पहात राही व मनन करी.

माझ्यासंबंधीं म्हणाल तर मी इतका कांहीं तिच्यावर प्रेम करूं लागलों होतों कीं, आम्हीं स्वभावानें एकमेकांशीं जुळते ठरतों किंवा नाहीं याची मला काळजीच करावीशी वाटेना.

पण मला लौकरच आढळून आलें कीं, मी निजलों असतांना देखील माझ्यावर पहारा रहायचा. माझ्या शेजारच्या खोलींत, मीं झोंपीं गेलों असें वाटल्यानंतर, कुणीतरी हळूंच येऊन निजत असे. माझ्या सर्व,–अगदीं झोंपेंतल्या-देखील हालचालींच्या टेहेळणीमुळें मी जरासा उतावीळ झालों. मला आपल्या मागणीचा अखेरचा निकाल लावून टाकावेंसें वाटलें, आणि एके दिवशीं संध्याकाळीं एक युक्ति सुचली. तिचेमाझे व्यवहार आतांपर्यंत अगदींच सोंवळे-पणानें चालले होते, आणि मीही हें सर्व सहन करीत होतों. पण आतां मात्र या सर्व कार्यक्रमाचा वचपा काढण्याचें माझ्या मनानें घेतलें आणि मीं काय करायचें तें ठरविलें.

तुम्हांला तिची दासी माया,–ती त्या खडबडीत प्रदेशांत वाढलेली चुणचुणीत तरुण छोकरी आठवते ना ? एकदां दुपारीं मीं तिला आपल्या खोलींत बोलाविलें, आणि तिच्यापुढें दहाच्या दोन नोटा धरून विचारलें, " हें बघ, मुली, तूं कांहीं धाडसी काम करावं अशी माझी इच्छा नाहीं. पण तुझी मालकीण जें माझ्या-बाबतींत करत असते तेंच तूं तिच्या बाबतींत करावं अशी माझी इच्छा आहे. "

ती छोकरी हंसली, खट्याळपणानें हंसली. मी पुढें म्हणालों, " मी रात्रं-दिवस नजरकैदेंत असतों हें मला माहीत आहे. मला हेंही पण माहीत आहे

कीं मी खातों, पितों, कपडे घालतों, दाढी करतों, मोजे—जोडे घालतों तेव्हांही माझ्यावर कोणाची ना कोणाची नजर असतेच."

माया "खरं आहे, बाबू," असें पुटपुटली.

मी पुढें म्हणालों, "तूं माझ्या शेजारच्या खोलींत मी घोरतों किंवा स्वप्नांत बडबडतों कीं काय हें ऐकण्याकरतां निजत असतेस हें तुला नाकबूल करतां येणार नाहीं."

"होय, बाबू." ती पुन्हां स्तब्ध राहिली.

मी जरा चिडल्यासारखा झालों. "पण तुला नाहीं कां वाटत," मी म्हणालों, "कीं माझ्या बाबतींत माझ्या भावी बायकोनं सर्व माहिती गोळा करीत रहावं, आणि मला तिच्यासंबंधीं कांहींच कळूं नये हा धडधडीत अन्याय आहे असं? माझं तिच्यावर प्राणापलीकडे प्रेम आहे. मी स्वतःशीं कल्पना करीत असलेला चेहेरा, मन, दयाळूपणा, हें सर्व कांहीं तिच्याजवळ आहे, आणि मी त्यांमुळें सुखी होणारच हेंही निर्विवाद; पण याशिवाय देखील मला कळाव्यात अशा कांहीं गोष्टी आहेत त्यांसंबंधीं मला जास्त माहिती पाहिजे.—"

मायानें माझ्या हातांतील नोटा आपल्या बोटांच्या चिमटींत धरून त्यांची घडी केली. सौदा ठरला असें मला वाटलें.

"तर त्याचं असं आहे," मी म्हणालों, "आम्हीं पुरुष—आम्हीं कांहीं कांहीं किरकोळ—बाबतींत—शरीररचनेच्या विशिष्ठ प्रकाराबद्दल—जरा जास्त चोखंदळ असतों. स्त्रीचं शरीर कसंही असो, तीं केव्हांही आल्हादकारकच असते, पण शरीराचे विशिष्ठ भाग आमच्या नजरेंत भरतात किंवा उतरतात.—तूं आपल्या मालकिणीची या बाबतींत बदनामी करावी असं मी म्हणत नाहीं, किंवा तिला कांहीं शरीरविकृति असली तर ती मला सांगावी असंही म्हणणार नाहीं.—फक्त मी तुला जे कांहीं चारपांच प्रश्न विचारणार आहें त्यांचीं मला स्पष्ट उत्तरं दे. तुला जितकी स्वतःची माहिती आहे तितकीच तुझ्या मालकिणीची आहे. तूंच नाहीं कां रोज तिचे कपडे काढीत-घालत?—मग मला सांग पाहूं, ती वरून भासते तशीच खरोखर शरीरानं गुबगुबीत आहे काय?"

दासी चुपचाप राहिली.

"म्हणजे असं," मी पुढें म्हणालों, "कीं कांहीं कांहीं स्त्रिया कापूस, कापडाच्या घड्या वगैरे आपल्या-आपल्या-मुलांना पाजतात तिथं आणि—

बसायच्या जागीं लावीत असतात असं मीं ऐकलं आहे. तुझी मालकीण असलं कांहीं वापरत तर नाहीं ?"

मायानें मान खालीं घातली. शेवटीं ती एकदांची बोलली, "तुम्हांला जेवढं कांहीं विचारायचं असेल तेवढं विचारून घ्या, बाबू. मी सर्वांचं उत्तर एकदम देईन."

"ठीक.–कांहीं कांहीं बायकांचे पाय असे विचित्र वांकलेले असतात कीं, त्या चालूं लागल्या म्हणजे गुडघ्याना गुडघे घासतात; कांहींकाहींचे इतके फकाट असतात कीं त्या दोन पायाची जी कमान तयार होते त्या कमानींतून वाटल्यास पलीकडची निसर्गशोभा बघून घ्यावी. पायांच्या वांकडेपणापैकीं त्यांतल्यात्यांत ही फॅशन विशेष बरी. मग सांग पाहूं तुझ्या मालकिणीचे पाय कसे आहेत तें ?"

तरी माया उगीमुगीच.

मी पुन्हां पुढें म्हणालों, "कांहींच्या माना इतक्या छान असतात कीं त्यांची खालच्या बाजूला घडी पडते, आणि कांहींचे हात अवास्तव लांब असून एकंदर शरीर रोड असतं. कांहीं काहीं समोर भरपूर वाढलेल्या, तर पाठीकडे सपाट असतात, आणि कांहीं मागं गाठोडं आणि पुढं एखाद्या तक्त्यासारख्या दिसतात.–हें सर्वच आपापल्यापरी सुंदर आणि ठीक असतं, पण मला हें कळायला पाहिजे कीं तुझी मालकीण कशीकाय आहे ? मला तूं सर्व स्पष्टपणें सांग म्हणजे मी तुला आणखीं बक्षीस देईन."

मायानें त्या नोटा आपल्या चोळीच्या गळयांत खोडून दिल्या, माझ्याकडे वांकड्या नजरेनें पाहिलें, ती मनापासून हंसली, आणि उत्तरली, "बाबू, माझा सांवळा रंग जर वगळला तर माझ्यांत आणि मालकिणींत रत्तीमात्र फरक नाहीं." आणि ती पळून गेली.

मला त्या छोकरीनें चांगलेंच बनविलें ! आपण खुळे ठरविले गेलों याबद्दल मला चीड आली, आणि मी सूड घेण्याचा निश्चय केला कमीतकमी या चटोर दासीवर तरी.

रात्रीं जेवण झाल्यानंतर मीं तिच्या खोलीची कडी काढून मुकाट्यानें आंत प्रवेश केला आणि दबा धरून बसलों.

मध्यरात्रीच्या सुमारास ती आंत आली आणि माझ्या खोलीकडच्या भिंतीशीं कानोसा घेण्याकरितां गेली. मी लगेच उठून तिच्याजवळ गेलों, आणि

ती ओरडणार इतक्यांत तिच्या तोंडावर आपला हात दाबून ठेवला - विशेष सायास न करतां नंतर माझी खात्री पटली कीं ती जर दुपारीं खोटें बोलली नसेल तर श्रीमती सर्व्वाधिकारींची शरीरयष्टि खरोखरच अप्रतिम असली पाहिजे.

या साम्याबद्दल माझी पसंती मी पुरेपूर दाखवूं लागलों तेव्हां मायालाही तें आवडूं लागलें असें वाटलें. ती खरोखरच ग्रामीण, धडधाकट शरीरसंपत्तीचा एक आदर्श होती; सशक्त आणि रेखीवही. तिला विलासशास्त्रांतील कांहीं खुब्या अवगत नव्हत्या असें मला भासलें, पण मीं लौकरच तिला त्यांची जाणीव करून दिली, आणि मला सुगंधी द्रव्यांची अतोनात आवड असल्यामुळें दुसरे दिवशीं अत्तरांची एक पेटी आणि लव्हेंडरची एक बाटली बक्षीसही देऊन टाकली.

आमचे संबंध यापुढें विशेषच घनिष्ट होऊं लागले, माझ्या कल्पनेपलीकडे आमची गट्टी जमली. रानटी घोड्याला माणसाळवून स्वारीकरतां तयार करतात तशी माझी रखेली, माया, माझ्या तालमींत तयार झाली.

तिच्या सहवासांत माझे दिवस सुखांत चालले असल्यामुळें श्रीमती सर्व्वाधिकारींच्या उत्तराकरितां आतां मी विशेष आतुर नव्हतों. मी अलीकडे अगदींच सभ्य, शांत आणि गोगलगाईसारखा वागूं लागलों. माझी खात्री पटूं लागली कीं, मी तिला आवडत चाललों. आणि तिच्या एकंदर वागणुकीमुळें ही आपला स्वीकार करणार हें जवळजवळ ठरल्यासारखेंच झालें. माझ्याइतका कोण दुसरा सुखी आणि भाग्यवान् असूं शकेल, तुम्हाला वाटतं, कीं, जो मायासारख्या एका तरुण सुरेख मुलीच्या बाहुपाशांत आपल्या कायदेशीर, भावी वधूच्या पहिल्या चुंबनाची वाट पहात शांतपणें पहुडला असेल !

आतां इथून पुढें मात्र मी जें कांहीं सांगणार आहें त्याबद्दल तुमची अगाऊ माफी मागून ठेवतो. मी आतां एका नाजुक परिस्थितीवर येऊन ठेपलों आहे.

एके दिवशीं संध्याकाळीं आम्हीं घोड्यावर बसून परत येत असतांना श्रीमती सर्व्वाधिकारी आपल्या घोड्याच्या देखरेखीबाबत मोतद्दाराच्या कांहीं कामचुकारपणासंबंधीं कुरकुर करूं लागली. ती एकदोनदां पुटपुटली, " त्याला म्हणावं संभाळून रहा. मी त्याला अचानक पकडेन कधीं तरी ! "

मला रात्रीं शांत झोंप लागली. सकाळीं उठलों तों मला खूपच हुशारी वाटत होती. मीं कपडे चढविले.

रोज सकाळीं वाड्याच्या वरच्या बुरुजवजा टॉवरवर जाऊन एक सिगरेट ओढण्याचा माझा परिपाठ असे. या बुरुजावर चढायला एक जिना असून वर प्रकाशाकरितां एक मोठा झरोका होता.

माझ्या पायांत रबरी स्लिपर असल्यामुळें आवाज न होतां मी कांहीं पायऱ्या चढून आलों तों मला माया झरोक्यांतून वांकून खालीं पहात असलेली दिसली.

म्हणजे मला माया पूर्णपणें दिसली असें नव्हे, तर तिच्या कमरेखालचा भाग दिसला. पण मला तिचा तेवढा देखील भाग आवडला, श्रीमती सर्व्वाधिकारीचा कदाचित् वरचा भाग मला जास्त आवडला असता. तशी ती वांकून पहात असतांना तिचे हे अवयव,-माझें भक्ष होऊन गेलेलें तें शरीर,-इतकें लोभस दिसत होतें कीं झिरझिरीत साडींतल्या त्या वर्तुलाकृति शरीराकडे मी खेंचला गेलों.

मी विशेषच दबकत दबकत चढूं लागलों. तिला माझी चाहूल लागली नाहीं.

मी गुडघे टेंकून तिच्या पायाशीं बसलों आणि—आणि दोन्हीं हातांनीं दोन्हीं बाजूंनीं तिच्या साडीचा कांठ बोटांच्या चिमटींत धरला, व एका झटक्या-सरशीं मीं तिची साडी वर केली. त्या सुंदर भरीव गोलगोल मांड्या, माझा आवडता कोथ्याचा व त्याखालचा तो नाजुक पुष्ट भाग, त्या एकंदर अवयवांचा मला इतका उन्माद चढला कीं, मीं,—माफ करा हं, बाई, मला,-मीं देहभान विसरून त्या शरीराचें चुंबन घेतलें. मला राहवलें नाहीं.

पण मी चमकलों. मला हिन्याचा सुवास आला! पण पुढें विचार करायला मला वेळच मिळाला नाहीं. मला एकदम लोटून दिल्या गेल्याचा भास झाला. माझ्या नाकावर ठोसा बसल्यासारखें वाटलें. मी ओरडलों आणि माझे रोमांच भीतीमुळें उभे झाले. त्या व्यक्तीनें माझ्याकडे तोंड फिरविलें,-ती श्रीमती सर्व्वाधिकारी होती!

मुठी वळलेले आपले हात वर करून ती वेडीसारखी पाय आपटत होती. नंतर तिनें घोड्याला चाबूक मारावा तसा आविर्भाव केला, आणि ती दड्दड् जिना उतरत खालीं निघून गेली.

दहा मिनिटांनंतर मायानें घाबरत घाबरत मला खालील पत्र आणून दिलें:

'आपण आपली पिडा इथून लौकर घेऊन जाल तर फार उपकार होतील.
-श्रीमती सर्व्वाधिकारी.'

मी निघून गेलों. माझें सांत्वन अजून झालें नाहीं. मीं एकंदर प्रकाराबद्दलचा गैरसमज दूर करण्याकरितां जंगजंग पछाडले, पण अजून मी होतों तिथेंच आहें.

त्या क्षणापासून माझ्या अंतःकरणांतल्या कोंपऱ्यांत तो हिन्याचा सुगंध अजून दरवळतो आहे, आणि मला त्या अत्तराचा वास घेण्याची पुनःपुन्हां अनावर इच्छा होत असते.

---

# नंबर १९-

कॅप्टन एपिव्हेंट जेव्हांजेव्हां रस्त्यावरून जाई तेव्हां सर्व स्त्रिया त्याच्याकडे पाहूं लागत. लष्करांतल्या देखण्या अधिकाऱ्यांचें तो प्रतीक होता. तो नेहमीं परेडवर चालल्यासारखीं पावलें टाकीत आपली चाल, शरीरयष्टि, आणि मिशी यांच्या तोऱ्यांत रहात असलेला दिसत असे. त्याचे पाय खरोखरच देखणे, सरळ, भरदार होते, कंबर निमुळती असून छाती मात्र मर्दासारखी रुंद, कमरेच्या वरच्या बाजूला पसरट अशी होती, आणि मिशी पिंगट, जाड, पण टोकें वळलेली असून त्याला खुलून दिसत असे.

तो जेव्हां लष्करी पोषाखांत आपल्या अक्कडबाज चालीनें फिरायचा तेव्हां मारू दिसायचा, पण तेंच जर कां तो साध्या कोट—पँटांत जाऊं लागला तर चारचौघां सर्वसाधारण माणसांप्रमाणें दिसून त्याच्याकडे कोणाचें लक्षही वेधत नसे. ही स्वतःची मख्खी त्याला माहीत असल्यामुळेंच कीं काय, संध्याकाळच्या वेळीं तो लष्करी पोषाख घालून सहल करायला जाई तेव्हां आपली चाल, पाय आणि मिशी यांच्या जोडीला आपला देखणा चेहेरा, रेखीव बांकदार नाक, निळे डोळे आणि उंच कपाळ यांच्या भांडवलावर कोणतीही तरुणी सहज जिंकूं या भावनेनें आपला वेळ घालवी.

त्याला स्वतःखेरीज सर्वांचीच घृणा वाटे, फक्त थोड्याअधिक प्रमाणांत, येवढेंच काय तें. त्याच्या दृष्टीनें समाजांतला मध्यमवर्ग, पांढरपेशे, यांना अस्तित्वच नव्हतें. तो एखाद्या पशूकडे पहावें तितक्या बेपर्वाईनें त्याच्याकडे पाही.

तो जर कुणाची पर्वा करीत असेल तर लष्करी अधिकाऱ्यांची, आणि तेही जर धडधाकट आणि देखणे असले तर. इतर जग त्याला केरकचरा वाटे. भरपूर खाणारे, यथास्थित पिणारे आणि सुंदर मुलींवर प्रेम करणारे प्राणी त्याला विशेष आवडत.

कॅप्टन एपिव्हेंटनें स्वतः प्रेमाच्या प्रांतांत कितीतरी मोहिमी मारल्या होत्या. तो एखाद्या स्त्रीबरोबर खाला-प्याला कीं त्यानें रात्र तिच्याच अंथरुणावर घालविली हें नक्की समजावें; जर कांहीं अपरिहार्य कारणांमुळें ती रात्र न फळली तरी दुसरी तर हमखास फळेच! त्याचे मित्र त्याला आपल्या पात्रांची ओळख करून देत नसत, कारण त्याच्या मोहाला त्या कधीं बळी पडतील याचा नेम नसे.

तो दुकानओळींतून चालला तर प्रत्येक दुकानदार मागें वळून आपली बायको तर दाराआडून पहात नाहीं ना, याची खात्री करून घेई, इतका त्याचा सर्वसाधारण लोकांना वचक बसला होता. एक दिवस एका समंजस पण चिडलेल्या दुकानदारानें तर बोलूनही दाखविलें कीं, "तो मोर ठुमकत ठुमकत चालला पहा. आपण कधीं या छानछोकी फालतू लोकांच्या तडाख्यांतून सुटूं कुणास माहीत! माझ्याबद्दल म्हणाल तर मी लष्करी शिपाई होण्यापेक्षां एखादा खाटीक होणं पसंत करीन. माझ्या टेबलावर जें रक्त सांडेल तें एखाद्या पशूचं तरी असेल. खाटीक उपयोगी तरी असतो, आणि त्याच्या सुरींनं मनुष्यप्राण्यांची हत्या केलेली नसते. या खुनी लोकांना आपलीं शस्त्रास्त्रं जवळ बाळगून आम्हीं भररस्त्यावरून जाऊं तरी कसे देतों याचं मला आश्चर्य वाटतं. देशाच्या बचावाकरितां ते पाहिजेत ही गोष्ट खरी, पण त्यांनीं आपले मोरपिसारे घालूनच लोकांत मिरवलं पाहिजे कां? खाटीक नाहीं कुठं असे पोषाख घालून हिंडत ते?"

दर संध्याकाळीं तो सार्वजनिक बागेच्या बाहेरील हमरस्त्यावर आपले पाय, शरीर आणि मिशी मिरवीत फिरत असे. गांवांतले व्यापारीही त्यावेळीं आपल्या व्यवसायाच्या गोष्टी करीत येथेंच पाय मोकळे करीत, पण त्यांनाही न राहवून ते कधींकधीं एकमेकांना खुणावून म्हणत, "काय देखणा अधिकारी आहे हो हा!" "तो पहा कॅप्टन एपिव्हेंट, चालला असेल बेटा एखादी छकडी गांठायला!"

बायका त्याच्याकडे पाहिल्याबरोबर आपल्या डोक्याची एक विशिष्ट प्रकारची हालचाल करीत, माना वेळीत, जणूं काय त्याला आपण नागव्या झालेल्या दिसतों आहोंत असें त्यांना वाटे. त्या नजर खालीं घालत, त्यांच्या ओठांवर स्मित



" आपल्या नशीबवान मोराकरतां नवीन लांडोर उत्पन्न झाल्यासारखी दिसते !"

[ पान ९६ ]

चमकूं लागे, आणि आपण सुंदर दिसून त्यानें आपणांकडे पहावें अशी त्यांना अभिलाषा होई. तो एखाद्या मित्राबरोबर फिरत असला तर तो मित्र हटकून म्हणायचा, " एपिव्हेंट, तूं नशीबवान आहेस लेका ! " शहरांतल्या वेश्या तर संध्याकाळच्या वेळीं त्याच्या नजरेस पडण्याची धडपडच करीत एकसारख्या.

एके दिवशीं शहरांतल्या एका प्रतिष्ठित धनाढ्य व्यापाऱ्याची राख, देखणी इर्मा, कॅप्टन एपिव्हेंट आपल्या सोबत्यांबरोबर एका हॉटेलांत बसला असतां, आपल्या मोटारींतून उतरून समोरच्या दुकानांत कांहीं कागद वगैरे खरेदी करण्याकरितां शिरली. एपिव्हेंटच्या शेजारीं बसलेला कॅप्टन मागें वळून उद्गारला, " आपल्या नशीबवान मोराकरतां नवीन लांडोर उत्पन्न झाल्यासारखी दिसते ! " त्या कंपूंत एकच हंशा पसरला, पण त्या दिवसानंतर कॅप्टन एपिव्हेंटनें आपल्या फेरफटकेचा रस्ता बदलला, व तो इर्माच्या घरावरून जाऊं-येऊं लागला.

तिनें त्याला पाहिलें, स्वतःला पाहूं दिलें, आणि ती हंसली.

त्याच दिवशीं रात्रीं तो तिचा प्रियकर झाला.

त्यांच्याकडे लोकांचे लक्ष वेधलें, ते आपल्या प्रणयाचें जाहीर प्रदर्शन करूं लागले, दोघांनांही आपल्या धाडसाचें कौतुक वाटूं लागलें.

शहरांत ज्याच्या त्याच्या तोंडीं इर्मा आणि कॅप्टन एपिव्हेंट यांचीं नांवें झालीं होतीं. फक्त इर्माच्या शेठजीलाच काय तो या गोष्टीचा पत्ता नव्हता.

कॅप्टनचा अभिमान तर उतूं जाऊं पहात होता. तो नेहमीं बोलायचा म्हणजे, " इर्मा मला म्हणाली- इर्मानं काल रात्रीं सांगितलं-काल जेवतांना मीं इर्माला बजावलं—".

सरासरी एक वर्षपर्यंत शत्रूच्या हातांतून हिसकावून आणलेल्या राष्ट्रध्वजासारखें या दोघांनीं आपल्या प्रेमाचें प्रदर्शन त्या शहरांत मांडलें होतें. त्याला आपल्या सामर्थ्याचा आणि या शिकारीचा कैफ चढला होता, त्याचा इतर अधिकारी हेवा करूं लागले होते, त्याला भविष्यकाळाबद्दल भलतीच खात्री वाटूं लागली होती, आपणांला कुणी विसरूं शकणार नाहीं अशी जाणीव झाली होती.

पण इतक्यांत लढाई सुरू झाली आणि कॅप्टन एपिव्हेंटच्या पथकालाच पहिल्यांदा आघाडीवर जाण्याचा हुकूम आला. इर्मा-एपिव्हेंटच्या ताटातुटीचा तो प्रसंग खरोखरच हृदयद्रावक होता.

खुर्चीवरून पँट, कोट, हॅट, छडी या वस्तू व पलंगावरून चड्डी, ब्लाउज, बॉडिस्, फ्रॉक आणि फुलें या वस्तू खालीं पडून एकमेकांत मिसळून जणूं काय

परस्परांना शेवटच्या मिठ्याच मारीत होत्या. रंगमहालांतल्या खुर्च्या व कोच अस्ताव्यस्त झाले होते, केस पिंजारलेली इर्मा आपले हताश बाहू कॅप्टनच्या रुंद खांद्याभोंवतीं गुंढाळी, त्याला घट्ट घट्ट मिठी मारी, मग लगेच दूर होऊन खालीं गालिचावर लोळूं लागे, खुर्च्यांच्या खुरांचा चावा घेई, त्यांना धरून ओढी, आणि कॅप्टन हतबुद्ध होऊन म्हणे, "इर्मा, लाडके, तूं किती रडशील आतां? मला गेलेंच पाहिजे, नाहीं कां?" तो आपल्या डोळ्यांतील अश्रू आपल्या बोटांनीं पुसून काढी, तिला उचलून घेई, पलंगावर निजवी, मिठ्या मारी, चुंबनें घेई, पुन्हां शांत होऊन हताश होई. पहांटे तिचा अखेरचा निरोप घेऊन तो परत गेला.

इर्मा कॅप्टनला पोहोंचवावयाला शहराच्या शिवेपर्यंत गेली व तेथें अख्ख्या रेजिमेंटसमोर तिनें त्याचें चुंबन घेतलें. सर्व लष्कर हळहळलें. कोणी कोणी म्हणाले देखील, "कॅप्टन, आतांपर्यंत पुष्कळ मिळाल्या असतील तुम्हांला, पण अशी अंतःकरणापासून प्रेम करणारी नसेल मिळाली!" त्यांना या प्रेम-प्रदर्शनांत स्वदेशभक्ति दिसून येत होती.

एपिव्हेंटच्या पथकाला लढाईंत खूपच खपावें लागलें. कॅप्टननें स्वतः विशेष मर्दुमकी गाजविली व त्याला बहुमानाचें पदक बक्षीस मिळालें. लढाई संपल्यानंतर त्याचें पथक पुन्हां त्या शहरीं परत आलें.

आल्यानंतर लगेच कॅप्टननें इर्माबद्दल विचारपूस केली, पण कोणालाच तिचा नक्की पत्ता ठाऊक नव्हता. कुणी म्हणत तिचें एका जर्मन मेजरबरोबर लग्न झालें, कुणी म्हणत ती शेजारच्या खेडेगांवीं आपल्या खेडुत आईबापांकडे रहायला गेली.

त्यानें आपल्या नोकराला म्युनिसिपल कचेरींत पाठवून इर्मा मेली कीं काय याची चौकशी करविली, पण तसें कांहीं आढळून आलें नाहीं.

तो चिडला आणि त्यानें आपल्या सोबत्यांना त्याची जाणीव करून दिली. आपल्या दुर्भाग्याचें खापर तो जर्मनांच्या माथीं फोडूं लागला, कारण त्याच्या गैरहजरींत त्यांनीं कांहीं काळ या शहराचा ताबा घेतला होता. त्याला वाटे तेच इर्माला आपल्याबरोबर घेऊन गेले असावेत. तो म्हणाला, "थांबा हरामखोरांनो, पुढच्या लढाईंत मी तुम्हांला पाहून घेईन!"

मग एके दिवशीं सकाळीं तो मेस्‌मध्यें न्याहारी करीत असतां एका नोकरानें त्याला एक चिठ्ठी आणून दिली:

' लाडक्या, मी दवाखान्यांत असून खूप, खूपच आजारी होऊन पडलें आहें. तुम्हीं मला येऊन भेटाल ना ? मला किती किती आनंद होईल म्हणून सांगूं ?-इर्मा. '

कॅप्टनचा चेहेरा एकदम उतरला. त्याला तिची कींव येऊन तो म्हणाला, "हें फारच वाईट झालं. मी जातोंच असाच तिकडे. गरीब बिचारी ! "

त्यानें आपल्या सोबत्यांना ही आनंदाची बातमी सांगितली, व आपण लगेच जाणार हेंही कळविलें. " ही सर्व जर्मनांची बदमाशी असली पाहिजे. त्यांनीं तिला लुबाडून घेतलं असेल आणि अज्ञानदशा होऊन ती दवाखान्यांत हालहाल होत पडली असेल. हलकट, क्रूर लेकाचे ! " तो उद्गारला.

प्रत्येकजण त्याचे शब्द उत्सुकपणें ऐकत होता. त्याचें खाणें संपल्यावर तो चटकन् उभा राहिला, खुर्चीवर टांगलेला आपला पट्टा त्यानें उचलला, पोट खपाटीं नेऊन छाती फुगवून छिद्रांत खिळा अडकविला, कोट खस्दिशीं खालीं ओढला व बगलेंत छडी दाबून आणि आपली लष्करी टोपी डोक्यावर कलती ठेऊन मिशीला पीळ भरीत तो बाहेर निघाला.

पण त्याला दवाखान्यांत प्रवेश मिळाला नाहीं. तो परत आला, आपल्या कर्नलला भेटला, त्याची चिट्ठी घेतली आणि पुन्हां गेला, तेव्हां त्याला कांहीं वेळ बसवून ठेऊन, तिथल्या अधिकाऱ्यांनीं आंत जाण्याची परवानगी दिली. तो जातांना मात्र डॉक्टरांनीं त्याच्याकडे चमत्कारिक नजरेनें पाहिलें.

एकदां आंत शिरल्यावर जिकडेतिकडे रोगराई, दुःख आणि मृत्यू यांचेंच वातावरण त्याला आढळून आलें. तो पावलांच्या बोटांवर दबकत दबकत चालूं लागला. त्याच्या घ्राणेंद्रियांत आजारी शरीरांची आणि वेगवेगळ्या औषधांची घाण शिरत होती. त्याला वेगवेगळ्या प्रकारचे शेंकडों रोगी दिसले व त्याची किळस वाढत चालली.

अखेर तो वाटाड्याबरोबर एका बंद दारासमोर येऊन ठेपला. वर लाल-भडक अक्षरांत पाटी लावलेली होती, ' गरमी–परमा. ' कॅप्टन तीं अक्षरें वाचून चमकला, त्यानें नाक मुरडलें, तो लाजेनें लालबुंद झाला. दाराशींच एक परिचारिका कसलेंसें औषध तयार करीत होती. " मी दाखवतें तुम्हांला," ती म्हणाली, " ते पहा २९ नंबरचं अंथरूण. "

ती कॅप्टनच्या पुढें चालूं लागली. तिनें एका पलंगाकडे बोट दाखविलें.

पलंगावर अगोदर पांघरूणांशिवाय कांहींच दिसेना. रोग्याचें डोकेंदेखील पांघरुणांत गुरफटलेलें होतें. इतर पलंगांवर चेहेरेच चेहेरे दिसत होते, पिवळे, फिक्कट, रोगट, निस्तेज, तरुण, म्हातारे; आणि ते सर्व या लष्करी पोषाखांतल्या अक्कडबाज मिशीवाल्या अधिकाऱ्याकडे कौतुकानें पहात होते.

कॅप्टनला कसेंसेंच वाटूं लागलें. त्यानें एका हातांत टोपी व दुसऱ्यांत आपली छडी घेऊन हांक मारली, " इर्मा ! "

२९ नंबरचें अंथरूण एकदम सचेतन झाल्यासारखें वाटलें. पांघरुणांतून इर्माचा चेहेरा डोकावला, पण तो ओळखणें सुद्धां कठिण होतें इतका बदलून गेला होता; ओढलेला, निस्तेज, सौंदर्यहीन !

तिनें एक उसासा टाकला, तिचें हृदय भावनांनीं पुलकित झाल्यासारखें वाटलें. ती पुटपुटली, " आल्बर्ट !—आल्बर्ट ! तुम्हीच कां ते ?-अग आईग !-मला कित्ती कित्ती बरं वाटतं ! " तिच्या डोळयांतून अश्रू ओघळूं लागले.

परिचारिकेनें एक खुर्ची आणली. " बसा इथं, कॅप्टन, "ती म्हणाली.

तो खुर्चीवर बसला आणि आपल्या त्या भूतकाळांतील प्रेमाच्या प्रेताकडे पाहूं लागला. शेवटीं तो म्हणाला, "काय होतंय् तुला ? "

ती रडत उत्तरली, " तुम्हांला माहीतच आहे. तें दारावरच लिहिलं आहे. " तिनें तोंडावरून पांघरूण ओढून घेतलें.

हताश होऊन आणि शरम वाटून त्यानें विचारलें, "पण तुला हा जडला कसा ? "

"त्या मेल्या जर्मन कसाबांचं हें कृत्य ! त्यांनीं माझ्यावर बळजबरी केली आणि हें विष माझ्या शरीरांत भिनविलं. " ती उत्तरली.

पुढें कांहीं बोलणें त्याला सुचेना. तो बोटाभोंवतीं आपली टोपी फिरवीत राहिला.

इतर बाया त्याच्याकडे पहातच होत्या. त्याला कुजूं लागलेल्या शरीराची दुर्गंधि, बाटलेल्या आणि डागळलेल्या देहाची घाणच या सर्व रोग्यांतून निघून वातावरणांत पसरल्याचा भास होऊं लागला.

इर्मा पुटपुटली, " मला नाहीं वाटत मी बरी होईन असं. डॉक्टरांनीं आशा सोडली आहे."

मग तिचें लक्ष कॅप्टनच्या छातीवर लटकलेल्या पदकाकडे गेलें. ती अभिमानानें उद्गारली, " तुम्हांला बहुमान मिळाला वाटतं ? मला किती भूषण वाटतं म्हणून सांगूं ? मी जर तुम्हाला मिठी मारूं शकलें असतें तर !"

ते शब्द ऐकतांच भीति आणि किळस यांची एक लाट कॅप्टनच्या शरीरांतून चमकून गेली. त्याला तिथून पळून जाऊन बाहेरच्या शुद्ध हवेंत श्वासोच्छ्वास करावासा वाटला. पुन्हां या बाईचें दर्शनही घेणें नको असें त्याच्या मनानें घेतलें. मात्र तो तेथेंच बसून राहिला; तिचा निरोप कसा घ्यावा हें त्याला कळेना.

तो पुटपुटला, " तूं स्वतःची कांहींच काळजी घेतलां नाहीं ? "

इर्माच्या डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या निघूं लागल्या. " नाहीं, मी त्यांच्यांतून सुटूं शकलें असतें तेव्हां माझ्या मनांत सूडाची भावना जागृत झाली. आणि मी त्यांच्याही शरीरांत विष कालवलं.—कितीकांच्या, सर्वांच्या, मला शक्य होतं तेवढ्यांच्या ! शहरांत त्यांच्यापैकीं शेवटचा माणूस शिल्लक असतपर्यंत मीं त्यांची गय केली नाहीं. मला स्वतःची फिकीरच नव्हती."

तो फक्त येवढेंच पुटपुटला, " इथपर्यंत तूं फायद्याचीच गोष्ट केली."

तिला जोर चढला. तिच्या गालांवर लाली दिसूं लागली. " खरं सांगतें मी," ती म्हणाली, " माझ्या करणीमुळें त्यांतले कमींत कमी शंभरजण तरी दगावतील. मीं आपला दावा साधला."

पुन्हां तो पुटपुटला, " ठीकच झालं " मग तो उठून उभा राहिला आणि म्हणाला, " बरं, आतां मला गेलं पाहिजे. कर्नलना भेटायची वेळ झाली "

तिला भडभडून आलें. " इतक्यांतच ? तुम्हीं आत्तां तर आलांत, आणि लगेच चाललांत दर्वाल ? "

पण त्याला आतां जाण्याची घाई झाली होती. तो म्हणाला, " पण मी तुझा निरोप पोहोंचतांच नाहीं कां आलों ? आतां मला कर्नलच्या वेळेची खोटी करतां येईल कां ? "

" अजून प्रूनसाहेबच कर्नल आहेत कां ? " तिनें विचारलें.

" होय. त्यांना दोनदां जखम झाली. "

" आणि तुमचे दुसरे सोबती ?-त्यांच्यापैकीं कुणी दगावलें कां ? "

त्यानें मेलेल्यांची नामावळी उच्चारली; एकाचा हात उडाला दुसरा पाय गमावून बसला, तिसरा आंधळा झाला वगैरे माहिती चट्चट् सांगितली. ती जिवाचे

कान करून तें सर्व ऐकत होती. मग ती एकाएकीं म्हणाली. " जायच्याआधीं माझा एकदां मुका घ्याल कां ? नर्स इकडे कुठं दिसत नाहीं. "

तिची विनंति ऐकून त्याच्या अंगावर शहारे आले, पण मनाचा हिय्या करून त्यानें आपले ओंठ तिच्या कपाळावर ओझरते टेंकले. तिनें मात्र तो खालीं वांकतांच त्याला मिठी मारून त्याच्या कोटावर जागोजागीं चुंबनांचा वर्षाव केला.

नंतर ती म्हणाली. "तुम्हीं पुन्हां याल ना ?-सांगा ना तुम्हीं याल म्हणून! मला वचन द्या ना ? "

" ठीक आहे. मी येईन."

" मग कधीं ? गुरुवारीं ? "

" हो, गुरुवारीं- "

" गुरुवारीं दोन वाजतां ? "

" हो, गुरुवारीं दोन वाजतां. "

" माझी शपथ ? "

" हो, तुझी शपथ. "

" मग आतां जातांच ? "

" हो, जातों. "

आणि तो निघून गेला. त्याचे खांदे पूर्वीइतके सरळ नव्हते, तो वांकून चालला होता, त्याच्या मिशीचीं टोंकेंही पीळ सोडून खालीं लोंबत होतीं. तो खोलीबाहेर जाईपर्यंत सर्व आजारी बायका त्याच्याकडे रोखून पहात होत्या. तो इमरस्त्यावर आला तेव्हा त्यानें छातीभरून श्वास आंत ओढला.

संध्याकाळीं त्याच्या सोबत्यांनीं विचारलें, " कशी काय आहे इर्मा, कॅप्टन ? "

त्यानें न ऐकल्यासारखें करून उत्तर दिलें, " तिला फुफ्फुसांचा आजार झाला आहे. ती फारच बिमार आहे. "

पण त्याच्यापैकीं एका लेफ्टनंटला काय संशय आला कुणास ठाऊक, त्यानें चौकशी करून इर्माबद्दलची इत्थंभूत माहिती मिळविली, आणि दुसरे दिवशीं सकाळीं जेव्हां कॅप्टन एपिव्हेंट न्याहारीकरितां मेसमध्यें शिरला तेव्हां हंशा आणि थट्टा यांनींच सर्वांनीं त्याचें स्वागत केलें. त्यांना अखेर त्याचा सूड घेण्याचें साधन सांपडलें.

त्यांना अशीही माहिती कळली कीं, इर्मानें हटवादीपणानें एका जर्मन मेजरशीं लग्न केलें होतें, दुसऱ्या एका कर्नलबरोबर शेजारच्या भागांतून घोड्यावर बसून

रपेट मारत चार महिने घालविले होते, आणि तिचा इतर कितीतरी लष्करी माणसांशीं संबंध घडून आला होता. थोडक्यांत म्हणजे लोक तिला 'जर्मनांची बायको' असें संबोधूं लागले होते.

एक आठवडाभर कॅप्टन एपिव्हेंट त्या लष्करी तुकडीच्या थट्टेचा विषय होऊन बसला. त्याला पोस्टानें आणि नोकरांमार्फत धंदेवाईक भूतभविष्य-वाद्यांचीं पत्रें, रोगांचीं निदानें आणि औषधांच्या जाहिराती येत असत. औषध कोणत्या रोगाकरितां आहे तें आणि नंबर २९ हा आंकडा ठळकपणें पाकिटावर लिहिलेला असे.

एके दिवशीं सर्व ऐकून कर्नलदेखील जरा चिडखोर आवाजांतच म्हणाले, "कॅप्टननं खूपच छानदार जागीं ओळख करून ठेवली होती बुवा! त्याचं आम्हीं अभिनंदन केलं पाहिजे!"

बारा दिवसांनंतर त्याला इर्माचें विनंतीपत्र पुन्हां आलें. त्यानें रागारागांत तें फाडून टाकलें व त्याला उत्तर पाठविलें नाहीं.

एका आठवड्यानंतर आपण फारच आजारी असून आपली शेवटची भेट घ्यायला यावें असें तिचें विनंतीवजा पत्र त्याला आलें.

त्यानें उत्तर पाठविलें नाहीं.

कांहीं दिवसांनंतर दवाखान्याच्या अधिकाऱ्याकडून त्याला एक चिठ्ठी आली. 'इर्मा नांवाची बाई मृत्यूची वाट पहात आहे. तुम्हांला भेटण्याची तिची इच्छा आहे.'

त्या सरकारी संदेशाला त्याला नकार देतां आला नाहीं. पण तो दवाखान्यांत शिरला तेव्हां त्याला पराकाष्ठेचा राग आला होता; त्याच्या भावना दुखविल्या गेल्यामुळें आपली मानहानि झाली असें त्याला वाटत होतें.

तिच्यांत विशेष फरक झालेला त्याला आढळला नाहीं. हिनें आपली फसवणूक केली असें वाटून त्यानें रुक्षपणें विचारलें, "मला कशाला बोलावलंस?"

"मला तुम्हांला अखेरचं एकदां पहायचं होतं. मला वाटलं माझी घटका भरली."

त्याचा विश्वास बसला नाहीं.

"नीट ऐकून घे," तो म्हणाला, "तुझ्यामुळं मी सबंध रेजिमेंटच्या थट्टेचा विषय होऊन बसलों आहे. हें यापुढं चालूं राहतां कामा नये."

तिनें विचारलें, " पण मीं काय केलं ? "

त्याला या प्रश्नाचें उत्तर सांपडलें नाहीं म्हणून चीड आली. पण तो म्हणाला, " सगळयांनीं तुझ्यावरून माझी थट्टा करावी आणि तरीही मी इथं तुझ्याकडे यावं याचं तुला कांहींच वाटत नाहीं ? "

इर्मानें कॅप्टन एपिंन्हेंटकडे निरखून पाहिलें. तिच्या डोळ्यांत संतापाच्या ठिणग्या तयार होऊं लागल्या होत्या. ती म्हणाली, " मीं काय केलं असावं बरं ? मी कदाचित् तुमचा योग्य तो सत्कार करूं शकलें नसेन.-मीं तुम्हांला कधींकाळीं कांहीं मागितलं म्हणून तर तुम्हीं असे वागत नाहीं ?-तुम्हीं मला आढळलां नसतां तर मी शेठजींनां सोडलंही नसतं आणि आज इथं येऊनही पडलें नसतें.- नाहीं, कुणाला जर जाब मागायचा अधिकार पोहोंचत असेल तर तो तुम्हांला खास पोंचत नाहीं. "

तो अगदीं अस्खलितपणें उत्तरला, " मीं तुला जाब विचारला नाहीं, पण तुझी जर्मन लोकांबरोबरची वागणूक इतकी लाजिरवाणी होती कीं मी तुला पुनः पुन्हां भेटायला येऊं शकत नाहीं. "

ती मोठ्या कष्टानें उठून बसली आणि बोलूं लागली, " माझी जर्मनांबरोबरची वागणूक ? पण मीं तुम्हांला सांगतें कीं त्यांनीं माझ्यावर बळजबरी केली, आणि मला स्वतःची पर्वा वाटेनाशी झाली तेव्हां त्यांना विषबाधा करण्याचं माझ्या मनानं घेतलं. मला जर स्वतःची तब्यत सुधरवून घ्यायची असती तर तेव्हां तें कांहीं अशक्य खास नव्हतं. पण मीं त्यांना मारण्याचा विडा उचलला होता-आणि अखेर त्यांनां मारूनच सोडलं ! त्यांना ठार मारलं मीं, समजलांत ? "

तो उभ्याउभ्याच पुटपुटला, " तरीही ती लाजिरवाणी गोष्ट होती. "

तिचा गळा दाटून आला. ती म्हणाली, " मला हें तर सांगा कीं, मीं त्यांनां मारून नाहींसं केलं यांत लाजिरवाणेपणा कसा काय दिसून येतो ? तुम्हीं अशा प्रकारच्या गोष्टी माझ्या घरीं येत होतां तेव्हां तर कधीं बोलत नव्हतां ? मीं केलं हें लाजिरवाणं झालं, नाहीं ? पण तुम्हीं जें हें पदक मिळवलं तें तर माझ्या एकशतांशदेखील न करतां मिळवलं !-माझा तुमच्यापेक्षां जास्त सन्मान व्हायला पाहिजे, समजलांत ? तुमच्यापेक्षां जास्त, कारण तुम्हीं मारले असतील त्यापेक्षां कितीतरी जास्त जर्मन मीं ठार केले आहेत ! "

तो दिङ्मूढ होऊन पण रागानें चडफडत तिच्यापुढें खिळल्यासारखा उभा होता. तो पुटपुटला, "शांत हो-चूप रहा-त्या पदकासंबंधीं मी-त्या गोष्टी-मी कुणाला बोलं देणार नाहीं!"

पण ती कुठें ऐकत होती? "तुम्हीं जर्मनांचं काय वाकडं केलं मला सांगा पाहूं? या शहरात तुम्हीं त्यांना येऊं दिलं नसतं तर हें सर्व घडून आलं असतं कां?-बोला ना!-तुम्हींच शांत व्हा आणि चूप रहा!-आणि मींच खरोखर तुमच्यापेक्षा जास्त शत्रूचं नुकसान केलं, ऐकलं; आणि तरीही मी त्यापायीं आपला प्राण सोडणार आहे, आणि तुम्हीं मात्र जगातल्या बायकांना आपल्या बाहूंत ओढून आपल्या वासनांचे चोज पुरवीत मजा मारत राहणार!-"

खोलींतल्या प्रत्येक पलंगावरून एकएक डोकें वर झालें होतें आणि आळीपाळीनें कॅप्टनकडे आणि इर्माकडे पाहात होतें.

"तूं शांत हो-इतकं बोलूं नकोस-"

"अरे जा रे सोंगाड्या! मी तुला ओळखून आहे. मी तुला पुन्हां बजावून सांगतें, लक्षांत ठेव, मी तुझ्यापेक्षा, तुझ्या सबंध रेजिमेंटनं मारले नसतील, इतके जर्मन एकटीनं यमसदनास पाठविले आहेत! भ्याड कुठला!!"

तो परत फिरला, झपाट्यानें लांब टांगा टाकीत निघून जाऊं लागला. जातांजातां ते उपदंशाचे सर्व दुखणाईत त्याला खवळलेले दिसले. त्याच्या मागें इर्माचा आवाज रेंगाळतच होता, 'तुझ्यापेक्षा जास्त,-हो,-मीं तुझ्यापेक्षां कितीतरी जास्त जीव घेतले-"

तो घाईघाईनें परत येऊन आपल्या खोलींत जाऊन निजला. दुसरे दिवशीं त्याला कळलें कीं ती मेली.

---

# दावा-

न्यायाधीशांची ऐटदार मूर्ति आपल्या उच्चासनावर बसून, एक डोळा मिटून व दुसरा अर्धवट उघडा ठेऊन फिर्यादी-आरोपींच्या तक्रारी कंटाळवाणेपणानें ऐकत होती [illegible] मनांत तेव्हां त्यांचें एखाद्या प्रश्नाबाबत ठाम मत झालें [illegible] जोली विरुद्ध पेटिट्पास या खटल्याचा निकाल नुकताच [illegible]

त्यानंतर कोर्टाच्या चपराशानें दुसऱ्या खटल्याचा पुकारा केला, 'हिपोलाइट, लोहार विरुद्ध सेलेस्टी लूनो, ॲंथिम् लूनोची विधवा.'

हिपोलाइट, वय वर्षें ४५, उंच, धडधाकट, सफाचट् मिशांचा असून किंचित् गायकी आवाजांत बोलणारा होता.

सेलेस्टी लूनो, वय अदमासें ४०, धिप्पाड बांधा, कपडे साधेसुधेच, कमरेच्या वर आणि कमरेच्या खालीं दोन स्नायूंचीं जबरदस्त गांठोडीं, रुंद खांद्यांवर बुटक्या मानेनें सांधलेलें डोकें, रेखीव पण फुगीर चेहेरा आणि कानठाळ्या बसतील असा किनरी आवाज असलेली; हल्लीं गरोदर असावी, कारण तिचें एकंदर शरीर कपडे फाडून बाहेर येऊं पहात होतें.

आरोपीचे साक्षीदार पुकाऱ्याची वाट पहात होते.

न्यायाधीशांनीं सुरुवात केली: हिपोलाइट, तूं आपली फिर्याद कोर्टापुढं मांड.

फिर्यादी हिपोलाइट बोलला: सरकार, आज सरासरी नऊ महिने झाले, एके दिवशीं मीं आपलं दुकान संध्याकाळीं बंद केल्यानंतर आरोपी सेलेस्टी माझ्याकडे येऊन आपल्या वांझपणाची कैफियत सांगूं लागली

न्यायाधीशः-तुझं म्हणणं स्पष्टपणं मांड.

हिपोलाइटः-ठीक आहे, सरकार. तिला मूल पाहिजे होतं, आणि मी त्या बाबतींत मदत करावी अशी तिची इच्छा होती. मी आपली हरकत नसल्याचं सांगितल्यानंतर तिनं मला शंभर फ्रँक कबूल केलं. अगदीं सरळसरळ व्यवहार होता, साहेब, हा. आतां ती माझा हक्क नाकबूल करते आहे, म्हणून मी कोर्टापुढं आलों आहे.

न्यायाः-मला नीट समजलं नाहीं. तूं म्हणतोस तिला मूल पाहिजे होतं! कशा प्रकारचं मूल? तिला मुलगा दत्तक घ्यायचा होता काय?

हिपोः-नाहीं, सरकार, तिला नवीन मूल पाहिजे होतं.

न्यायाः-नवीन मूल म्हणजे?

हिपोः-नवीन जन्माला आलेलं मूल. आम्हां दोघांपासून झालेलं.

न्यायाः-कमाल आहे बुवा! अशा प्रकारची मुलखावेगळी मागणी करण्यांत तिचा हेतु कोणता होता?

हिपोः-सरकार, सुरुवातीला मलाही तिच्या कारणांचा उलगडा होईना. मी चपापलों. पण कोणतीही गोष्ट सर्व सारासारविचार आणि चौकशी करून घेतल्या-

शिवाय न करण्याची माझी संवय असल्यामुळें मीं तिला यासंबंधीं सर्व समजावून सांग म्हणून म्हटलं, तेव्हां तिनं मला जी कांहीं माहिती दिली ती अशी.—तिचा नवरा अँथिम् लूनो मरून एक आठवडा झाला होता. त्याची इस्टेट त्यांना संतति न झाली असल्यामुळें अँथिमच्या घरच्या मंडळींना मिळून ही उघड्यावर पडणार होती. ती एका वकीलाकडे गेली तेव्हां त्यानं तिला सांगितलं कीं, तुला दहा महिन्यांच्या आंत मूल झालं तर ठीक, नाहीतर नवऱ्याच्या इस्टेटीपैकीं एक कपर्दिकाही तुला मिळायची आशा नाहीं. म्हणजे असं कीं, अँथिमच्या मृत्यूनंतर दहा महिन्यांत जर तिला मूल झालं तर तें कायदेशीरपणें त्याचं म्हणून समजलं जाणार आणि इस्टेटीचं वारस होणार.-तिनं आपल्या मनाचा घडा केला आणि त्या दिवशीं संध्याकाळीं ती माझ्या दुकानावर आली हें मीं आपणांला सांगितलंच आहे. माझ्याकडेच येण्याचं कारण म्हणजे मी आज आठ मुलांचा बाप आहे. सर्वांत मोठा शेजारच्या गांवीं किराण्याचं दुकान करतो आणि त्याचं कायदेशीर लग्नही पण झालं-

न्यायाः-या तपशिलाशीं आपणाला कर्तव्य नाहीं. मुख्याची गोष्ट सांग.

हिपोः- मी तेंच सांगतों आहे, साहेब. तेव्हां ती मला म्हणाली, "तुझा प्रयत्न जर साधला तर डॉक्टरनं गर्भारपणाची खात्री देतांच मी तुला शंभर फ्रँक देईन." सरकार, मी आपल्यापरी शिकस्त केली, आणि अडीचतीन महिन्यांनंतर-मला यश मिळालं हें कळल्यावर मला आनंद वाटला. पण मीं शंभर फ्रँकांची मागणी करतांच हिनं नकार दिला. मीं बरेचदां पैशाची मागणी केली, पण ही एक कपर्दिकाही द्यायला तयार नाहीं. मला लबाड आणि दुबळा म्हणण्यापर्यंत तिची मजल गेली आहे, पण, साहेब, तिच्याकडे पाहतांच तिचे हे शद्ब खोटे ठरतात.

न्यायाः-आरोपी सेलेस्टी, तुझं म्हणणं काय आहे?

सेलेस्टीः-सरकार, मी म्हणतें हा मनुष्य खोटं बोलतो आहे.

न्यायाः-हें तूं सिद्ध करायला तयार आहेस?

सेलेः- (शरमेनें लाल होऊन आंवढा गिळत) तें मी कसंकाय सिद्ध करणार? माझ्याजवळ पुरावाच काय आहे मुळीं? माझ्या पोटांतलं मूल याचं नाहीं हें सिद्ध करायला माझ्याजवळ कोणताच पुरावा नाहीं. पण, साहेब, हें मूल याचं नाहीं असं मी आपल्या मेलेल्या नवऱ्याची शपथ घेऊन सांगतें.

न्यायाः-मग तें कुणाचं आहे?

सेले:-( संतापामुळें थरथरत ) हें मला काय माहीत? मला-कसं सांगतां येईल?-मला वाटतं प्रत्येकाचंच असेल. हे माझे साक्षीदार आहेत, सर्व सहाचे सहाही इथं हजर आहेत. त्यांची जबानी घ्या, साहेब. त्यांना विचारा. ते सांगतील—

न्याया:-जरा शांत हो, बाई, आणि मी विचारतों त्या प्रश्नांचीं उत्तरं दे. तुझ्या पोटांत असलेल्या मुलाचा हा मनुष्य जनक नाहीं अशी शंका येण्याला तुझं कारण कोणतं?

सेले:-कारण? एक कारण, दहा कारणं, शंभर कारणं, हजार कारणं, लक्षावधि कारणं आहेत, तो याचा जनक नाहीं असं वाटायला. माझी मागणी सांगून मीं त्याला शंभर फ्रँक देण्याची कबुली केल्यानंतर मला नाहीं कां कळलं, सरकार, कीं हा आपल्या स्वतःच्याच मुलांचा मुळीं बाप नव्हे, येवढंच काय पण त्यांपैकीं एकाचाही नव्हे म्हणून?

हिपो:-( शांतपणें ) हें खोटं आहे!

सेले:-( चिडून ) खोटं?-खोटं आहे काय? याच्या बायकोला आपण सर्वांनींच पाहिलं आहे असं मला वाटतं. माझ्या साक्षीदारांना बोलवा, साहेब, आणि त्यांची जबानी घ्या.

हिपो:- ( शांतपणें ) हें असत्य आहे.

सेले:-असत्य आहे, नाहीं? त्या भुरकट केंसांच्या मुलांबद्दल तुझं काय म्हणणं आहे? तींही तुझींच, नाहीं कां?

न्याया:-एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढूं नका. तुम्हीं न्यायालयांत उभे आहांत.

सेले:-तेव्हां, सरकार, मला याच्याबद्दल शंका आली, आणि मीं विचार केला कीं, एकावर विसंबून राहण्यापेक्षां दुसऱ्याची खात्री ठेवलेली बरी. म्हणून मीं आपली परिस्थिति सिझैर, त्या पलीकडे हजर असलेल्या माझ्या साक्षीदाराला समजावून सांगितली. त्याला माझं म्हणणं पटलं. हिपोलाइट कुचकामाचा ठरला तर काय घ्या, म्हणून तो मला मदत करायला कबूल झाला. पण माझी संततीच्या बाबतींत निराशा होऊं नये हें जेव्हां माझ्या इतर पांच साक्षीदारांना कळलं तेव्हां ते पांचच काय, सरकार, पण मीं शेंकडों माणसांची मदत मागितली असती तर मला मिळाली असती. तो पलीकडचा उंच लुकास, माझा साक्षीदार, मला निक्षून

सांगूं लागला कीं, मीं हिपोलाइटला एक छदामही देतां कामा नये, कारण या लोकांनीं कवडीची मागणी न करतां मला उपकृत केलं होतं त्यापेक्षां हिपोलाइटनं जास्त असं काय केलं होतं बरं ?

हिपोः-तुझा-माझा मला पैसे देण्याचा करार झाला होता कीं नाहीं ? मी त्या पैशांवर विसंबून होतों, सरकार. माझी काय चूक आहे ? वचन द्यावं तसं पाळावं !

सेलेः-( अगदीं संतापून ) शंभर फ्रँक ! एकशें फ्रँक ? त्या येवढ्याशाकरतां एकशें फ्रँक कां रे चोरा ? ते सहाजण तिथं उभे आहेत त्यांनीं एक छदामाची कवडीसुद्धां मला मागितली नाहीं ! जरा नीट पहा त्यांच्याकडे,-एक नाहीं चांगले सहाजण आहेत ! सरकार, आपण त्यांची जबानी घ्या,-जरूर घ्या, ते खरं तें सांगतील. ( हिपोलाइटकडे वळून ) लुच्चा, त्यांना डोळे फाडून पहा जरा ! ते तुझ्याइतकेच चांगले आहेत, समजलास ? हे तर सहाच आहेत, पण मला एक, दोन, तीन, पांचशें सुद्धा फुकट मिळाले असते ! दरोडेखोर कुठला !

हिपोः-पण तुला जरी हजारों मिळाले असते तरी—

सेलेः-मीं जर मनात आणलं असतं तर मला मिळालेच असते मुळीं !

हिपोः-मीं आपलं कर्तव्य केलं त्यामुळं परिस्थिति कांहीं बदलत नाहीं.

सेलेः-( आपल्या डेऱ्याला दोन्ही हातानीं थापडीत ) मग हें तूंच केलंस हे सिद्ध कर, मी म्हणतें. कर सिद्ध लबाडा ! माझं तुला आव्हान आहे !

हिपोः-इतरांनीं केलं त्यापेक्षा मीं काहीं जास्त केलं नाहीं हें शक्य आहे. पण त्याकरतां तूं मला शंभर फ्रँक कबूल केले होते. मग तूं नंतर इतरांना कां गळ घातलीस ? तुला तसं करता येत नव्हतं मी म्हणतों मी एकटा पुरेसा होतों.

सेलेः-हें खरं नाहीं, बदमाश ! सरकार, तुम्हीं माझ्या साक्षीदारांना तर बोलवा. ते आपला जबाब खात्रीनं देतील

न्यायाधीशांनीं आरोपीतर्फे त्या साक्षीदाराना बोलाविलें. लज्जेमुळें चेहेरे घामाघूम झालेले ते सहा साक्षीदार कटघ्यापुढं उभे राहिले.

न्यायाः-लुकास, से[illegible] गर्भाशयांतील अर्भकाचा जनक तूं आहेस असं तुला वाटतं काय ?

लुकासः-होय, स[illegible]

न्यायाः-सिडॉइन् [illegible] च वाटतं कां ?

सिडॉइनः-होय, साहेब.

उरलेल्या चौघां साक्षीदारांनींही अशीच जबानी दिली.

न्यायाधीशांनीं थोडा विचार केला आणि खालील निकाल जाहीर केलाः-
ज्या अर्थी फिर्यादीला आपण सेलेस्टी मागत होती त्या मुलाचे बाप आहोत असें मानायला कारणें आहेत, आणि लुकास सिडॉइन, आणि इतर चौघेही त्या मुलावर हिपोलाइटइतकाच पण तितका खात्रीलाईक नसलेला हक्क सांगत आहेत;

पण ज्या अर्थी सेलेस्टीनें एका ठराविक रकमेच्या मोबदल्यांत हिपोलाइटची मदत अगोदरपासूनच मागून ठेवलेली होती;

आणि ज्या अर्थी फिर्यादी लग्नाच्या बंधनामुळें फक्त आपल्या बायकोशींच कायदेशीररीतीनें बांधलेला असल्यामुळें त्याला अशा प्रकारचा करार करतां येतो किंवा नाहीं हें जरी शंकास्पद असलें तरी हिपोलाइटच्या सद्हेतुबद्दल शंका मानण्याला जागा नाहीं;

त्या अर्थी कोर्ट सेलेस्टी लूनोला अशी शिक्षा सुनावतें कीं, तिनें हिपोलाइटला त्याच्या वेळेचा अपव्यय करून कायद्याविरुद्ध फुसलावलें म्हणून पंचवीस फ्रँक नुकसानभरपाई द्यावी.

---

# भेट-

तें अगदीं यदृच्छया घडून आलें असेंच म्हणणें भाग आहे, अगदीं योगायोगच तो! एकसारखें उभें राहून जमीनदार सुधीरचंद्राला थकवा आला होता म्हणून कोणाला न कळत जी खोली आधीं उघडी दिसली त्याच खोलींत त्यानें प्रवेश केला. झगझगीत प्रकाशांतून अंधाऱ्या खोलींत शिरतांच डोळे दिपून गेलेले असल्यामुळें त्याला अगोदर नीट दिसलें नाहीं.

तें आपल्या चुलतसासूचें, उर्मिलाराणीचें शयनगृह आहे हें त्यानें ओळखलें, व तिला आमंत्रित मंडळींच्या कचाट्यांतून सुटून निजण्याकरितां यावयाला बराच वेळ लागणार हें लक्षांत घेऊन तो त्या खोलींत थोडा वेळ टेंकून बसावयाला एखादी खुर्ची दिसते कीं काय तें पाहूं लागला. खोलींत प्रवेश केल्याबरोबर मधोमध ठेवलेला भला थोरला पलंग त्याच्या नजरेस पडला. त्यावर सोडलेले ते उंची,

रेशमी पडदे आणि आंतल्या मऊमऊ गाद्यागिरद्या पाहून तें आंत प्रेम पुरलेलें एखाद्या प्रेयसीचें थडगें असावें असा त्याला भास झाला. एका अर्थी तें खरेंही होतें, कारण त्या पलंगपोसाची मालकीण आतां म्हातारी होऊन गेली होती. पलंगाच्या मागच्या बाजूला भिंतीवर एक ठळकसा तांबडा ठिपका दिसत होता. तो एक आरसा होता आणि त्यानें आतांपर्यंत पलंगाची सोबत करून त्यावरच्या कितीतरी व नाहींनाहीं त्या प्रकारच्या विलासांना आपल्या पोटांत सांठवून ठेवलें होतें.

सुधीरला या सर्व कल्पनांचें हंसूं आलें, पण तो आदरयुक्त अंतःकरणानें क्षणभर त्या प्रेममंदिराच्या प्रवेशद्वारांत थबकला. एकाएकीं त्या आरशांत त्याला कांहीं हालचाल दिसून आली. आपल्या कल्पनेचा हा खेळ तर नसेल, या दृष्टीनें तो डोळे ताणून पाहूं लागला तों त्याला दोन व्यक्ति एका कोंचावरून उठून उभ्या झाल्याचें प्रतिबिंब त्या आरशांत दिसलें. लगेच त्या स्त्री आणि पुरुषानें एकमेकांच्या गळ्यांत हात घातले आणि त्यांचे ओंठ भिडले.

सुधीरनें आपल्या पत्नीचा, अपर्णाचा, चेहेरा ओळखला. तिचा सोबती त्याचा मित्र राजा गौरमोहन होता. सुधीर लगेच तोंड फिरवून परत गेला, त्याच्या डोळ्यांतली झोंप उडून गेली, आणि कांहींच झालें नाहीं अशी बतावणी करीत त्यानें पार्टी संपेपर्यंत वेळ घालविला. नंतर तो आपल्या पत्नीबरोबर घरीं परत आला, आणि ते दोघेच दिवाणखान्यांत असतांना तिला म्हणाला, "अपर्णादेवी, मी तुम्हांला उर्मिलाराणीच्या निजावयाच्या खोलींत पाहिलं आहे. मला जास्त कांहींच सांगावयाचं नाहीं,-दोष-दूषणं देणं, मारहाण करणं, किंवा चिडविणंखिजवणं हें माझ्या स्वभावाशीं विसंगत आहे. मला हें सर्व टाळायचं असल्यामुळें आपण विशेष गवगवा न करतां वेगळे होऊं या. तुमच्या खर्चासंबंधींच्या व्यवस्थेबद्दल माझे वकील सोय करतील. माझं घर सोडून तुम्हीं वेगळ्या रहाल त्याअर्थी वाटेल तसं वागण्याची मुभा तुम्हांला राहीलच; पण ज्या अर्थी तुम्हीं माझी पत्नी म्हणूनच ओळखल्या जाल त्याअर्थी तुमच्या चारित्र्याबद्दल जर कांहीं उणंअधिक माझ्या कानांवर आलं तर मात्र मी गय करणार नाहीं हें लक्षांत असूं द्या."

अपर्णानें कांहींतरी बोलण्याकरितां तोंड उघडलें, पण सुधीरनें हात वर केला, मान वांकविली आणि तो आपल्या खोलींत निघून गेला.

तो जेवढा दुःखी झाला नाहीं तेवढें त्याला आश्चर्य व वाईट वाटलें. लग्न झाल्यानंतर त्यानें तिच्यावर मनापासून प्रेम केलें होतें. आणि अलीकडे जरी तो मधूनमधून बाहेर जाई तरी तिच्याबद्दलची त्याची आसक्ति अजून ओसरली नव्हती.

ती फारच तरुण होती, फक्त चोविसाच्या जवळपास, ठुबरी, नाजुक, पण फारच गौरकाय. ती एखाद्या पुतळीसारखी होती,—चलाख, हट्टी, नखरेल, नीटनेटकी, विनोदी,-एकूण, सौंदर्याच्या सोबतीला लोभस देखील.

तो तिच्यासंबंधीं एकदां आपल्या भावाशीं बोलतांना म्हणाला होता, "माझी बायको लोभस आहे. देखणी आहे, पण तिच्या स्वभावांत मौलिक असं कांहींच नाहीं. तिला मद्याच्या पेल्याची उपमा छान शोभते. पेल्यांतल्या फेसासारखी आहे ही,- फेस संपून खऱ्या मद्यापर्यंत आपण पोहोंचतों तेव्हां आपणांला नाहीं कां आढळत कीं, तें अगदींच थोडंसं शिल्लक उरलं आहे म्हणून ?"

तो आपल्या खोलींत नाहीं नाहीं ते विचार करीत सारख्या येरझारा घालीत होता. त्याला वाटलें कीं, एक चाबूक घेऊन भररस्त्यावर,-कमींतकमी आपल्या क्लबांत आपल्या मित्रांसमोर तरी,—गौरमोहनला फोडून काढावा. पण तसें केलें असतें तर गौरमोहनचा फजीती होण्याऐवजीं सुधीरचें स्वतःचेंच हंसें जास्त होणार होतें. आपल्या संतापाचें मूळ आपला प्रेमभंग झाला हें नसून आपली प्रतिष्ठा दुखविली गेली हें आहे, याची त्याला जाणीव झाली. तो झोंपण्याकरितां अंथरुणावर पडला पण त्याला झोंप आली नाहीं.

आपल्या पत्नीची भेटगांठ चुकविण्याच्या हेतूनें सुधीर वर्षभर प्रवास करीत राहिला. तो तेवढ्यांत दोनचार देश हिंडला आणि हिंवाळ्यांत कलकत्त्याला परत आला. त्याची अपर्णाशीं एकदांही गांठ पडली नाहीं.

लोक तिच्यासंबंधीं काय बोलतात हेंही त्याला कळलें नाहीं. आणि याचमुळें ती त्या बाबतींत काळजी घेत असावी असें त्याला वाटलें. त्यालातरी हेंच पाहिजे होतें.

कलकत्त्यांत कांहीं महिने राहून त्याला कंटाळा आला; तो पुन्हां फिरतीवर निघाला. दोन वर्षें त्यानें आपल्या जमीनदारीची देखरेख करीत, वाडे-महालांची डागडुजी करण्यांत घालविलीं, पुढें एक वर्षपर्यंत आपल्या अनेक मित्रांना त्यानें आळीपाळीनें तेथें बोलाविलें; आणि याचाही जेव्हां त्याला वीट आला, तेव्हां तो परत कलकत्त्याला आला. अपर्णादेवीला टाकून दिल्याला तेव्हां सहा वर्षें झालीं होतीं.

सुधीरचें वय पंचेचाळिशीच्या घरांत आलें होतें. त्याचे केस पिकूं लागले होते, तो शरीरानें सुटला होता; आणि एकेकाळीं देखणे असलेले, लोकांचे आवडते पण आतां विस्मृत होत चाललेले लोक, जो एक खिन्नपणा चेहेऱ्यावर धारण करतात, तसा त्याच्याही चेहेऱ्यावर दिसूं लागला होता.

कलकत्त्यांत आल्यानंतर एका महिन्यानें त्याला थंडीचा विकार जडला, खोकला झाला, आणि त्याच्या डॉक्टरनें त्याला हिंवाळ्याचे उरलेले दिवस बनारस शहरीं घालविण्याचा सल्ला दिला.

तो सोमवारीं रात्रीं एक्सप्रेसनें निघाला. त्याला उशीर झाला आणि गाडी सुटण्याच्या बेतांत असल्यामुळे जो पहिल्यांदां दिसला त्या फर्स्टक्लासच्या डब्यांत तो शिरला. त्याच्याखेरीज त्या डब्यांत फक्त एकच दुसरी व्यक्ति होती. पण ती कोपऱ्यांतल्या एका बांकावर कपड्यांत इतकी गुरफटून पडली होती कीं, ती पुरुष असावी कीं स्त्री, याचा त्याला अंदाज करतां येईना. या भानगडींत काय तथ्य आहे असा विचार करून तो स्वतः आपल्या बांकावर रग पांघरून झोंपी गेला.

तो जागा झाला तेव्हां दिवस उजाडत होता. त्यानें लगेच आपल्या प्रवासी सोबत्याकडे पाहिलें. ती व्यक्ति जशी रात्रीं निजली होती तशीच अजूनही निजून होती. सुधीरनें त्या संधीचा फायदा घेऊन मुखमार्जन आटपलें व आपले केस वगैरे नीटनेटके केले. या उतारवयांत प्रवासांतल्या झोंपेनंतर मनुष्याचा चेहेरा बराच म्हातारा दिसूं लागतो असा त्याचा अनुभव होता.

इंजिनानें शिटी वाजविली, गाडी थांबली, आणि त्या व्यक्तीनें चुळबुळ केली. सुधीरला वाटलें हा जागा झाला. गाडी चालू झाली, उगवत्या सूर्याचे किरण डब्यांत शिरूं लागले आणि त्या व्यक्तीनें कुशी बदलून तोंडावरचें पांघरूण काढतांच ते तिच्या चेहेऱ्यावर पडले.

ती एक तरुण, गोरी, देखणी, गुबगुबीत बाई होती,-सुधीर तिच्याकडे स्तंभित होऊन पाहूं लागला. आपल्या डोळ्यावर कसा विश्वास ठेवावा याचेंच त्याला कोडें पडलें. ती खात्रीनें त्याची बायको असावी, पण पूर्वीपेक्षां तिच्यांत कितीतरी सुधारणा झाली होती. हो, ती जराशी स्थूल झाली होती,-हा नव्हता कां लठ्ठ झाला ?—पण तिला तो स्थूलपणा खुलून दिसत होता.

तिनें शांतपणें त्याच्याकडे पाहिलें; आपली कधींकाळीं ओळख असावी अशी तिच्या त्या नजरेवरून कुणाला शंकासुद्धां आली नसती. मग तिनें संथपणें आपली

पांघरुणें बाजूला लोटलीं. स्वतःच्या सौंदर्याची आणि सामर्थ्याची परिपूर्ण जाणीव असलेली ही एक जग पाहिलेली स्त्री आहे याचें प्रत्यंतर तिच्या प्रत्येक हालचालींत दिसून येत होतें.

सुधीरचा आपल्या मनावरचा ताबा डळमळूं लागला. ही आपलीच पत्नी कीं तिच्यासारखीच दिसणारी तिची एखादी बहीण? सहा वर्षें झालीं त्यानें तिला पाहून,-कदाचित् चूक होण्याचाही संभव होता!

तिनें जांभई दिली. आणि तिच्या त्या विशिष्ठ संवयीवरून सुधीरला तिची ओळख पटली. ती त्याच्या रोखानें वळली, तिनें त्याच्याकडे पाहिलें, पाहून न पाहिल्यासारखें केलें, आणि ती खिडकींतून निसर्गशोभा पाहूं लागली.

सुधीरला फार विचित्र वाटूं लागलें. तो डोळयांच्या कोपऱ्यांतून तिच्याकडे निरखून पाहूं लागला.

होय, ती खात्रीनें आपली पत्नीच असली पाहिजे. त्याला शंका येण्याचें कारणच काय मुळीं? तिच्या नाकासारखें नाक दुसऱ्या स्त्रीचें असणेंच अशक्य! आणि त्याला तिच्यासंबंधींच्या कितीतरी आठवणी आठवूं लागल्या. तिच्या शरीरांतले त्याचे आवडते अवयव, तिच्या मांडीवरचा एक आणि पाठीवरचा एक तीळ, कितीदां त्यानें त्यांचीं चुंबनें घेतलीं होती बरें? त्या काळांतल्या प्रेमाच्या उन्मादाची त्याला जाणीव होऊं लागली, आणि तिच्या शरीराचा गोड सुवास, त्याच्या खांद्यांवर आपले हात ठेवीत असतांनाचें तिचें हास्य, तिचा मधुर आवाज, तिचा एकएक खट्याळपणा, सर्व सर्व त्याला आठवूं लागलें.

पण तिच्यांत कितीतरी फरक पडला होता आणि सुधारणा झाली होती! ती म्हणावें तर ती, न म्हणावें तर दुसरी, अशी ती झाली होती. ती जास्त पोक्त, मुरलेली, स्त्रीत्वानें भारावलेली, लोभस आणि हवीहवीशी अशी त्याला वाटली.

अनाहूतपणें आगगाडींत भेटलेली ही नवखी, बिनओळखीची स्त्री वास्तविक त्याची मालमत्ता होती, आणि त्यानें तिला फक्त हुकूम करण्याचाच उशीर होता कीं, 'मला तूं हवी आहेस!'

तो एकदां तिच्या बाहुपाशांत झोंपी जात असे, केवळ तिच्या प्रेमाकरतांच जगत असे; आणि आतां त्याची तिची पुनर्भेट झाली होती खरी, पण अपर्णा इतकी बदलली होती कीं तिला ओळखणें सुद्धां कठिण झालें. ती आणि दुसरी कुणीतरी अशा दोघींचा संयोग तिच्यामध्यें झाला होता. तिला त्यानें टाकून

दिल्यानंतर तिच्यांत दुसऱ्याच व्यक्तित्वाचा जन्म होऊन वाढ झालेली होती. ही तीच होती हें निःसंशय,–त्याची हक्काची वस्तूच,–पण पूर्वीपेक्षां कितीतरी खात्रीचें तिचें तें हास्य आणि स्वसामर्थ्याची जाणीव! दोन स्त्रियांची एक झालेली अशी ही स्त्री होती,–तिच्यांत बऱ्याचशा नवीन गोष्टी अवतरल्या होत्या तरी गतस्मृतींची तिच्यांत भेसळ झाली होती. ती नवीन शरीर धारण केलेली त्याची बयकोच होती, पण या नवीन शरीराचा त्यानें उपभोग घेतला नव्हता.

आणि मग त्याला पटलें कीं, सहासात वर्षांच्या अवधींत आपलें सर्वच कांहीं बदलत असतें, फक्त बाह्यरेषा काय त्या ओळखतां येतात. आणि कधींकधीं तर त्याही नाहींशा होतात.

रक्त, केंस, कातडी, सर्व सर्वकांहीं जुनें नाहींसें होऊन नवीन तयार होतें, आणि बरींच वर्षे एकमेकांना न भेटलेल्या व्यक्ति जेव्हां अचानक भेटतात तेव्हां त्यांना आपल्यासमोर एक नवखीच व्यक्ति उभी आहे असें वाटतें,–फक्त नांव काय तें जुनें असतें.

शरीरच काय, पण अंतःकरण आणि भावनासुद्धां बदलूं शकतात, विचार बदलूं शकतात–नवीन तयार होऊं शकतात. एकूण चाळीस वर्षांच्या वयांत आपण या संथ परिवर्तनशील क्रियेमुळें चारपांच नवीन अवतार धारण करीत असतों.

एकसारखा विचार करून सुधीरला त्रास होऊं लागला. त्यानें अपर्णाला तिच्या चुलतीच्या रंगमहालांत पकडलें होतें तेव्हां त्याच्या मेंदूला असाच ताण पडला होता. तो रागावला खास नव्हता, पण आतां ही समोर बसलेली स्त्री त्या दिवशींची किरकोळ शरीरयष्टीची भावली नव्हती.

आपण काय करावें हा पेंच त्याला पडला. तिला कसें संबोधावें आणि तिच्याशीं बोलावें तरी काय? तिनें त्याला ओळखलें होतें काय?

गाडी पुन्हां थांबली. तो उभा झाला आणि वांकून म्हणाला, "देवी, तुम्हांला कांहीं पाहिजे असेल तर आणून देऊं कां?"

तिनें त्याला आपादमस्तक न्याहाळून पाहिलें, आणि किंचित् देखील आश्चर्य, घाबरटपणा किंवा राग न दाखवितां अगदीं बेपर्वाईनें उत्तर दिलें, " मला कांहीं नको. मी आपली आभारी आहे. "

तो खालीं उतरला आणि प्लॅटफॉर्मवर त्यानें दोनतीन चकरा मारल्या. तो विचार करीत होता, आणि तिच्या बेपर्वाईमुळें दुखावलेलें आपलें मन सांवर-

ण्याचा प्रयत्न करीत होता. आतां पुढें काय करायचें ? आपण जर आतां दुसऱ्या डब्यांत बसलों तर तिला वाटेल हा आपणांला भिऊन पळाला. यापुढें नम्रपणें वागावें कीं बेफिकिरी दाखवावी ? नम्रपणें वागलों तर आपण दयेची भीक मागतों आहोंत असें होईल. मालकी हक्कानें तिच्याशीं बोललों तर ? आपलें हंसें होण्याचाच जास्त संभव राहणार; आणि शिवाय आपणांला तसें वागण्याचा हक्कतरी कुठें आहे ?

तो डब्यांत येऊन बसला.

त्याच्या गैरहजेरींत तिनें आपले कपडे आणि केंस नीटनेटके करून घेतले होते, आणि ती आतां आपल्या बांकावर पाय ताणून बसली होती. ती पूर्वी-पेक्षां जास्तच कमनीय दिसत होती, पण तिचा चेहेरा मात्र पूर्वींइतकाच निर्विकार होता.

तो तिच्याकडे वळून म्हणाला, " अपर्णा, लाडके, आज सहा वर्षांच्या वियो-गानंतर,-अगदीं सलोख्यानं वेगळं राहिल्यानंतर,-योगायोगानं आपण एकत्र आलों आहोंत, तेव्हां आपण एकमेकांकडे शत्रुत्वाच्याच नात्यानं पहायचं काय ? आपण फक्त दोघंच इथं आहोंत,-हे ठीक आहे कीं वाईट आहे कुणास ठाऊक. मी कांहीं आतां डबा बदलत नाहीं. तुला नाहीं कां वाटत कीं, आपण आपला प्रवास संप-तपर्यंत मित्रत्वाच्या नात्यानं परस्परांशीं गोष्टी कराव्या म्हणून ? "

तिनें पूर्वींइतक्याच शांतपणें उत्तर दिलें, " जशी तुमची इच्छा. "

तो थबकला. त्याला क्षणभर कशी सुरुवात करावी तें लक्षांत येईना. पण आत्मविश्वास त्याच्या मदतीला धांवून आला. तो मधल्या बांकावर येऊन बसला आणि म्हणाला, " मला असं दिसतं कीं मीं तुझं प्रियाराधन करावं अशी तुझी इच्छा आहे.-तसंच कां होईना ? मला त्यांत आनंदच वाटेल, कारण तूं फार सुरेख आहेस. गेल्या सहा वर्षांत तूं किती सुधारली आहेस याची तुला जाणीवदेखील नसेल. तूं कांहीं वेळापूर्वी आपल्या पांघरुणांतून तोंड काढून पाहिलंस तेव्हां ज्या अननुभूत आनंदलहरी माझ्या मनांत उसळल्या तशा इतर कोणत्याही स्त्रीला पाहून मीं अनुभवल्या नसतील. मलातरी तुझ्यांत असा फेरबदल होईल हें शक्य वाटलं नसतं. "

डोकें न हलवितां किंवा त्याच्याकडे न पाहतां ती म्हणाली, " तुमच्या बद्दल मला असं म्हणतां येणार नाहीं. तुमची बरीच अधोगति झालेली दिसत आहे. "

तो जरा बावरला, त्याचा चेहेरा लाल झाला, पण तो निरुपायदर्शक स्मित करीत उत्तरला, " तुझी टीका किंचित् कठोर वाटते. "

" कां बरं? मी खरं तें सांगतें. मला वाटतं, तुम्ही माझ्यावर आपलं प्रेम लादण्याचा प्रयत्न खास करत नाहीं ? मग मी तुमच्याबद्दल कांहींही बोललें तरी तें तुम्हांला काय म्हणून बोचावं?-पण तुम्हांला तें आवडत नाहीं,नाहीं कां? मग आपण दुसरं कांहींतरी बोलूं या.-मीं तुम्हांला सहा वर्षांपूर्वी पाहिलं त्यानंतर तुम्हीं काय करत होतां? "

त्याला जरा चमत्कारिक वाटलें. तो पुटपुटला, " मी?-मीं प्रवास केला, शिकार केली, आणि- तूं म्हणतेस तसा म्हातारा झालों.-आणि तूं? "

ती अगदीं शांतपणें उत्तरली, " तुम्हीं हुकूम दिला होता त्याप्रमाणें मी आपल्या चारित्र्याबद्दल कांहीं उणंअधिक तुमच्या कानांवर येऊं नये याबद्दल खबरदारी घेत दिवस काढले. "

तो तिला कांहींतरी कठोर शब्द बोलणार होता, पण त्यानें स्वतःला आवरलें व आपल्या पत्नीच्या हाताचें चुंबन घेत म्हटलें, " मी तुझा आभारी आहे. "

तिला आतां मात्र आश्चर्य वाटलें. तो अजूनही आपले मनोविकार पूर्वीसारखाच बिनचिडतां कह्यांत ठेऊं शकत होता.

तो म्हणाला, " ज्याअर्थी तूं माझी पहिली विनंति मान्य केली आहे त्याअर्थी आपण आतां कठोरपणा सोडून मोकळेपणानं एकमेकांशीं बोलूं या कां? "

" काय म्हणालांत, कठोरपणा? मला तर नाहीं कांहीं कठोरपणा वाटत!-तुम्ही मला अगदीं परके आहांत. मीं फक्त आपलं अप्रिय संभाषण चालूं ठेवलं आहे येवढंच! "

तो अजून तिच्याकडे पहात होता. ती कठोरपणें वागत असून देखील त्याच्या मनांत मालकी हक्काची जाणीव उद्भवूं लागली होती.

आपण त्याच्या भावना दुखविल्या हें लक्षांत येऊन तिनें विचारलें, " तुमचं वय आतां काय असेल? मला वाटत होतं तुम्ही दिसतां त्यापेक्षां तरुण असाल! "

तो वरमला. " माझं वय पंचेचाळीस आहे, " तो म्हणाला. " मी तुमच्या उर्मिलाराणीसंबंधीं विचारपूस करायला विसरलोंच! तुमच्या भेटीगांठी होतात ना? "

तिनें त्याच्याकडे एक कटाक्ष फेंकला. " हो तर, आणि ती सुखरूपही पण आहे. "

ते एकमेकांसमोर खळबळलेल्या आणि चिडलेल्या मनःस्थितींत बसले होते. एकाएकीं तो म्हणाला, " अपर्णा, मीं आपला विचार बदलला. तूं माझी पत्नी आहेस आणि तूं आज माझ्याबरोबर यावं असं मला वाटतं. तूं आतां नैतिक आणि शारीरिकदृष्ट्या सुधारलेली दिसतेस तेव्हां मीं तुझा स्वीकार करायचं ठरवलं आहे. मी तुझा पति आहें आणि तुला पदरांत घेणं हा माझा अधिकारच आहे. "

ती थक्कच झाली. त्याचे विचार कळावेत म्हणून ती त्याच्याकडे निरखून पाहूं लागली, पण तेथें तिला कांहीं बोध होतासा दिसेना. ती म्हणाली, " माझा नाइलाज आहे, कारण मीं आपला कार्यक्रम अगाऊच ठरवून टाकला आहे. "

" हें ठीक झालं नाहीं. मला कायद्यानं अधिकार पोंचतो, आणि मी त्याचा उपयोग करून घेणार आहें. "

पाटणा स्टेशन जवळ येत चाललें होतें, आणि इंजिनानें शिटी वाजवून गति कमी केली होती. अपर्णा उठून उभी राहिली, तिनें काळजीपूर्वक आपलीं पांघरुणें गुंडाळलीं आणि आपल्या नवऱ्याकडे वळून ती उद्गारली, " हें पहा, जमीनदारसाहेब, मीं मुद्दाम घडवून आणलेल्या या प्रवासाच्या प्रसंगाचा असा वाईट उपयोग करूं नका. तुमच्या सल्ल्याप्रमाणें कांहींही झालं तरी तुमच्याकडून किंवा इतर लोकांकडून माझ्यावर शिंतोडे पडूं नयेत म्हणून मी काळजी घेत आलें आहे.–तुम्हीं बनारसला जाता आहांत, नाहीं कां ? "

" तूं जिथं जाशील तिथंच मीही जाईन. "

" तें शक्य नाहीं. मी काय म्हणतें तें ऐका, आणि माझी खात्री आहे कीं मग तुम्हीं मला माझ्या मनाप्रमाणें वागूं द्याल.–थोड्याच वेळांत आपण स्टेशनावर पोहोंचूं म्हणजे तिथं प्लॅटफॉर्मवर तुम्हांला माझी चुलती आणि आमची एक मैत्रीण आपल्या नवऱ्याबरोबर आलेल्या आढळतील. मीं अशीच योजना केली आहे कीं, त्यांनीं आपणांला असं एकत्र पहावं, आणि मीं तुमच्याबरोबर रात्रीं एकाच डब्यांत प्रवास केला याची खात्री करून घ्यावी.–घाबरण्याचं कांहीं कारण नाहीं, ते ही कौतुकास्पद गोष्ट सर्वत्र सांगत सुटतील.

" मीं तुम्हांला आत्तां सांगितलंय कीं मीं तुमचा सल्ला बिनचूक पाळून वरपंगी संभावितपणानं वागत आलें आहे म्हणून. याशिवाय इतर तपशिलाला विशेष

महत्व देण्याची कांहीं जरूर नाहीं, नव्हे कां ? याप्रमाणें मला वागतां यावं म्हणून मी तुमच्या सोबतींत दिसेन अशी युक्ति घडवून आणली. तुम्हीं मला कोणताही गवगवा होतां कामा नये असं सांगितलं, आणि मी त्याप्रमाणें वागतही पण आहे. परंतु झालंय काय,-मला धाकधुक वाटते-कीं-"

गाडी अगदीं थांबतपर्यंत ती चूप राहिली, आणि तिचे मित्र दार उघडण्या-करितां पुढें सरसावले तों म्हणाली, "-कीं मी गर्भार आहे."

काकूबाईनीं पुतणीला आलिंगन दिलें, आणि आपल्या नवऱ्याकडे बोट दाखवून त्याच्या आश्चर्याचा भर ओसरून, खऱ्या परिस्थितीची त्याला जाणीव व्हावयाच्या आधींच, अपर्णा उद्गारली, "तुम्हीं जमीनदारसाहेबांना, माझ्या पतींना, नाहीं कां ओळखलं ? त्यांच्यांत बराच फरक पडला आहे हें खरं. पण मी एक-ट्यानंच प्रवास करूं नये म्हणून ते इथपर्यंत मला सोबत आले. आम्हीं अशा छोट्याछोट्या सफरी मधून मधून करत असतों. आम्ही एकत्र राहूं शकलों नाहीं तरी जुने मित्र तर आहोंत । कीं नाहीं ?-आतां मात्र ते पुढं निघून जाणार आहेत. त्यांना माझ्या सोबतीचा कंटाळा आला."

तिनें आपली मान त्याच्यापुढें वांकवून त्याचा निरोप घेतला, आणि ती उडी मारून खालीं प्लॅटफॉर्मवर उतरली.

सुधीरनें लगेच दार लावून घेतलें. तो इतका भांबावून गेला होता कीं, त्याला एक शब्द बोलतां येईना किंवा कांहीं ठरवितां येईना. त्याची बायको आणि तिचे मित्र परत जातांना खिदळत होते तें त्याच्या कानांवर आलें.

ती त्याला पुन्हां भेटली नाहीं. आणि तिनें जें कांहीं सांगितलें होतें तें खरें होतें कीं खोटें होतें याची त्यानें शहानिशाही कधीं केली नाहीं.

---

# ऐवजी-

"मोहितीणबाई ?"

"हो, हो, मोहितीणबाई. मोहिते वकीलाची बायको."

"अशक्य !"

"मी सांगतों ना! तें शक्य आहे म्हणून !"

" मोहितीण, ती डोक्यावरून पदर घेणारी, धार्मिक, परोपकारी म्हातारी बाई; त्या केसांचा टोप घालणाऱ्या पोक्त वकीलीणबाई ? म्हणतोस तरी काय तूं ? "

" मी तिच्याचबद्दल सांगतों आहे. "

" चल रे, वेड लागलंय् तुला. "

" मी शपथ घेऊन सांगतों कीं ती मोहितीणच ! "

" मग सांग तरी ती हकीकत. "

" सांगतों, ऐक. हायकोर्ट वकील मोहित यांच्या हयातींत ती त्यांच्या कारकुनांचा स्वतःच्या खाजगी कामाकरतां उपयोग करून घेत असे असं लोक बोलत. आपल्या समाजांत गुप्त पापाचरण करून शिवाय वर अढळ तत्वांवर विश्वास ठेवणारा असा जो सन्माननीय श्रेष्ठ मध्यमवर्ग आहे त्यापैकीं ती होती. तिला देखणे तरुण पुरुष आवडत; पण यांत अनैसर्गिक असं काय आहे, मी म्हणतों ? आपणां पुरुषांना सुरेख मुली नाहीं कां आवडत ?

" मोहिते वकील परलोकवासी झाल्यानंतर त्यांची विधवा पत्नी तिच्या ठराविक ऐश्वर्याला साजेशा इतमामानं आपलं आयुष्य संथपणानं आणि संभावितपणें घालवूं लागली. ती रोज देवळांत जाई, आपल्या स्नेह्याशेजाऱ्यांबद्दल वरंवाईट बोले, पण तिनं स्वतःविरुद्ध बोलायची लोकांना संधि दिली नाहीं. आणि असे दिवस घालवीत असतां जेव्हां ती म्हातारी होऊं लागली, तेव्हां आपण तिच्यासारख्या इतर कितीतरी आंबट चेहेऱ्याच्या बाया पहातों तशी होत चालली. पण मी जी जवळजवळ असंभवनीय अशी ही हकीकत तुला सांगणार आहे ती गेल्या शुक्रवारीं घडली.

" माझा मित्र सरदार शार्दूलसिंग किल्ल्यांतल्या लष्कराच्या एका पथकाचा कॅप्टन् आहे हें तुला माहीतच आहे. तो जेव्हां काल सकाळीं नोकरीवर गेला तेव्हां त्याच्या पथकांतल्या दोघां शिपायांचं खूपच भांडण झालं असं त्याला कळलं. त्या दोघांची चांगली कुस्ती झाली आणि नंतर सलोखाही पण झाला. अधिकाऱ्यानं त्यांना भांडणाचं कारण विचारलं तेव्हां त्यांनीं सांगितलं कीं आपण मोहितीणबाईवरून आपसांत भांडलों. "

" असं काय ? "

" होय, मित्रा, त्या विधवेवरून. पण मी कशाला तें सर्व सांगूं ? मानाजीरावच्या शब्दांतच आपण तें ऐकूं याः "

" ' कप्तानसाहेब, त्याचं असं झालं. दीडएक वर्ष झालं असेल, एके दिवशीं संध्याकाळीं सहा-सात वाजतांच्या दरम्यान मी किल्ल्याखालच्या रस्त्यावर असाच फिरत होतों, इतक्यांत एक बाई माझ्याजवळ येऊन अगदीं सहजगत्या एखादा प्रश्न विचारावा तशी म्हणाली, " शिपाईबुवा, तुम्हांला प्रामाणिकपणें आठवड्याचे दहा रुपये कमावण्याची इच्छा आहे काय ?" अर्थात् मी कांहीं नाहीं थोडाच. म्हणणार होतों !–पैसा कुणाला नको असतो ?–ती पुढं म्हणाली, "तर मग मला उद्यां दुपारीं बारा वाजतां भेटा. माझं नांव श्रीमती मोहिते, आणि माझा पत्ता नंबर ६, रविवार पेठ."

" ' " मी खात्रीनं उद्यां त्या पत्त्यावर हजर होईन," मी म्हणालों. तिला फार समाधान वाटल्यासारखं दिसलं,कारण ती जातांना म्हणाली, " शिपाईबुवा, मी तुमची फार आभारी आहें."

" ' " मीच उलट तुमचे आभार मानायला पाहिजेत, बाईसाहेब," मी उद्गारलों. पण दुसरे दिवशीं बारा वाजेपर्यंत त्या संबंधीं मीं खूप डोकं खाजवून विचार केला तरी हें काय असावं याचा मला अंदाज लागेना.

" ' बरोबर बाराला दुपारीं मीं तिच्या घराची कडी वाजवितांच त्या बाईनं स्वतः दार उघडून मला आंत यायला सांगितलं. तिच्या वेणींत तीनचार फुलं खोंवलेलीं होतीं.

" ' " आपण जरा थोडी घाईच करायला पाहिजे," ती म्हणाली. "कारण कदाचित् माझा नोकर थोड्या वेळानंतर परत येईल."

" ' " त्याला माझी ना नाहीं," मी म्हणालों. " पण मला काय करावं लागणार तें कळलं म्हणजे बरं."

" ' पण ती नुसती हंसली आणि म्हणाली, " कमाल आहे, तरुण मनुष्या, तुला हें देखील समजत नाहीं कीं काय ?"

" तुमची कसम, सरदारसाहेब, तिच्या बोलण्याचा अर्थ माझ्या लक्षांत आला नाहीं. पण ती सोफ्यावर माझ्या शेजारीं येऊन बसली आणि म्हणाली, " तूं जर कां हें कुणाला सांगितलंस तर मी तुझी तुरुंगांत रवानगी करीन. माझी शपथ घे पाहूं यांतलं कांहीं तूं सांगणार नाहीं अशी ?"

" ' तिनं सांगितली तशी मीं शपथ घेतली तरीही मला या प्रकरणाचा उलगडा होईना. माझ्या कपाळावर घाम आला होता म्हणून मीं आपल्या पग-

डीच्या आंतला हातरुमाल बाहेर काढला. तिनं तो माझ्या हातांतून ओढून घेतला आणि माझं कपाळ आपल्या पदरानं टिपलं. मग तिनं -माझा तोंडभर मुका घेतला, आणि ती माझ्या कानांत कुजबुजली, " मग आहे कां कबूल ? "

" ' " मीं तर तुम्हांला आधींच सांगितलं, बाईसाहेब, " मी म्हणालों, " कीं तुम्ही जें काय सांगाल त्याला माझी तयारी आहे. मी तेवढ्याकरतांच नाहीं कां इथं आलों ? "

" ' मग मात्र तिनं–प्रत्यक्ष कृतींत मीं काय करायला पाहिजे याची मला जाणीव करून दिली. आणि, कप्तानसाहेब, जेव्हां तिला काय हवं हें मीं ओळखलं तेव्हां मीं आपली पगडी काढून ठेवली, आणि तिला सिद्ध करून दिलं कीं लष्करांत शिपाई कधींच पेन्शनवर निघत नसतो !–ती वयानं तरुण नसल्यामुळं मला त्यांत विशेष गोडी वाटली अशांतला भाग नाहीं, पण आजकाल पैसा महाग असल्यामुळें, आणि मला आपल्या नातेवाइकांना मदत करायची जरूर आहे म्हणून, या बाबतींत विशेष चोखंदळपणा करावा असं मला वाटलं नाहीं. मला त्या वेळीं जर कोणता विचार सुचला असेल तर तो हाच कीं, या दहा रुपयांपैकीं पांच मला आपल्या म्हाताऱ्याला पाठवितां येतील.

" ' मी आपली ड्यूटी केल्यावर जेव्हां जाऊं लागलों, हुजूर, तेव्हां तिनं थोडं आणखीं थांबण्याबद्दल मला गळ घातली, पण मीं म्हणालों, " बाईसाहेब, ज्यानंत्यानं आपापल्या हिशेबानं वागायला पाहिजे. आज दारूच्या एका पेल्याला एक रुपया पडतो, दोन पेल्यांचे दोन रुपये होतात. "

" ' तिला माझ्या म्हणण्याचा अर्थ समजला. तिनं एक दहा रुपयांची नोट मला दिली. ती नोट उलगडून मी पाहूं लागलों, मनांत त्या नोटीच्या विल्हेवाटीबद्दल विचार चालले होते. पण ती मात्र माझ्या चेहऱ्याकडे पहात होती. माझ्या मुकेपणामुळें तिचा कदाचित् गैरसमज झाला असावा, कारण तिनं विचारलं, " कां, येवढं पुरेसं नाहीं असं वाटतं ? "

" ' " छे, बाईसाहेब, तसं कांहींच नाहीं, " मी उत्तरलों. " पण तुमची हरकत नसेल तर मला पांचाच्या दोन नोटा द्या. " तिनं ती नोट घेऊन मला दोन दिल्या, आणि मी पोस्टऑफिसच्या रस्त्यानं परत किल्ल्याकडे निघालों.

" ' सरदारसाहेब, हा व्यवहार आज दीड वर्ष अखंड चालू आहे. दर मंगळवारीं आपण आम्हांला रात्रीं बारापर्यंत बाहेर भटकण्याची सवलत देतां तेव्हां

मी तिच्याकडे जातों,आणि तिलाही ती वेळ सोइस्कर होते, कारण तिचा नोकर काम आटपून परत गेलेला असतो.–पण गेल्या आठवड्यांत मी आजारी पडलों असल्यामुळें मला दवाखान्यांत पडून रहावं लागलं. मंगळवार उजाडला आणि मला बाहेर जातां येणार नाहीं म्हणून मी मनांत खूप चडफडलों. माझी दर आठवड्याची दहा रुपयांची प्राप्ति नव्हती कां बुडणार? मीं विचार केला, "जर दुसरा कुणी तिच्याकडे गेला तर आपली रोजी बुडाली!" पण लगेच मनांत दुसरा विचार आला, आणि आमच्या खेड्यातलाच माझा सोबती सर्जेराव याला मी बोलावूं पाठविलं आणि एकंदर परिस्थिति समजावून सांगितली.

" ' "पांच रुपये तुझे आणि पांच माझे," मीं त्याला बजावून सांगितलं. तो कबूल झाला, आणि मीं सांगितलेल्या खाणाखुणा लक्षांत ठेवून तो वकीलीणबाइच्या घरीं पोहोंचला. त्यानं कडी वाजवतांच तिनं दार उघडलं, त्याला आंत येऊं दिलं, दार पुन्हां बंद केलं, पण तिनं त्याचा चेहेरा न्याहाळून न पाहिल्यामुळें हा आलेला इसम मी नव्हे हें अगोदर तिच्या लक्षांत आलं नाहीं. नाहींतरी आम्हां लष्करी शिपायांनीं सरकारी गणवेश घातला असला म्हणजे आम्ही सर्व सारखेच दिसतों.

" ' पण मग तिनं जेव्हां सर्जेरावकडे निरखून पाहिलं तेव्हां जरा रागवूनच विचारलं, "कोण रे तूं? काय पाहिजे तुला? मी तर तुला ओळखत नाहीं!"

" ' मग सर्जेरावनं तिला सर्व परिस्थिति समजावून सांगितली. मी आजारी असल्यामुळें त्याला मीं ऐवजीवर पाठविलं होतं हें जेव्हां तिनं ऐकलं, तेव्हां तिनं त्याला आपादमस्तक न्याहाळून घेतलं आणि बभ्रा न करण्याबद्दल शपथ घ्यायला लावलं. नंतर तिनं सर्जेरावचा स्वीकार केला, कारण तो कांहीं कमी फांकडा नाहीं, कप्तानसाहेब.–पण,–तो परत आल्यानंतर मला माझ्या हिश्शाची अर्धी रक्कम देईना!–ते पैसे जर मला स्वतःकरतां पाहिजे असते तर मीं हूं कीं चूं केलं नसतं, पण ते पैसे मला आपल्या म्हातान्याकरतां हवे होते, आणि म्हणून मीं त्याची लटपट चालूं देणं शक्य नव्हतं. मी म्हणालों, "तूं शिपाईगडी ना रे? आपलं वचन पाळत नाहींस? थूः तुझ्या जिनगानीवर!"

" ' त्यानं मुठी वळल्या, सरकार, आणि म्हणतो काय, म्हणे अशा हमाली ड्यूटीची प्राप्ति दुप्पटच असायला पाहिजे.–आतां ड्यूटीबद्दल प्रत्येकाच्या कल्पना वेगवेगळ्या असतात, कप्तानसाहेब; त्याला ती हमाली नको होती तर नसती करायची!–पुढचं तुम्हीं जाणतांच.'

" मला ही गोष्ट सांगत असतां कॅप्टन् शार्दूलसिंगची हंसतां हंसतां पुरेवाट झाली, पण त्यानं त्या दोघां सैनिकांना दिलं होतं तसंच माझ्याकडूनही या गोष्टीची वाच्यता न करण्याबद्दल वचन घेतलं. तेव्हां तूंही मला फशीं पाडूं नकोस; ही गोष्ट आपल्या पोटांतच ठेव, बरं कां ! "

" त्याची खात्री असूं दे रे. पण शेवटीं काय झालं ? "

" काय व्हायचंय ? अरे, अशी गंमत क्वचितच आढळून येते. मातोश्री मोहितेनं त्या दोघांही शिपायांना ठेऊन घेतलं आहे; जो तो आपापल्या ठराविक दिवशीं व वेळीं तिच्याकडे जात असतो. सर्वांचंच समाधान होतं. "

" युक्ती पण युक्ति आहे बुवा ! "

" आणि मानाजीराव नेहमींप्रमाणं आपल्या म्हातारा-म्हातारीला पैसे पाठवीत असतो. "

---

# समरप्रसंग-

चहाच्या टेबलावर दोघांजणांकरितां व्यवस्था करून ठेवलेली होती. राय अक्षयकुमार चक्रवर्ती बहादुरनें आपली हॅट काढून एका खुर्चीवर फेंकली आणि रायबहादुरीण जयश्रीदेवी चक्रवर्ती भिंतीवरच्या मोठ्या आरशांत आपलें प्रतिबिंब पहात सस्मितपणें बाहू वर करून केंसाच्या एकदोन बटा नीट करूं लागली. तिचा नवरा गेलीं दोन मिनिटें तिच्याशीं कांहीं बोलण्याचा हिय्या करीत होता, पण त्याला नीट शब्द सुचेनात. अखेर तो एकदांचा म्हणालाच, " तूं तर आज पार्टीच्यावेळीं लघळपणाचा कळसच केला ! "

तिनें त्याच्या नजरेस नजर भिडवून पाहिलें. तिच्या दृष्टींत विजयोन्माद आणि धीटपणा दिसत होता. " खात्रीनं ! " तिनें उत्तर दिलें, आणि ती खुर्चीवर बसून चहा गाळूं लागली.

तिचा नवरा तिच्या समोरच्या खुर्चीवर बसला. " माझं किती हंसं झालं असेल याची तुला कल्पना आहे ? " तो म्हणाला.

" ही भांडणाची सुरवात समजायची कां ?" तिनें भिंवया वर करीत शांतपणे विचारलें. " तुम्हांला माझ्या वागणुकीवर टीका करायची आहे काय ?"

" तसं नव्हे; मला फक्त येवढंच म्हणायचं होतं कीं रवींद्र पॅाल ज्या मोकळेपणानं तुझ्याशीं वागत होता तें कांहीं योग्य नव्हतं. मला जर अधिकार असता तर–मीं तें सहन केलं नसतं."

" म्हणजे ? तुम्हांला झालंय् तरी काय ? गेल्या वर्षानंतर तुमचे विचार खात्रीनं बदलले असले पाहिजेत. एका वर्षापूर्वी माझ्याभोंवतीं कोण घोंटाळतं किंवा नाहीं याची तुम्हांला पर्वा नसावी असं वाटत असे. तुमचं एक अंगवस्त्र आहे, जिच्यावर तुम्हीं जिवाभावानं प्रेम करतां अशी एक विवाहित बाई आहे, असं मला कळलं तेव्हां मी देखील तुम्हांला हेंच म्हणालें होतें कीं, मृणालिनी दासगुप्ता आणि तुमच्याबद्दल लोकांनादेखील शंका येऊं लागली असून मला तें नीट वाटत नाहीं, आणि माझं हंसं होऊं पहातं. तेव्हां तुम्हीं काय बरं म्हणालां होतां ? आठवतं तुम्हांला ? तुम्हीं चक्क सांगितलं, 'तूं मोकळी आहेस, खुद्‌मुखत्यार आहेस; दोन सुशिक्षित बुद्धिमान स्त्री-पुरुषांचं लग्न ही एक भागीदारी आहे, सामाजिक करार आहे; नैतिक बंधन नव्हे,' असंच ना ?–तुमची राख माझ्यापेक्षां निःसंशय जास्त लोभस आहे आणि तिचं स्त्रीत्व विशेष मोहक आहे अशी तुम्हीं माझी जाणिव करून दिली होती. तिच्या 'लैंगिक आकर्षणाची जादू' असं तुम्हीं म्हणालां होतां. अर्थात् तुम्हीं हें सर्व फारच निवडक शब्दांत बोललांत, आणि माझ्या भावना दुखवूं नयेत म्हणून आपल्यापरी पराकाष्ठा केली हें देखील मी कबूल करतें. मी त्याबद्दल तुमची आभारी सुद्धां आहे याची खात्री असूं द्या. पण तुमच्या म्हणण्याचा सरळ अर्थ मला नीट कळून आला होता.

"त्यानंतर आपण वेगळे राहण्याचं ठरवलं; म्हणजे एकाच घरांत पण एकमेकांशीं संबंध न येऊं देतां. आपल्याला एक अपत्य झालं असल्यामुळें जगाच्या नजरेंत आपला परकेपणा दिसून येतां कामा नये ही आपली इच्छा. पण मी जर गुप्तपणें व्यवस्था करूं शकलें आणि एखादा प्रियकर मिळवूं शकलें तर तुमची केव्हांही कोणत्याच प्रकारची हरकत नाहीं असंही तुम्हीं कबूल केलं होतं. तुम्हीं बऱ्याचशा विवाहित स्त्रियांचीं उदाहरणं सांगून अशा प्रसंगीं त्या किती बेमालूमपणें आणि चलाखीनं वागतात या विषयावर एक मननीय व्याख्यानही दिलं होतं. मी सर्व समजलें होतें. त्या वेळीं तुम्हीं मृणालवर फारच प्रेम करीत होतां आणि माझं वैवाहिक–कायदेशीर–प्रेम तुमच्या मार्गांतली धोंड होऊन बसलं होतं. पण त्यानंतर आपण सुरळितपणें आपापला कार्यक्रम पार पाडत आलों आहोंत. आपण

समाजांत एकमेकांच्या सहवासांत वावरतों खरे, पण इथं, आपल्या या घरांत, आपण एकमेकांना परके होऊन राहतों. गेले महिना दोन महिने मात्र तुम्हीं मत्सरग्रस्त झाल्यासारखे वागतां आहांत, आणि तुमच्या या वागणुकीचा मला नीट उलगडा होत नाहीं. ''

'' मी मत्सरग्रस्त नाहीं, लाडके, पण तूं इतकी तरुण, भावनाशील आहेस कीं जग तुझ्या वर्तनावर टीका करूं लागले याची मला भीति वाटते. ''

'' तुमची शंका ऐकून मला हंसूंच येतं ! तुमची स्वतःची वागणूक जितकी तपासून न पाहिली तितकीच बरी.–तुम्हीं स्वतः जीं तत्वं पाळत नाहीं त्यांबद्दल उपदेश न केलेलाच बरा. ''

'' तूं हंसूं नकोस. ही हंशावारी नेण्यासारखी बाब नाहीं. मी एका मित्राच्या, जिव्हाळयाच्या मित्राच्या नात्यानं तुला हें सर्व सांगत आहे. तूं जो शेरा आत्तां झाडला तो अतिशयोक्तिपूर्ण आहे. ''

'' मी म्हणतें मुळींच नाहीं. तुम्हीं जेव्हां मृणालिनीबद्दलच्या आपल्या वेडाची कबुली मला दिली तेव्हां मींही तुमचं अनुकरण करावं या गोष्टीला तुमची संमति आहे असं समजून चाललें. पण मीं तसं केलं नाहीं–''

'' माझं म्हणणं–''

'' मला अडवूं नका. मीं तसं केलं नाहीं. अजून माझा कुणींच प्रियकर झालेला नाहीं. मी शोधांत आहे, पण माझ्या आवडीनिवडींशीं जुळता असा कुणी मला अजून आढळला नाहीं.–तो फारच अप्रतिम असायला पाहिजे,–तुमच्याही पेक्षां चांगला.–हा तुमचा गौरव आहे, पण तुम्हीं त्याची किंमत करीत नाहीं असं वाटतं. ''

'' ह्या थट्टेचं प्रयोजन काय ? ''

'' मी थट्टा मुळींच करत नाहीं. अंतःकरणाचे खरे बोल बोलतें आहे. तुम्हीं एक वर्षापूर्वी माझ्याशीं बोललांत त्यांतला एक शब्ददेखील मी अजून विसरलें नाहीं. आणि तुम्हीं कांहींही म्हटलं किंवा केलं तरी माझी लहर लागतांच मी आपल्या प्रियकराशीं संबंध घडवून आणेन. मी हें करीन तेव्हां तुम्हांला त्याचा संशयसुद्धां येणार नाहीं. जसं इतर बऱ्याचशांना कळून येत नसतं तसं तुम्हांलाही कळून येणार नाहीं. ''

'' अशा गोष्टी तुला बोलवतात तरी कशा ? ''

" मला कशा बोलवतात ? हं:-शैलजाराणी जेव्हां भोळया बिचाऱ्या दासगुप्ताबद्दल थट्टा करूं लागलो तेव्हां सर्वांआधीं तुम्हांलाच जास्त गुदगुल्या होत होत्या."

" तें असेल, पण तूं बोलतेस हें तुला शोभून दिसत नाहीं."

" अग बाऽई ! ती थट्टा दासगुप्तांबद्दल होती म्हणून तुम्हांला आवडली, नाहीं ? आणि आतां स्वतःवर येऊन ठेपते आहे म्हणून ती शोभेनाशी झाली, काय ?- किती विक्षिप्त असतां हो तुम्हीं पुरुष !-पण मला असल्या गोष्टीसंबंधीं बोलणं आवडत नाहीं -मीं फक्त तुमची तयारी आहे कीं नाहीं हें जाणून घेण्याकरतां या गोष्टीचा उल्लेख केला."

" तयारी ?-कशाबद्दलची ?"

" विश्वासघात करून घेण्याची. जेव्हां माणूस अशा गोष्टी ऐकून रागावतो तेव्हां त्याची पूर्ण तयारी झालेली नसते. मी तर पैज लावून सांगतें कीं दोन महिन्यांनंतर एखाद्या फसविल्या गेलेल्या नवऱ्याची गोष्ट जर मीं तुम्हांला सांगितली तर तुम्हीं सर्वांआधीं हंसूं लागाल. जेव्हां आपण स्वतःच फसविले गेलेलों असतों तेव्हां बहुधा असंच होत असतं."

" बापरे ! तूं तर आज अगदींच अमर्यादपणा दाखवीत आहेस ! मीं तुला पूर्वी कधींच इतकं बेताल होतांना पाहिलं नाहीं."

" होय, माझ्यांत फरक पडला आहे.-वाईट झालं हें -पण यांत तुमचा दोष आहे."

" ऐक, लाडके, आपण शांतपणें बोलूं या. माझी इच्छा आहे, मी तुला विनंती करतों कीं, तूं रवीन्द्राला आज रात्रीं दिलंस तसं प्रोत्साहन देऊं नये."

" तुम्हीं मत्सरानं पछाडलांत. मला हें माहीत होतं."

" नाहीं, नाहीं. पण माझं हंसं व्हावं अशी माझी इच्छा नाहीं. आणि जर कां पुन्हां मीं त्या माणसाला आज रात्रीसारखं तुला आपल्या डोळयांनीं गिळून टाकतांना पाहिलं तर-तर-मी त्याची चामडीच लोळवीन !"

" तुमचं माझ्यावर प्रेम तर बसूं लागलं नाहीं ?"

" कां बसूं नये ? मी तुझ्याकरतां वाटेल तें करूं शकेन !"

" मी आपली आभारी आहे. पण मला तुमची कींव येते, कारण मी आतां तुमच्यावर प्रेम करीत नाहीं."

अक्षयकुमार बसल्या जागेवरून उठला, चहाच्या टेबलाला वळसा घालून आपल्या बायकोच्या पाठीशीं आला, आणि त्यानें पटकन् तिच्या मानेचें चुंबन घेतलें. ती ताड्दिशीं उठून उभी राहिली डोळे मोठे करून म्हणाली, " तुमचं इतकं धाडस होतं तरी कसं ? आपण एकमेकांचे कुणीच नाहीं हें विसरूं नका. आपण परके आहोंत. "

" रागवूं नकोस गडे ! मला राहवेना. तूं आज फारच अप्रतिम दिसतेस."

" मग माझ्यांत आश्चर्यकारक सुधारणा झाली असली पाहिजे ! "

" तूं लावण्यवती दिसतेस. तुझे बाहू, छाती, गुळगुळीत त्वचा-"

" रवीन्द्राला वेड लावील. "

" किती क्षुद्र आहेस ग तूं !-पण मीं उभ्या आयुष्यांत तुझ्याइतकी लोभस स्त्री पाहिल्याचं मला आठवत नाहीं. "

" तुम्हीं अलीकडे उपाशीं आहांत वाटतं ? "

" हें काय नवीन पिल्लूं आहे ? "

" मीं म्हटलं, तुम्हीं अलीकडे उपाशी राहातां आहांत असं दिसतं. "

" कां बरं ?-तुझ्या म्हणण्याचा अर्थ तरी काय ? "

" मीं जो बोलून दाखविला तोच. तुम्हीं कांहींकाळ उपाशीं राहिलां असाल आणि आतां भुकेनं व्याकुळ झालां आहांत. भुकेलेला मनुष्य इतर वेळीं खाणार नाहीं तें खायला तयार होतो.-मी तो लोटून दिलेला पदार्थ आहें, आणि तुम्हांला तो आज रात्रीं खायला हरकत वाटत नाहीं असं दिसतं. "

" जयश्री ! या असल्या गोष्टी बोलायला तुला कुणीं शिकविलं ? "

" तुम्हींच शिकविलंत, गुरुजी ! मला माहीत आहे त्याप्रमाणें तुमचीं आतांपर्यंत चार अंगवस्त्रं झालीं. मग तुम्हांला जो आज माझा पुळका आला आहे त्याचं कारण म्हणजे तुमचा दीर्घकालीन उपाशीपणा हाच नाहीं कां ? "

" तूं मला अमर्याद, पाशवी, वाटेल तें म्हण. पण मी तुझ्यावर दुसऱ्यांदा प्रेम करूं लागलों आहें. मी अगदीं तुझ्याकरतां वेडा झालों आहे ! "

" अस्सं, अस्सं ! मग तुमची इच्छा आहे म्हणतां—"

" अगदीं बरोबर. "

" आज ? "

" लाडके ! "

" बघितलंत ? तुम्ही पुन्हां वाहवलांत ! सूज्ञ पुरुषा, आपण शांतपणें बोलूं या. आपण परके आहोंत, नाहीं कां ? मी तुमची पत्नी आहे हें खरं, पण मी-स्वतंत्र आहें. मी आपल्या प्रेमाची सोय कुठंतरी दुसरीकडे करून पाहणार होतें, पण मी तुम्हांलाच ती सवलत देईन.-फक्त मला तेवढाच मोबदला मात्र मिळाला पाहिजे. "

" माझ्या लक्षांत नाहीं आली तुझी कल्पना ? "

" मी स्पष्ट बोलून दाखवतें.-मी तुमच्या रखेलीइतकी देखणी आहें कां ?"

" तिच्यापेक्षां शतपट. "

" तुमच्या चारीजणींपैकीं सर्वांत देखण्या बाईपेक्षांही ? "

" हो, हो, हजारपट देखणी. "

" तुमच्या राखेबद्दल तुम्हांला या तीन महिन्यांत किती खर्च करावा लागला ? "

" आतां-तूं म्हणतेस तरी काय ? "

" माझं म्हणणं असं कीं, तुमच्या बायांपैकीं जी तुम्हांला सर्वांत महाग पडली तिचं खाणं, गाडीभाडं, नाटकं-सिनेमा, कपडे, देणगीदाखल दागदागिने सर्वांकरतां तीन महिन्यांत तुम्हीं किती पैसा खर्च केला ? "

" हें मला काय माहीत ? "

" तुम्हांला माहीत असायला पाहिजे.-बरं, आपण असं समजून चलूं या कीं तुम्हीं दोनशें रुपये महिना खर्च केला.-ठीक आहे ना हें ? "

" हो, जवळपास इतकाच. "

" मग मालक, काढा दोनशें रुपये, आणि मी आज रात्रीपासून एक महिनाभर तुमची होऊन राहीन. "

" जयश्री, तुला वेड तर लागलं नाहीं ? "

" नाहीं हो, पण तुम्ही जसं म्हणाल तसं. बरं, येतें मी ! "

जयश्री आपल्या शयनगृहांत शिरली. तिची खोली अत्तराच्या वासानें दरवळत होती. अक्षय दारांत येऊन उभा राहिला. " किती सुवास येतो आहे इथं ? " तो म्हणाला.

" असं वाटतं तुम्हांला ? मी नेहमीं अगुरु वापरतें. दुसरं सेंट वापरत नाहीं. "

" खरं ? माझ्या लक्षांतच आलं नव्हतं हें-पण वास गोड आहे ! "




अक्षयनें तिच्या रोखानें एक पाऊल पुढें टाकलें.

[ पान १३० ]

" असेल कदाचित्.-पण आतां तुम्हीं जाल कां ? मला निजायचं आहे."

" जयश्री !"

" तुम्हीं जातां ना ?"

अक्षय खोलींत येऊन एका खुर्चीवर बसला.

जयश्री म्हणाली " तुम्ही नाहीं जात ना ? ठीक आहे."

तिने पदर खालीं टाकून आपला जंपर डोक्यांतून काढला. तिचे उघडे बाहू व अर्धवट उघडे पुष्ट स्तन त्याला दिसूं लागले. मग हात वर करून तिनें डोक्यांतले आंकडे काढायला सुरुवात केली.

अक्षयनें तिच्या रोखानें एक पाऊल पुढें टाकलें.

जयश्री म्हणाली, " माझ्याजवळ येऊं नका. नाहींतर मी खरंच रागावेन. ऐकलं ना ?"

त्यानें तिला आपल्या बाहुपाशांत कवटाळलें व तो तिचें चुंबन घेण्याचा प्रयत्न करूं लागला. टेबलावर ठेवलेला सुवासिक पाण्याचा पेला उचलून तिनें त्यांतलें पाणी त्याच्या तोंडावर भिरकाविलें.

तो संतापला. दोन पावलें मागें जात तो म्हणाला, " काय चावटपणा आहे हा ?"

" असेल कदाचित्. पण तुम्हांला माझी अट लक्षांत आहे ना ?-दोनशें रुपये !"

" भलतंच !"

" कां ?"

" कां ?-कारण नवरा कधीं बायकोला असे पैसे देत असतो कां ?"

" किती रानटी आहांत तुम्हीं ?"

" असेन. पण मी पुन्हां सांगतों कीं, नवऱ्यानं बायकोला पैसे देणं ही कल्पनाच अश्रुतपूर्व आहे, बेवकुफीची आहे !"

" आणि एखाद्या रांडेला पैसे देणं हें त्याहून वाईट नाहीं वाटतं ? बायको घरीं जिवंत असतां तसं करणं यासारखी दुसरी बेवकूफी नाहीं !"

" तसं असेल. पण मला बावळटपणा करायचा नाहीं."

जयश्रीदेवी पलंगाच्या कडेवर बसली व आपलें पातळ मांड्यांपर्यंत वर करून आपले लांब, रेशमी मोजे काढूं लागली. तिचे गोरेपान पाय व तांबूस पावलें त्याला दिसूं लागलीं.

अक्षयकुमार पुन्हां दोन पावलें पुढें सरसावला व काकुळतीनें म्हणाला, " तुझी कल्पना किती विक्षिप्त आहे, जया ? "

" कोणती कल्पना ? "

" मला दोनशें रुपये मागायची ! "

" विक्षिप्त ? त्यांत काय विक्षिप्त आहे ? आपण परकें नाहीं कां ? तुम्हीं म्हणतां तुमचं माझ्यावर प्रेम आहे. ठीक. तुम्हीं माझ्याशीं पुन्हां लग्न करूं शकत नाहीं, कारण मी तुमची पत्नी आहेंच मुळीं.–आतां तुम्हीं मला विकत घ्या ! माझं मोल, माझी भरपाई मला द्या !–तुम्हीं चार बायका खरेदी नाहीं कां केल्या ? मग एखाद्या नवख्या बाईला उधळपट्टी करण्याकरतां आपला पैसा देण्यापेक्षां तो मला देणं बरं नाहीं कां ? आतां चट्कन् कबूल करा पाहूं कीं स्वतःच्या बायकोला पैसा देणं ही खरोखरच एक अभिनव कल्पना आहे म्हणून ! तुमच्यासारख्या सूज्ञ मनुष्यानं अशा कल्पनेचं कौतुक करायला पाहिजे.–शिवाय जोंपर्यंत एखाद्या वस्तूकरतां माणसाला आपला पैसा ओतावा लागत नाहीं तोंपर्यंत तो त्या वस्तूवर प्रेम करीत नाहीं. तुमच्या बाहेरख्याली प्रेमाशीं तुलना करून पहायला तुम्हांला सांपडलं म्हणजे आपल्या वैवाहिक प्रेमाला नवीन खुमारी येईल. खरं आहे ना मी म्हणतें हें ? "

ती टेबलावरच्या घंटेकडे गेली. " आतां मात्र तुम्हीं जाणार नाहीं तर मी आपल्या दासीला बोलवीन ! "

अक्षयकुमार दिङ्मूढ होऊन उभा राहिला, नाराज झाल्यासारखा दिसला. आणि लगेच खिशांतून नोटांची एक घडी काढून जयश्रीदेवीच्या अंथरुणावर फेंकत म्हणाला, ' हे घे किती असतील ते, पण चेटकिणी, लक्षांत ठेव–"

जयश्रीनें नोटा उचलल्या आणि दोनशेंच्या आपल्या उशीखालीं ठेऊन बाकीच्या त्याला परत करीत विचारलें, " काय ? "

"–याची संवय लावून घेऊं नकोस. "

ती मोकळेपणानें हंसली, आणि आपल्या पातळाची गांठ सोडत म्हणाली, " दर महिन्याचे दोनशें द्यायचे, नाहींतर तुम्हांला तुमच्या अंगवस्त्राकडे परत जावं लागेल. आणि तुम्हांला जर मी आवडूं लागलें तर, मी-आपला भाव वाढवीन ! "

---

# खाजगी नोकर-

निरनिराळ्या पलटणींची व वेगवेगळ्या हुद्द्यांची अधिकारी मंडळी आपले खाकी, लाल, निळे, पिवळे, पांढरे कपडे व टोप्या घालून थडग्यांच्या मधूनमधून फिरत होती त्यामुळें ते कबरस्थान एखाद्या रंगीबेरंगी फुलांच्या शेता-सारखे दिसत होतें.

कर्नल लिमूसीनच्या पत्नीला नुकतीच मूठमाती देण्यांत आली होती. ती दोन दिवसांपूर्वी आंघोळीच्या टबांत बुडून मेलेली आढळली होती. शवपेटी खड्ड्यांत उतरविलेली असून पाद्रीलोक परत निघून गेले होते, पण कर्नल लिमूसीन आपल्या दोघां सहकाऱ्यांच्या खांद्यावर हात ठेऊन त्या पेटीकडे विमनस्कपणे पहात कबरेच्या कांठाशीं उभा होता. त्या किंमती लांकडाच्या पेटींतील आतां कुजत आलेल्या आपल्या तरुण पत्नीबद्दलच्या आठवणी त्याच्या मनांत येऊन राहिल्या होत्या.

कर्नल जवळजवळ म्हाताराच झाला होता. तो उंच, किडकिडीत असून त्यानें राखलेली मिशी पांढरी शुभ्र झाली होती. तीन वर्षांपूर्वी कर्नल सॉर्टिस नांवाच्या आपल्या सहकाऱ्याच्या तरुण पोरक्या मुलीशीं त्यानें लग्न केलें होतें. कर्नलच्या डावी-उजवीकडे उभ्या असलेल्या कॅप्टन आणि लेफ्टनंटानें त्याला मागें परत नेण्याचा प्रयत्न केला, पण कर्नलचे डोळे अश्रूंनीं डबडबून आले होते तो आटो-काट प्रयत्न करून आंसवें ओघळूं न देतां पुटपुटला, " नाहीं, थोडे आणखीं थांबा! " त्याचे पाय लटपटूं लागले होते तरी तो आपले हृदय, जीवित, प्रेमाचें निधान हें सर्वकांही ज्या खड्ड्यांत पडलें होतें त्या खड्ड्याच्या कांठावर उभा होता.

एकाएकीं मागून जनरल ऑरमाँट त्याच्या रोखानें आला, त्यानें त्याचा दंड धरला, आणि त्याला बळेंच मागें ओढत तो म्हणाला, " चला कर्नल, आतां किती वेळ थांबायचें इथें ? "

कर्नलनें जनरलचें म्हणणें ऐकलें आणि तो इतर अधिकाऱ्यांसह आपल्या बंगल्याकडे परतला. आपल्या ऑफिसचें दार उघडतांच त्याला टेबलावर एक पत्र ठेवलेलें दिसलें. तें हातांत घेतांच आश्चर्य वाटून आणि भावना उचंबळून आल्या-मुळें त्याला धक्का बसल्यासारखेंच वाटलें, कारण तो पत्ता त्याच्या बायकोच्या

हस्ताक्षरांत लिहिलेला त्याला आढळला. पत्रावर पोस्टाचा शिक्का देखील त्याच दिवशींचा होता. त्यानें पत्र फोडलें आणि तो वाचूं लागला.

" प्रिय बाबा,

" मी तुम्हांला लहानपणीं हांक मारीत असे त्या माझ्या आवडत्या नांवानेंच तुम्हांला आज संबोधण्याची परवानगी मला द्या. तुमच्या हातीं हें पत्र पडेल तेव्हां मी मेलेली असून मला मूठमातीही देण्यांत आलेली असेल. म्हणून तुम्हीं क्षमा कराल अशी मला आशा वाटते.

" जसें तुम्हीं माझी कींव करूं नये असें मला वाटतें तसेंच मी देखील आपल्या पापावर पांघरूण घालूं इच्छीत नाहीं एका तासानें आत्महत्त्या करणारी बाई जितक्या प्रामाणिकपणें सांगूं शकेल तितक्या उघडपणें मी आपली खरीखुरी हकीकत तुम्हांला कळविणार आहे.

" तुम्हीं आपल्या मनाचा थोरपणा दाखवून माझ्याशीं लग्न केलें तेव्हां तुमच्या उपकाराचें ओझें स्मरून मीही तुमची झालें, आणि पोरकट अंतःकरणानें तुमच्यावर प्रेम करूं लागलें. मी आपल्या वडिलावर करीत होतें तसेंच प्रेम तुमच्यावरही करूं लागलें,-जवळपास तसेंच,-आणि एके दिवशीं तुमच्या मांडीवर बसलें असतांना तुम्हीं माझे मुके घेत असतां मी नकळत तुम्हांला ' बाबा ' म्हणून हांक देखील मारली. ती हांक माझ्या अंतःकरणापासून, यदृच्छया आणि स्वाभाविकपणें मारलेली अशी होती. खरोखर म्हणजे तुम्हीं मला वडीलधाऱ्यासारखेच वाटत होतां, प्रत्यक्ष बाबांसारखेच. तुम्हीं हंसलात आणि उद्गारलात, ' बरं, तूं मला " बाबा " म्हणूनच हांक मारीत जा, बाळ; मला बरं वाटतं ! '

" आपण शहरांत बदलून आलों आणि,-मला क्षमा करा, बाबा,-मी प्रेमांत सांपडलें. मीं स्वतःला पुष्कळ आवरून ठेवलें, जवळजवळ दोन वर्षें आटोकाट प्रयत्न करून पाहिला,-पण शेवटीं मी वाहवलें, मीं पापाचरण केलें, मी निमकहराम झालें !

" आणि कुणाकरितां ? तुम्हांला तो कोण आहे हें कळणार नाहीं. मला त्याबद्दल विशेष काळजी वाटत नाहीं, कारण तुम्ही थट्टेनें ज्याना बारा ग्रह म्हणायचे असे बारा निरनिराळे लष्करी अधिकारी नेहमीं माझ्याभोवतीं किंवा आसपास घुटमळतच रहात असत.

" बाबा, तो कोण याचा पत्ता काढण्याचा प्रयत्नही करूं नका, आणि त्याची घृणाही वाटूं देऊं नका. त्याच्याजागीं कुणीही मनुष्य असता तरी त्यानें हेंच केलें असतें; शिवाय माझी खात्री आहे कीं तो माझ्यावर जिवाभावानें प्रेम करीत होता.

" पण थांबा ! एके दिवशीं नेहमींप्रमाणें आम्हीं आपल्या बंगल्याकांठच्या नदींतल्या त्या बेटावर भेटण्याचें ठरविलें. त्यानें माझी वाट पहात झाडींत बसून रहायचें आणि मीं पोहत जाऊन त्याला भेटायचें असा आमचा संकेत ठरलेला असे. नंतर त्याला कुणीं पाहूं—ओळखूं नये म्हणून रात्र होईपर्यंत तो तिथेंच वेळ घालवी, आणि मी मात्र संध्याकाळच्या सुमारास परत येऊन जाई

" आमची गांठ पडतांच आम्हीं एकमेकांना मिठी मारली इतक्यांत शेजारच्या झाडींतून फांद्या बाजूला करीत बाहेर येत असलेला तुमचा खाजगी नोकर फिलिप् आम्हांला दिसला आपली कंबख्ती आली या भीतीनें मीं किंकाळी फोडली, पण माझा प्रियकर मला म्हणाला, ' तूं मुकाट्यानें पोहत परत जा, लाडके मी या माणसाचा तजवीज करतों. '

" मी परत येत असतांना इतकी भेदरली होतें कीं मीं एकदोन गटांगळ्याही खाल्ल्या, आणि आपल्यासमोर काय ताट वाढून ठेवलें आहे हें न कळून भीतभीतच तुमच्यासमोर आलें.

" एका तासानंतर बाहेरच्या खोलींत मला फिलिप् दिसला तेव्हां तो कुजबुजला, ' बाईसाहेबांनीं पत्रं वगैरे पाठविण्यासंबंधीं मला हवा तो हुकूम करीत जावा, ताबेदार सेवेला हजर राहील. ' तेव्हां मला कळून आलें कीं फिलिपनें स्वतःला विकून घेतलें होतें आणि माझ्या प्रियकरानें त्याला खरेदी करून घेतलें होतें.

' मी त्याला कांहीं पत्रें दिलीं, नंतर तो माझीं सर्वच पत्रें घेऊन जाऊं लागला. [illegible] मला त्याचीं उत्तरें आणून देऊं लागला.

हे दोन तीन महिने चाललें. जसा तुमचा त्याच्यावर विश्वास होता तसा [illegible] त्याच्यावर विश्वास जडूं लागला.

[illegible] बाबा, पुढें जें काय घडलें तें असें :

एके दिवशीं मी पोहून त्या बेटावर गेलें तेव्हां तेथें माझ्या प्रियकराऐवजीं मला [illegible] तो माझी वाटच पहात होता, आणि त्यानें मला [illegible], [illegible] जर त्याच्या इच्छेला बळी न पडलें तर तो आमचा सर्व [illegible] होणार आणि चोरून ठेवलेलीं आमचीं कांहीं पत्रेंही पण तुम[illegible] !

" बाबा, बाबा, माझा भीतीनें थरकांप उडाला. ती दुबळ्या मनाची भीति होती, मला—एका लष्करी अधिकाऱ्याच्या मुलीला आणि पत्नीला,—शोभून न दिसणारी भीति होती, पण विशेषतः मला तुमची भीति होती. तुम्ही मला किती चांगल्या प्रकारें वागवीत होतां, आणि मीं तुम्हांला दगा दिला होता !—मला त्याच्या, आपल्या प्रियकराबद्दलही भीति वाटली; तुम्ही त्याला ठार केल्याशिवाय राहिलां नसतां.—आणि मला स्वतःबद्दलही भीति वाटली. माझे मनोविकार मला स्पष्ट करून लिहितां येत नाहींत; मी वेडी झालें, वाटेल तें करायचा हिय्या केला, आणि पुन्हां एकदां या चांडाळाला विकत घ्यावयाचें ठरविलें. तो माझ्यावर प्रेम करीत होता म्हणे!—पण एकंदर प्रकार किळसवाणाच होता.

" आम्ही स्त्रिया इतक्या दुबळ्या असतां, तुम्हां पुरुषांपेक्षां आमचीं माथीं लवकर फिरतात. आणि मग एखादी स्त्री एकदां कां पापपंकात उतरली कीं ती आणखींच खोलखोल रुतत जाते. मला आपण काय करतों आहोंत याची जाणीव होती कां? मला वाटलें तुम्हां दोघांपैकीं एक आणि मी आतां मरणार,—आणि मीं स्वतःला या कसाबाच्या स्वाधीन केलें.

" बाबा, मी स्वतःची तरफदारी करते आहे असें समजूं नका. नंतर ज्या परिस्थितीचा मीं अगोदरच विचार करावयाला पाहिजे होता ती घडून आली. फिलिप् माझ्या दुबळेपणाचा लागोपाठ फायदा घेण्याचा प्रयत्न करूं लागला. आतां तो देखील माझ्या पहिल्या प्रियकरासारखा माझा दुसरा प्रियकर होऊन राहिला आहे.—हा प्रकार किती चीड आणणारा होता!—आणि याचें प्रायश्चित्त ?

" माझी शक्य होती तेवढी अधोगति होऊन चुकली आहे. मीं आतां मरायलाच पाहिजे. मी जिवंत असतांना हा सर्व कबुलीजबाब तुम्हांला देऊं शकत नव्हतें. आतां मेल्यानंतर मला कसली भीति आहे ? मला मरणाशिवाय दुसरी गतीच नव्हती, माझ्या पापाचें क्षालन त्याशिवाय इतर कशानेंही झालें नसतें. मला प्रेम करतां येईना कीं करवून घेतां येईना. माझ्या फक्त हाताचा जरी स्पर्श झाला तरी मनुष्य बाटेल असें मला वाटूं लागलें.

" मी आतां आंग धुवायला जात आहें, पण तिथून परत मात्र येणार नाहीं. मीं तुमच्याकरितां लिहिलेलें हें पत्र माझ्या प्रियकराकडे अगोदर जाईल. मी मेल्यानंतर हें त्याला पोहोंचेल, आणि माझ्या अखेरच्या इच्छेनुसार कुणाला

न कळत तो हें तुमच्याकडे पाठवील. तुम्ही कबरस्थानांतून परत आल्यानंतर तुम्हांला तें वाचायला मिळेल.

"बाबा, संपलें. मला आणखी कांहीं सांगावयाचें नाहीं. तुम्हीं जें काय करावयाचें तें करा आणि मला क्षमा करा."

कर्नलच्या कपाळावर धर्मबिंदु चमकूं लागले होते ते त्यानें रुमालानें पुसले. त्याच्या स्वभावांतला धीरगंभीर शांतपणा, रणमैदानावर ज्या धिमेपणानें त्यानें लढाया जिंकल्या होत्या तो धीटपणा, त्याच्या मदतीला धांवून आला. त्यानें टेबलावरील घंटा वाजविली.

एक हुजऱ्या येऊन त्याच्यासमोर उभा राहिला. "फिलिपला पाठवून दे," कर्नलनें फर्माविलें. त्यानें आपल्या टेबलाचा खण उघडला.

लगेच फिलिप् आंत येऊन अदबीनें उभा राहिला. अकडबाज मिशांचा, क्रूर दृष्टीचा आणि चलाख स्वभावाचा होता हा कर्नलचा खाजगी नोकर.

कर्नलनें नजर भिडवून त्याच्याकडे पाहिलें.

"माझ्या बायकोच्या प्रियकराचं नांव मला सांग !" तो म्हणाला.

"पण, हुजूर—"

कर्नलनें अर्धवट उघड्या खणांतून आपलें पिस्तूल बाहेर काढलें.

"लौकर सांग ! मला फालतूपणा खपत नसतो !"

"मग, साहेब, त्यांचं नांव–कॅप्टन आल्बर्ट–"

त्याच्या तोंडून तें नांव बाहेर पडलें असेल नसेल तोंच पिस्तुलाचा बार झाला आणि कपाळाच्या मधोमध शिरलेल्या गोळीनें गतःप्राण होऊन नोकर खालीं पालथा पडला.

---

# पकडलें !–

मुंबईत राहणाऱ्या सुखवस्तु श्रीमंत जहागिरदारांपैकीं एकाची बायको एकटीच माथेरानला दोन महिने घालविण्याकरितां गेली होती.

ती आपल्या नवऱ्याशिवाय बाहेरगांवीं रहात होती यांत नवल असें कांहींच नव्हतें, कारण या लक्ष्मीपुत्रांचीं ऐश्वर्य व कुळशील यांवर विसंबून होतात तसें

तिचेंही लग्न झालें होतें, आणि लग्नानंतरचे जे काय थोडे महिने एकमेकांना एक-मेकांची ओढ होती ती विशेष दृढ होऊं पावली नाहीं. कारण पतीच्या व त्याच्या कुटुंबाच्या इच्छेनुसार नवऱ्याला संततिसुखाचें व जहागिरीला वारसाचें दान दिल्या-नंतर ते पतिपत्नी आपापल्या वाटेला लागले. तरुण, देखणा जहागिरदार आपला क्लब, रेसेस्, थिएटरें यांच्याकडे वळला आणि नखरेल, जवान जहागिरदारीण सिनेमा-नाटकें, हिंवाळयांत पुणें, उन्हाळयांत माथेरान-महाबळेश्वर यांच्या मार्गानें झुकली.

या खेपेला तिनें माथेरानहून आपल्याबरोबर एक सुरेख, उच्चकुलीन मराठा पट्ठा आणला असून आपल्या प्रियकराचे सर्व हक्क त्याला बहाल केले होते, आणि तो तिच्या दासासारखा तिच्या सेवेला हजर असे.

या विलासलोलुप धनवानांच्या संवयीप्रमाणें जहागिरदारीणबाईनें शहरा-बाहेर एका उपनगरांत एक छोटीशी बंगली भाड्यानें घेतली होती, ती आपल्या आवडीप्रमाणें सजविली होती, आणि तिथें ती आपल्या प्रियकराला भेटत असे. ती वेगवेगळे वेष परिधान करून तिथें रात्री-अपरात्रीं जायची. पण शेवटीं हिंवा-ळ्याचा रोजरोज घराबाहेर जावयाचा तिला कंटाळा येऊं लागला. तिला ही दग-दग नकोशी झाल्यामुळें आपल्या घरांतच आरामशीरपणें आपल्या प्रियकराला बोल-वीत जाण्याचें तिच्या मनानें घेतलें. पण हें जमणार कसें?

तशा प्रकारची व्यवस्था करणें फार जड होतें अशांतली गोष्ट नव्हती. स्त्रीनें आपल्या मनाशीं एखाद्या गोष्टीबद्दल ठाम निश्चय केला आणि ती घडून आली नाहीं असें क्वचितच होतें! एकदोन दिवस विचार करून ती आपल्या शहराबाहे-रच्या बंगलींत गेली ती आपला बेत ठरवूनच.

तो मराठा तरुण क्वचितच आढळतात अशा सुंदर पुरुषांपैकीं होता. त्याची चेहेरेपट्टी नाजुकपणांत आणि रेखीवपणांत जरा बायकी होती, तो मध्यम उंचीचा, सडपातळ पण भरदार अवयवांचा असून, जर केंसांचा टोप घातला तर सहज बायकांत लपून गेला असता. त्याला मिसरूड सुद्धां नुकतीच फुटूं लागली होती. चतुर जहागिरदारीणबाईनें आपल्या प्रियकराला सूचना केली कीं, त्याला जर स्त्रियांचे कपडे वापरण्यास हरकत नसली तर त्यानें स्त्रीवेषांत तिच्या वाड्यांत येऊन तिला भेटणें जास्त सोइस्कर होईल. हिंवाळा असल्यामुळें एकदोन आवरणें जास्त घ्यावीं म्हणजे एकंदर वेष बेमालूम साधणार.

ठरल्याप्रमाणें तिनें आपल्या प्रियकराकरितां सुरेखसुरेख उंची कपडे खरेदी केले, आणि कांहीं दिवसांनंतर आपल्या नवऱ्याच्या कानांवर घालून ठेवलें कीं, आपली माथेरानला ओळख झालेली एक मैत्रीण मुंबईला हिंवाळा घालविण्याकरितां आलेली असल्यामुळें मधून मधून आपणाकडे येत जाणार. जहागिरदारानें ही सूचना ऐकून न ऐकल्यासारखें केलें, कारण आपल्या बायकोच्या मैत्रिणींच्या वाटीं न जाणें हें त्याचें एक तत्व होतें. तो नेहमींप्रमाणें संध्याकाळीं आपल्या क्लबांत निघून गेला, आणि या मराठा बाईबद्दलची गोष्ट विसरला देखील.

जहागिरदार घराबाहेर गेल्यानंतर अर्ध्यातासानें एक मोटार आली, आंतून झक्पक्, गुबगुबीत लोंकरी कपडे घातलेली एक बाई उतरली, वरच्या मजल्यावर चढून गेली आणि जहागिरदारीणबाईच्या रंगमहालांत तिचें पुरुषांत रूपांतर झालें.

त्या मराठा तरुणाला या बायकी वेषाचा इतका लवकर सराव झाला कीं, तो भररस्त्यावरून बिनधोकपणें जाऊं-येऊं लागला. हळूंहळूं विलासी लक्ष्मीपुत्रांच्या नजरा त्याच्याकडे वळूं लागल्या, आणि तो त्यांना झुलवूं लागला. नखरेल स्त्रियांना लंपट पुरुषाचा छळ करतांना जो आनंद वाटत असतो त्याचा अनुभव त्याला येऊं लागला.

तो मराठा युवक आतां धीट होऊं लागला होता, आणि एके दिवशीं विशेष काळजीपूर्वक आकर्षक स्त्रीवेष पेहेरून नाटकाला गेला. त्यानें स्वतःकरितां बॉक्स रिझर्व केला.

त्याच्या समोरच्या बॉक्समध्यें बसलेल्या एका तरुण मनुष्यानें अधाशीपणें त्याच्या सौंदर्याचें पान चालविलें होतें, आणि हा मराठाही मुरके मारून, हंसून, आणि नाहीं नाहीं त्या चेष्टा करून त्याला वेड लावीत होता. तिसऱ्या अंकाच्या शेवटीं द्वाररक्षकानें या मराठा तरुणाला एक फुलांचा गुच्छ आणून दिला. त्यांत एक चिठ्ठी होतीः ' तूं जगांतली अत्यंत सुंदर तरुणी आहेस. तुझी भेट घेण्याची माझी इच्छा पुरविशील काय ? '

त्या मराठ्यानें खालचें नांव वांचलें, तो स्वतःशींच हंसला आणि आपल्या बॅगमधून ' ऊर्वशी ' नांव छापलेलें एक कार्ड काढून त्या नांवाखालीं ' नाटक संपल्यावर ' असे शब्द लिहून तें कार्ड त्यानें त्या प्रणयदूताला,-द्वाररक्षकाला,- परत दिलें.

ही खोटी ऊर्वशी आपल्या भाड्याच्या मोटारीपाशीं आंत बसावयाला पोहोंचली तों तिचा प्रियकर दार उघडण्याकरितां पुढें झाला आणि मराठा आंत

बसल्यावर स्वतःही आंत बसला. त्यांच्या रस्त्यानें बऱ्याच कानगोष्टी झाल्या, पण ' ऊर्वशी ' नें त्याला जास्त लगट करूं दिली नाहीं. ती दर बुधवारीं-शनिवारीं नाटकाला येऊं लागली व तो तिच्यावर प्रेमपत्रिकांचा पाऊस पाडूं लागला, आणि रोज तिला मोटारींतून तिच्या शहराबाहेरच्या बंगलींत पोहोंचवून देऊं लागला.

इतर लक्ष्मीपुत्र त्याच्या नशीबाचा हेवा करूं लागले, पण इतक्यांत एक अकल्पित घटना घडली आणि तिच्याशीं ज्यांचाज्यांचा संबंध आला ते सर्वच आश्चर्यचकित झाले.

एके दिवशीं जहागिरदाराला आपली बायको आणि तिचा मराठा प्रियकर एकांतांत आढळले. लपवालपवी व सारवासारव करण्यासारखी परिस्थिती नव्हती. पण तो मत्सरामुळें चिडून जाऊन शेजारच्या कपाटांतला खंजीर काढणार, आणि भीतीनें गर्भगळित झालेली जहागिरदारीण शेजारच्या कोंचावर पडलेली असतांना तिला मूर्च्छा येणार इतक्यांत मराठा युवकानें आपला केंसांचा टोप झट्दिशीं चढविला व पातळ गुंढाळलें.

" हें आहे तरी काय ? " जहागिरदार विस्मित होऊन उद्गारला, " ऊर्वशी ! तूं ? "

" होय गडे, मीच, " तो बोलला. " तुमच्या बायकोला कांहीं प्रेमपत्रं दाखविण्याकरतां मी इथं आलें आहे. हीं पत्रं कुणीं– "

" नाहीं, नाहीं, " नवरा या दृष्टीनें जरी स्वतःची संभावना झाली होती तरी ' ऊर्वशी ' चा प्रियकर या दृष्टीनें आपला अपराध लक्षांत येतांच जहागिरदार गयावया करूं लागला, " नको, तसं करण्याची कांहीं जरूर नाहीं. " त्यानें कट्यार परत ठेऊन दिली.

" ठीक आहे, मग आपला तह झाला असं समजायला हरकत नाहीं, " मराठा तरुण शांतपणें बोलला. " पण माझ्याजवळ काय पुरावा आहे हे विसरूं नका बरं ! मी त्यांचा वाटेल तेव्हां उपयोग करूं शकेन. "

दोघांनीं एकमेकांकडे पाहून समजूत पटली अशा अर्थानें माना तुकविल्या.

त्यानंतर त्या बंगल्यांत सलोख्याचें साम्राज्य सुरू झालें. मराठा तरुणाच्या स्त्रीवेषाचा जहागिरदारीणबाईला कंटाळा आला म्हणून कीं काय तो आतां उघडपणें बंगल्यांत येऊं-जाऊं लागला, व त्या संस्मरणीय प्रसंगीं खोट्या ऊर्वशीला बंगल्याबाहेर पोहोंचविणारा जहागिरदार आतां बरेचदां खऱ्या ऊर्वशीच्या सहवासांत दिसत असतो.

---

# सूड–

पाओलो सॅव्हेरिनीची म्हातारी विधवा बायको आपल्या एकुलत्याएका मुलाबरोबर भूमध्यसमुद्रांतील कॉर्सिका बेटांतल्या बोनिफॅशिओ शहराच्या शिवेवरील आपल्या स्वतःच्या घरांत रहात असे. हें शहर समुद्रकांठच्या उंच उंच कड्यांवर वसलेलें असल्यामुळे तिथून खालीं लांबवर पाहिलें असतां सार्डीनिया बेटाचा किनारा दिसून पडतो. त्या किनाऱ्यावर एका जागीं जो एक ठसठशीत पांढरा ठिपका दिसतो तें त्या बेटावरचें लॉंगोसार्डो हें शहर होय. दोन्ही बेटांच्यामध्यें सामुद्रधुनी असून मच्छीमार बोटी दिवसभर इकडून तिकडे ये–जा करीत राहतात. म्हातारीच्या खोपटाच्या तिन्हीं खिडक्यांतून लॉंगोसार्डो शहर दिसत असे.

म्हातारी, तिचा मुलगा ॲंटॉइन् व त्यांची कुत्री सेमिलांट असे तिघे प्राणी त्या घरांत आपलें आयुष्य सुखांत घालवीत होते. सेमिलांट लांबलचक असून तिचे केस मोठाले आणि रांठ होते, व ती गुराख्यांच्या उपयोगी पडणाऱ्या जातीची होती. ॲंटॉइन् तिचा शिकारीच्या कामासाठीं उपयोग करीत असे.

एके दिवशीं संध्याकाळीं भांडण जुंपल्यामुळें निकोलस् रॅव्होलॅटी नांवाच्या मनुष्यानें दगलबाजी करून ॲंटॉइनचा सुरी मारून खून केला व तो रातोरात सार्डीनिया बेटावर पळून गेला.

जेव्हां कांहीं येणाराजाणारांनीं म्हातारीच्या मुलाचें प्रेत तिच्या खोपटांत आणून टाकलें तेव्हां तें पाहून ती रडली नाहीं, पण बराच वेळ कांहीं हालचाल न करतां आपल्या मुलाकडे टक लावून पहात राहिली. मग तिनें आपला सुरकुतलेला हात त्याच्या शरीरावर ठेवला व या खुनाचा सूड उगविण्याबद्दल शपथ घेतली. तिला आपल्याजवळ कोणी नको होतें; तिनें आपल्या कुत्रीला घरांत घेऊन दार लावून घेतलें.

कुत्री अभद्र सूर काढून भुंकूं लागली. ती प्रेताकडे पहात मागच्या पायांत शेंपूट दाबून पलंगाच्या पायथ्याशीं बसून आपल्या मालकाकडे मान लांब करून मधून मधून ओरडत होती. म्हातारी आपल्या अपत्याच्या प्रेतावर वांकून स्तब्धपणें डोळ्यांतून मोठमोठीं आसवें गाळत होती; कुत्रीही हालचाल न करतां स्तब्ध बसून होती.

उताणा निजलेला, अंगावर सर्व कपडे असून छातीपाशीं ते फाटून रक्तानें माखलेला, तो तरुण मनुष्य झोंपीं गेल्यासारखा दिसत होता. तो अक्षरशः रक्तानें माखलेला होता; त्याच्या शर्टवर, जाकिटावर, पँटवर, चेहेऱ्यावर आणि हातांवर रक्ताचे डाग दिसत होते. त्याच्या डोक्याच्या केंसांतदेखील रक्त थिजून ते जागोजागीं वळले होते.

म्हातारी प्रेताला उद्देशून बोलूं लागली. तिचा शब्द ऐकतांच कुत्रीनें ओरडणें थांबविलें.

" मीं तुला सांगितलं ना, बेटा, " ती म्हणाली, " माझ्या छबकड्या, मी तुझ्या खुनाचा सूड घेतल्याशिवाय रहायची नाहीं असं मी वचन देतें. नीज, लाडक्या, तूं स्वस्थ नीज; मी जें बोललें ते करून दाखवीन, ऐकलंस ना ? आपल्या आईवर नेहमीं ठेवीत होतास तसा विश्वास असूं दे. "

ती हळूंच आणखीं खाली वांकली व तिनें आपल्या मुलाच्या गारठलेल्या ओठांचें शांतपणें चुंबन घेतलें. सेमिलांट पुन्हां ओरडूं लागली. या वेळचें तिचें ओरडणें विशेषच भयानक होतें.

सकाळपर्यंत तें प्रेत, ती स्त्री आणि ते जनावर तसेच जेथल्यातेथें बसून होते.

अँटॉइनचा दफनविधि दुसरे दिवशीं सकाळीं पार पडला. थोड्या दिवसांनंतर बोनिफॅशिओ गांवांतील लोक त्याला विसरले.

त्याच्यामागें त्याचा भाऊ वगैरे कोणीच नातेवाईक नव्हतें. सूड घेण्याकरितां माणसांपैकीं कोणीच नसल्यामुळें त्याच्या आईला, एका म्हातारीलाच, त्या संबंधीं विचार करणें भाग होतें.

ती रोज सकाळीं आणि संध्याकाळीं आपल्या खोपटाच्या खिडकींतून सार्डीनिया बेटावरच्या त्या पांढऱ्या ठिपक्याकडे,-लाँगोसार्डो गांवाकडे,-पहात असे. कॉर्सिका बेटांतले दरोडेखोर पळून जाऊन या बेटांत रहात असत. या शहराची वस्ती बहुतांशीं अशाच खुनशी आणि खुनी माणसांची होती. ते आपल्या जन्मभूमीच्या बेटावरून पळून, सामुद्रधुनी पार करून या परक्या बेटावर येत, कांहीं काळ येथें घालवीत, व पुन्हां आपल्या बेटावर भांडण-तंटे, मारामाऱ्या, खून- चोऱ्या करायला जात. निकोलस् रॅव्होलॅटी याच गांवांत दबा धरून बसला होता हें म्हातारीला माहीत होतें.

सबंध दिवसभर एकटीच, आपल्या खिडकीशीं बसून ती त्या ठिपक्याकडे पाही आणि सूडाचा विचार करीत राही. तिचें आयुष्य भरत आलें असतां आणि ती शक्तिहीन असल्यामुळें कोणाच्या तरी मदतीशिवाय ती आपलें वचन कसें पाळूं शकणार ? तिला आपल्या मेलेल्या मुलाला दिलेलें वचन विसरतां येईना. वेळही फार थोडा होता. हें घडवून आणायचें कसें ? तिला रात्रीं झोंप येईना, दिवसभर तिच्या जिवाची तळमळ चाले, कशांत लक्ष लागेना, ती सारखी एखाद्या युक्तीचा शोध करीत राही. कुत्री तिच्या पायाशीं पडून रहात असे, आणि कधींकधीं लांबवर पाहिल्यासारखें करून भेसूरपणें ओरडत असे. तिचा मालक जग सोडून गेल्यानंतर ती मधून मधून अशीच सूर काढायची, जणूं काय ती त्याला हांक मारी, तिच्या असंतुष्ट आत्म्यानें त्याची आठवण नेहमींकरतां सांठवून ठेवली असल्याचा भास होई.

एके रात्रीं सेमिलांट अशीच ओरडत असतां म्हातारीच्या मनांत एकदम एक रानटी आणि क्रूर अशी सूडाची कल्पना चमकली. तिनें सकाळपर्यंत सर्व प्रकारचा साधकबाधक विचार करून आपल्या मनाचा धडा केला, व पहांटे उठतांच ती अगोदर प्रार्थनामंदिरांत गेली. ती नम्रपणें देवासमोर पालथी पडली व आपल्या मुलाच्या मृत्यूचा सूड उगविण्याकरितां देवाच्या मदतीची आणि स्वतःच्या अपंग, खंगलेल्या शरीरांत पुरेशी शक्ति देण्याची, तिनें करुणा भाकली.

नंतर ती घरीं परतली. तिच्या अंगणांत झांकण काढून टाकलेलें एक जुनें, रिकामें पीप होतें, तें तिनें लवंडून, दगडाच्या आधारानें, हालणार नाहीं असें जमीनींत पुरल्यासारखें केलें, व सेमिलांटला या घरांत सांखळीनें बांधून ती स्वतःच्या घरांत गेली.

प्रत्येक खिडकींतून सार्डीनियाच्या समुद्रकिनाऱ्याकडे पहात ती खोलींत सारख्या येरझारा करूं लागली. तिच्या मुलाचा मारेकरी त्या पांढऱ्या ठिपक्यांतच राहत असे, नाहीं ?

कुत्री दिवसभर आणि रात्रभर ओरडत होती. सकाळीं म्हातारीनें तिला एका टिनपाटांत थोडे पाणी प्यायला नेऊन दिलें. पण दूध, रोटी वगैरे कांहीं दिलें नाहीं.

तो दिवस मावळला. सेमिलांट भुकेनें ग्लानि येऊन झोंपी गेली. दुसरे दिवशीं तिचे डोळे संतापानें चमकूं लागले व केंस ताठ उभे राहिले. ती आपली सांखळी हताशपणें जोरजोरानें ओढूं लागली.

तरीही म्हातारीनें तिला कांहींच खायला दिलें नाहीं. कुत्री संतापानें चिडून गेल्यासारखी पुनःपुन्हां भुंकूं-ओरडूं लागली. तिसरे दिवशीं पहांटे म्हातारी आपल्या शेजाऱ्याकडे जाऊन दोन गवताचे गठ्ठे मागून घेऊन आली. तिचा नवरा घालत असलेले जुने कपडे बाहेर काढून तिनें त्यांच्या पोकळींत तें गवत भरून, सेमिलांटच्या पिपासमोर एक खांब गाडून त्याला तें बागुलबोवाचें धड बांधून उभें केलें. मग तिनें जुन्या फाटक्या चिंध्या एका पांढऱ्या कापडांत बांधून बागुलबोवाकरितां एक डोकें तयार केलें, व कोळशानें त्याच्यावर नाक, डोळे, कान, मिशा व केंस चितारून तें धडाला लावलें.

भुकेनें व्याकुळ झालेली कुत्री कांहीं वेळ त्या गवती माणसाकडे पाहून आश्चर्यानें स्तब्ध झाली.

नंतर म्हातारी गांवांत खाटकाकडे जाऊन एक मांसाचा तुकडा घेऊन आली, तिनें आंगणांत काटक्या गोळा करून विस्तव पेटविला व त्यावर तें शिजविलें. सेमिलांटच्या नाकांत त्या मांसाचा दर्प शिरूं लागला तसतशी ती उतावीळ होऊन ओरडून ओरडून सांखळीला हिसके देऊं लागली. ती आपले प्राण डोळयांत आणून त्या तुकड्याकडे पहात होती.

तो तुकडा अर्धवट शिजल्यानंतर म्हातारीनें त्या बागुलबोवाच्या गळया-भोंवतीं बांधला आणि कुत्रीची सांखळी सोडली.

एकदम उडी मारून सेमिलांट त्या माणसाच्या अंगावर धांवली, तिनें त्याच्या खांद्यांवर आपले पंजे टेंकले व तोंड मांसाला लावलें. तिच्या तोंडांत एक तुकडा गेला तेवढा घेऊन ती खालीं उतरली, तिनें तो अधाशीपणें खाल्ला, आणि ती पुन्हां त्या बागुलबोवाच्या नरड्यावर धांवली. बरेचदां असा हल्ला करून करून तिनें आपल्या दातांनीं तें मांस कुरतडून खाल्लें व बागुलबोवाच्या तोंडाच्या आणि नरडीच्या चिंध्या चिंध्या करून टाकल्या.

म्हातारी शांतपणें हें सर्व पहात होती. तिचे डोळे चमकूं लागले. तिनें नंतर कुत्रीला पुन्हां सांखळीनें बांधून ठेवलें, आणि दोन दिवस तिला उपाशीं ठेऊन बागुलबोवाला बांधलेलें मांस खाऊं दिलें.

तीन महिनेपर्यंत कुत्रीला तिनें अशा प्रकारच्या दातां-पंजांच्या जोरावर मिळविलेलें मांस धडपड करून खाण्याची इतकी संवय लावली कीं, तिला नंतर सांखळीनें बांधून न ठेवतां ती खुणेनें त्या बागुलबोवावर हल्ला करायला सांगायची.

पुढें बागुलबोवाच्या गळ्याभोंवतीं कांहींसुद्धां न बांधतां त्याचें नरडें व तोंड दातांनीं व पंजांनीं चिंध्या चिंध्या करावयाला तिनें आपल्या कुत्रीला शिकविलें. इतकी कामगिरी बजावल्यानंतर सेमिलांटला बक्षीस म्हणून शिजलेलें मांस मिळत असे.

तो बागुलबोवा दृष्टीस पडतांच सेमिलांट गुरगुरून आपल्या मालकिणीकडे नजर वळवी, आणि म्हातारी एका विशिष्ट आवाजांत त्याच्याकडे बोट दाखवून ' छूः ' म्हणायची.

योग्य संधि येऊन ठेपली असे वाटतांच एके दिवशीं सकाळीं उत्साहपूर्ण अंतःकरणानें म्हातारी प्रार्थनामंदिरांत गेली व देवाचा आशीर्वाद मागून परत आल्यावर तिनें आपल्या नवऱ्याचा जुना पोषाख अंगावर घातला. म्हाताऱ्या माणसाच्या वेषांत ती व तिची कुत्री गांवाखाली सामुद्रधुनीच्या कांठावर आल्या आणि एका मच्छीमाराच्या होडींत बसून सार्डीनिया बेटाच्या रोखानें निघाल्या.

म्हातारीनें आपल्याबरोबर एका कापडांत अर्धवट शिजलेल्या मांसाचा एक मोठासा तुकडा बांधून घेतला होता. सेमिलांट दोन दिवसांची उपाशीं होती. थोड्या थोड्या वेळानें म्हातारी कुत्रीच्या नाकाशीं ती मांसाची गांठोडी नेऊन तिला उतावीळ करीत होती.

त्या लाँगोसार्डो गांवांत शिरल्या. म्हातारीनें एका रोटीविक्याच्या दुकानांत जाऊन निकोलस् रॅव्होलॅटी कुठें राहातो याची चौकशी केली. तो आपला सुताराचा धंदा करीत शेजारीच रहात असे असे तिला कळलें.

तिनें निकोलसच्या कारखान्याचें दार उघडें पाहतांच हांक मारली, " अरे निकोलस ! "

निकोलसनें मागे वळून पाहिलें. म्हातारीनें कुत्रीची सांखळी सोडून बोटानें निकोलसकडे इषारा केला व ती उद्गारली, " छूः, जा, खा त्याला; खाऊन टाक ! "

भुकेनें व्याकुळ झालेल्या सेमिलांटनें निकोलसच्या नरडीवर हल्ला केला. तिनें त्याला खालीं लोळविलें, आणि तिला धरून तो मनुष्य व ती कुत्री गडबडां लोळूं लागले. निकोलसनें थोडावेळ धडपड केली, पण जसजशी कुत्री त्याच्या नरडीचें मांस कुरतडूं लागली तसतशी त्याची हालचाल बंद झाली. शेवटीं सेमिलांटनें निकोलस रॅव्होलॅटीचें नरडें चिथून टाकलें.

निकोलसच्या दोघां शेजाऱ्यांना नंतर आठवलें कीं, आपण आपल्या दाराशीं बसलों असतांना एक म्हातारा व त्याचा कुत्रा आपल्या दारावरून कुठेंतरी जात होते आणि तो मनुष्य आपल्या कुत्र्याला कांहींतरी लालसर वस्तु खायला देत होता.

त्या दिवशीं रात्रीं अँटॉइन् सॅव्हॅरिनीची आई आपल्या खोपटांत शांतपणें झोंपली होती, आणि सेमिलांट रात्रीं एकदांही ओरडली नाहीं.

---

# हारलों !-

प्रेम ही एक दुर्दम्य भावना आहे. ती मृत्यूलाही भीत नाहीं आणि कुणालाच हार जात नाहीं.

ऑस्ट्रियांत व्हिएन्ना शहरीं १८७३ सालीं जें जागतिक प्रदर्शन भरलें होतें तें पाहण्याकरितां देशोदेशींचीं माणसें येत. एक तरुण, साधारण देखणा यहुदी मनुष्यही त्या वर्षीं व्यापारांत आणि सट्टयांत बूड आल्यामुळें दुसरीकडे व्यापारांत नवीन क्षेत्रें काबीज करून पुन्हां संपत्ति सांठविण्याआधीं कांहीं दिवस चैन करावी म्हणून प्रदर्शनांतल्या वेगवेगळ्या करमणुकी पहावयाला रोज येत असे. एके दिवशीं तो प्रदर्शनाच्या रशियन-विभागांत फिरत असतां त्याची एका नूतन-परिणित, खानदानी, पण सांपत्तिकदृष्टया साधारण खालावलेल्या रशियन जोडप्याची गांठ पडली.

जगांतल्या स्वतःच्या अनुभवावरून त्या जोडप्याची ओढाताण हेंच आपल्या यशाचें मर्म आहे अशी अटकळ बांधून तो त्या देखण्या रशियन स्त्रीचा अभिलाष मनांत धरून त्यांची ओळख दृढ करूं लागला. त्या धनवान यहुदी तरुणाचा हेतु बाईच्या लक्षांत येऊन त्याचा कशा प्रकारें सूड घ्यावयाचा याबद्दल ती विचार करूं लागली.

दिवसांमागून दिवस चालले तसा तो कुबेर तिच्यावर खरोखरच प्रेम करूं लागला होता, आणि एके दिवशीं रात्रीं संधि साधून, ती एकटी एका दुकानासमोर उभी असतांना, तो तिच्याजवळ पोहोंचला. •खरी परिस्थिती अशी होती कीं,

आपल्या पत्नीची लहर कापडाच्या दुकानाकडे जाण्याची आहे हें लक्षांत येतांच, तिचा गरीब पति स्वतःच्या खिशांत पुरेशी ऊब नसल्यामुळें, तिला नाखुष करण्याचें टाळण्याकरितां दुसरीकडे झटकला होता. पण मोह आवरतां येत नव्हता म्हणून स्त्रीसुलभ लालसेनें ती बाई त्या दुकानासमोर खिळून उभी राहिली होती.

" तो फरचा झगा पाहिला तुम्हीं ? " ती बाई त्या यहुद्याला म्हणाली, " मला खूपच आवडला बाई ! " तिच्या डोळयांत अभिलाषा नुसती ओसंडून राहिली होती. " मला कित्ती कित्ती हवासा वाटतो तो ! "

आणि झग्याला लावलेलें पांढरें तिकीट तिनें हातांत धरून पाहिलें. "चारशें रुबल ! " ती हताश होऊन उद्गारली.

" मग त्यांत काय झालं ? " तो यहुदी हळूंच उत्तरला. " तुमच्यासारख्या गोड अप्सरेच्या समोर चारशें टिकल्या कुठल्या झाडाचा पाला ! "

" पण माझे यजमान तितके श्रीमंत कुठं आहेत ? "

" तुम्हीं कठोर होत नसलांत तर मी एक तोड सुचविणार आहें, " तिच्या कानाजवळ आपलें तोंड नेऊन यहुदी पुटपुटला. " मला तो झगा तुम्हांला बक्षीस देण्याची परवानगी द्या. "

" चला, कांहींतरीच थट्टा करतां आहांत, झालं. "

" मुळींच नाहीं. "

" मग जर अशा प्रकारची मागणी करून माझा अपमान करायची तुमची इच्छा नाहीं, तर तुम्हीं थट्टा करताहांत असं मीं म्हणूं नको तर काय ? "

" पण बॅरोनेस् , माझं तुमच्यावर प्रेम जडलं आहे ! "

" मग तर तुम्हीं माझ्या भावनांना मुळींच दुखवतां कामा नये ! "

" पण—"

" मला नाहीं हा असला चावटपणा सहन व्हायचा अं ! " ती तावातावानें म्हणाली. " मीं मनांत आणलं तर जुन्याकाळीं राण्या आपल्या दासांना चाबकानं झोडून काढत असत तशी मी तुम्हांला झोडून काढेन ! "

" तुमचा दास होण्यापेक्षां थोर असं भाग्य माझ्या वांट्याला कधींतरी येऊं शकेल काय ? " तो तरुण आनंदातिशयानें उद्गारला. " तुम्हीं माझं जें जें काय कराल त्याला या दासाची तयारी आहे. हा झगा घालून तुमच्या हातांत चाबूक असलेलं ज्यावेळीं मी तुम्हांला पाहीन त्या वेळीं माझ्या डोळयांचं पारणं फिटेल असं मला वाटतं. "

बॅरोनेसनें क्षणभर त्या यहुद्याकडे पहात भिवया आकुंचित केल्या आणि एक अस्फुट स्मित तिच्या ओंठांवर चमकलें. " मग मीं जर तुमच्या देणगीचा स्वीकार केला तर तुम्हीं मला चाबकानं झोडपूं द्याल ? " तिनें शांतपणें विचारलें.

" आनंदानं ! "

" ठीक आहे. ठरला सौदा. मी तुम्हांला पंचवीस फटके मारेन, आणि पंचविसाव्या फटक्यानंतर तुमची होऊन राहीन. "

" तुम्हीं खरंच सांगतां कां हें ? "

" अगदीं खरं. "

भावनाविवश होऊन तिचा हात त्या यहुद्यानें धरून आपल्या ओंठांजवळ नेला, त्याचें चुंबन घेतलें व विचारलें, " मग मी कधीं येऊं ? "

" उद्यां रात्रीं आठ वाजतां. "

" येतांना हा झगा आणि एक चाबूकही पण आणूं ? "

" नाहीं, ती व्यवस्था मीच करून घेईन. "

तो प्रेमवेडा यहुदी जेव्हां दुसरे दिवशीं रात्रीं त्या रशियन जोडप्याच्या घरीं गेला तेव्हां बॅरोनेस एकटीच झकपक पोषाख करून हातांत एक छोटा चाबूक घेऊन कोचावर रेलून बसली होती. आल्याबरोबर तरुणानें तिच्या हाताचें चुंबन घेतलें. " तुम्हांला आपला करार आठवतो ना ? " तिनें विचारलें.

" आठवतो तर ! मीं तुम्हांला पंचवीस फटके मारूं द्यायचे आणि नंतर मी जें काय म्हणेन तें तुम्हीं ऐकायचं. "

" पण मी अगोदर तुमचे हात बांधणार आहे. "

त्यानें तिला आपले हात मागें नेऊन बांधूं दिले, गुडघे टेकले, आणि पहिल्या चाबकाचा फटकारा बसतांच तो हंसत म्हणाला, " बऱ्याच जोराचा तडाखा लगावलास, लाडके ! "

ती कुत्सितपणें हंसली. " तुम्हांला वेदना व्हाव्या अशीच माझी इच्छा आहे, " ती म्हणाली. आणि निर्दयपणें ती तडाख्यामागून तडाखे लावूं लागली. अखेर तो प्रेमवेडा ओरडूं—कण्हूं लागला, पण मनांत पुढची गोड आशा बाळगून त्यानें सर्व सहन करण्याचा निश्चय केला.

तिनें चोवीस तडाखे लगावले व चाबूक खालीं फेंकला.

त्या तरुणाचा दुर्दम्य उत्साह अजून ओसरला नव्हता. " फक्त चोवीसच फटके झाले ! " तो म्हणाला.

" मीं पंचविसावा तुम्हांला देणगीदाखल बक्षीस दिला आहे ! " ती हंसून उत्तरली.

" आतां तूं माझी, सर्वस्वीं माझी झालीस, बरं कां, प्रिये ? "

" म्हणजे ? तुमचं म्हणणं तरी काय ? "

" कां बरं ? मीं तुझ्या इच्छेप्रमाणें तुला झोडपूं दिलं नाहीं ? "

" तें खरं ! पण मी तुमची इच्छा पंचवीस फटक्यांनंतर कबूल करायचं वचन दिलं होतं, आणि तुम्हांला तर फक्त चोवीसच फटके मिळाले आहेत ! " त्या निर्दय पण सुशील जीवानें अखेरचा निर्णय दिला. " आणि फक्त चोवीसच फटके तुम्हीं खाल्ले याबद्दल माझे साक्षीदार हजर आहेत. " तिनें दारावरचा पडदा सरकविला. तिचा नवरा आणि इतर दोघे गृहस्थ दिवाणखान्यांत हंसतच आले.

क्षणभर तो गुडघे टेकलेला सटोडिया स्तब्ध राहिला. मग त्यानें एक उसासा टाकला, व एकच शब्द खिन्नपणें त्याच्या तोंडून बाहेर पडला, " हारलों ! "

---

# मृताशेजारीं-

तो आस्ते आस्ते मरणाच्या पंथाला लागला होता. क्षयरोगी असेच मरत असतात. आम्हीं दोघे समुद्रकांठच्या त्या पांथस्थगृहांत ठाणें देऊन होतों. तो दररोज दोन वाजतां दुपारीं हॉटेलच्या दाराशीं ठेवलेल्या बांकावर बसून कांहींवेळ खिन्नपणें समोरच्या भूमध्यसमुद्राकडे पाही, मग अगदीं हळूं आपल्या एका हाडकुळ्या पायावर दुसरा पाय आडवा ठेवी, आणि बरोबर आणलेलें पुस्तक उघडून त्याच्या एखाद्या पानाकडे पहात राही. त्याच्या हातांत नेहमीं तें एकच पुस्तक दिसत असे. नंतर तो एखाद्या पुतळ्यासारखा स्तब्ध राहून वाचूं लागे. जणूं काय डोळ्यांनीं आणि मनानें त्याचें वाचन चाले, मृत्यूच्या दाराशीं ठोठावणारें त्याचें शरीर ते पुस्तक वाचत आहेसें वाटे, त्याचा आत्मा त्या पुस्तकांत बुडी मारून नाहींसा झाल्यासारखा भास होई. सध्याकाळचा गार

वारा वाहूं लागतपर्यंत तो वाचत असे, आणि मग खोकल्याची एखादी उबळ आली म्हणजे परत पांथस्थगृहांत प्रवेश करीत असे.

शरीरानें उंच, दाढी असलेला तो एक जर्मन होता. त्याचें खाणें-पिणें स्वतःच्याच खोलींत होई आणि तो कुणाशींच कधीं बोलतांना दिसत नसे.

मला नकळत मी या व्यक्तीकडे आकर्षिला गेलों. एके दिवशीं दुपारीं मींही त्याच्या शेजारीं एक काव्याचें पुस्तक घेऊन बांकावर बसलों.

नेहमींच्या संवयींप्रमाणें समुद्रावलोकन संपल्यानंतर पायावर पाय टेकून तो आपला ग्रंथ उघडणार तोंच एकाएकीं माझ्याकडे वळून म्हणाला, " आपणांला जर्मन भाषा अवगत आहे ? "

" मला एक अक्षरसुद्धां समजत नाहीं, " मी उत्तरलों.

" अरेरे ! नाहींतर योगायोगानं आपण एकाजागींच राहतों आहोंत तेव्हां मीं तुम्हांला एक अप्रतिम वस्तू, हें माझ्या हातांतलं पुस्तक, वाचायला दिलं असतं ! "

" कोणतं पुस्तक आहे तें ? "

" ही माझ्या गुरूची, शोपेनहॉअरची, त्याच्या स्वतःच्या हातानं टिपणं करून ठेवलेली प्रत आहे. हीं पहा ना, सबंध मार्जिनं त्याच्या हस्ताक्षरांत लिहिलेलीं आहेत. "

मीं त्याच्या हातांतून आदरयुक्त भावनेनें तें पुस्तक घेऊन मला न समजणाऱ्या त्या शब्दांकडे पाहूं लागलों. मला त्यांचा अर्थ समजला नाहीं, पण पृथ्वीवर कांहीं काळ राहून नांव करून गेलेल्या एका सर्वश्रेष्ठ स्वप्नविध्वंसकाचे टिपून ठेवलेले ते अमर विचार होते.

आपण शोपेनहॉअरच्या तत्वज्ञानाबद्दल विरोध प्रकट करूं, त्याच्यावर रागवूं, संतापूं, किंवा वेळींप्रसंगीं उत्साहप्रदर्शन देखील करूं, पण त्यानें जगावर आपल्या तुच्छतावादाचें आणि भ्रमनिरसनाचें जें शिक्कामोर्तब केलें आहे त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. तो एक निरीच्छ सौख्य-शोधक असून त्यानें सर्वसाधारण समजुती, आशावाद, काव्यप्रतिमा आणि मृगजळें उलथवून टाकलीं असून आकांक्षांचा नाश केला होता, आत्म्यासंबंधींच्या विश्वासाच्या चिंधड्या उडविल्या होत्या, प्रेमाचा मुडदा पाडला होता, स्त्रीपूजनाची चेष्टा केली होती, अंतःकरणांच्या भ्रमांचा भोंपळा फोडला होता आणि अविश्वासवाद्यांनीं स्वतःला वाहून घेतलेलें कार्य पूर्ण-

त्याला पोहोंचविलें होतें. तो सर्वच मननीय विचारांची आणि तत्वांची विल्हेवाट आपल्या तऱ्हेवाईक पद्धतीनें लावून त्यांना फोल ठरवून दाखवीत असे. आणि आजमितीला देखील जे जे त्याला तुच्छ लेखतात त्यांच्या आत्म्यांच्या ठायीं त्यांना नकळत शोपेनहॉअरच्या विचारप्रणालीचे अंश रुजलेले आढळतात.

"मग एकूण तुम्हीं शोपेनहॉअरच्या निकट सहवासांत आलां होतां म्हणायचें?" मी त्या जर्मन गृहस्थाला म्हणालों.

तो खिन्नपणें हंसला. "त्याच्या मृत्यूपर्यंतदेखील," तो म्हणाला.

आणि तो आपल्या जर्मन तत्वज्ञानी गुरूबद्दल कितीतरी बोलला, व त्याच्या कक्षेंत येणाऱ्या लोकांवर त्या असाधारण विभूतीची कशी एक प्रकारची दैवी छाप पडत असे हेंही त्यानें सांगितलें.

त्यानें एका फ्रेंच मुत्सद्याच्या शोपेनहॉअरशीं झालेल्या मुलाखतीचें वर्णन केलें. तो म्हणाला, "हा गृहस्थ शोपेनहॉअर ही व्यक्ति आहे तरी कोण हें पाहण्याकरतां जेव्हा आला तेव्हां त्याला तो लोकांनीं गजबजलेल्या एका दारूच्या गुत्त्यांत आपल्या शिष्यपरिवारासमवेत बसलेला आढळला. दिसायला रुक्ष, सुरकुतलेला, अविस्मरणीय पद्धतीनं हंसणारा असा तो प्राणी एकीकडे खातपीत होता आणि एकेका शब्दासरशीं कल्पना आणि विश्वास यांचीं विचारप्रतीकं फाडून फाडून त्यांच्या चिंधड्या चिंधड्या करीत होता. तो फ्रेंच गृहस्थ घाबरून आणि भिऊन परत जातांना म्हणाला, 'मला असं वाटलं कीं मी एक तास सैतानाच्या सहवासांत घालविला!'" तो जर्मन दुखणाईत पुढें म्हणाला, "त्याचं हास्य खरोखरच भयानक होतं बरं कां? त्याच्या मृत्यूनंतर देखील आम्हांला त्याची भीति वाटे. जर तुम्हांला कंटाळा येत नसेल तर त्यासंबंधींची सर्वसाधारण लोकांना माहीत नसलेली एक आख्यायिका मी तुम्हांला सांगतों."

आणि थकलेल्या आवाजांत मधूनमधून खोकत तो म्हणाला, "शोपेनहॉअर नुकताच मेला होता, आणि आम्हां शिष्यवर्गापैकीं दोघांदोघांनीं पाळीपाळीनं सकाळपर्यंत पहारा करावा असं ठरलं होतं.

"त्याला एका मोकळ्या, विस्तीर्ण, अंधाऱ्याशा अशा दालनांत पलंगावर निजविलं होतं. उशालगत दोन्ही बाजूला दोन मेणबत्त्या पेटत ठेवल्या होत्या.

"मध्यरात्र झाली असेल तेव्हां माझ्या एका सोबत्याबरोबर माझी पहाऱ्याची पाळी आली. आम्हीं आल्यावर पूर्वीचे दोघे खोलीबाहेर गेले आणि आम्हीं पलंगाच्या पायथ्याशीं बसलों.

" शोपेनहॉअरच्या चेहेऱ्यांत फरक पडला नव्हता. तो तेव्हांही हंसतच होता. त्याच्या ओंठांभोंवतीं आमच्या परिचयाचं त्याचं नेहमींचं स्मित अजूनही रेंगाळत असून तो क्षणभरांत डोळे उघडून, हालचाल करून, बोलूं लागेल असा भास होत होता. त्याच्यासंबंधींचे विचार,-किंवा त्याचे विचार म्हणा वाटल्यास,-आम्हांला गुरफटून टाकत होते. त्याच्या व्यक्तिमत्त्वाच्या वातावरणांत आम्ही विलीन होत आहोंत असं आम्हांला वाटूं लागलं. त्याचं सार्वभौमत्व तो आतां मेल्यानंतर आम्हांला जास्त स्पष्ट झाल्यासारखं भासूं लागलं.

" या माणसांचीं पार्थिव शरीरं नाहींशीं होतात, पण ते स्वतः मागंच राहतात, आणि त्यांच्या हृदयांचं स्पंदन थांबण्याच्या रात्रीं तर ते विशेषच भयानक असतात अशी मी हमी देतों.

" अज्ञात जीवनाच्या अंधःकारांत शोपेनहॉअरच्या शब्दांकरवीं अग्नीच्या चिरकांड्यांसारखे उडविले जाणारे त्याचे कांहीं विचार, त्याचीं कांहीं तत्वं आणि कांहीं अनन्यसाधारण प्रमेयं यांबद्दल आम्हीं आपसांत कुजबुजत बोलूं लागलों.

" ' मला वाटतं हा आतां बोलणार, ' माझा सोबती म्हणाला. आणि आम्हीं त्या हंसऱ्या, तटस्थ चेहेऱ्याकडे भीतभीतच पाहूं लागलों. हळूं हळूं आम्हांला फारच चमत्कारिक दडपल्यासारखं वाटूं लागून माझी शुद्धबुद्ध हरपण्याच्या बेतांत आली, आणि मी पुटपुटलों, ' मला काय होतंय कुणास ठाऊक, पण ठीक वाटत नाहीं. '

" आणि त्याच क्षणीं प्रेतांतून एक प्रकारची घाण येत आहे असं आम्हांला वाटलं.

" माझ्या सोबत्यानं आम्हीं शेजारच्या खोलींत जाऊन मधलं दार उघडं ठेवावं असं सुचविलं व मला तें पटलं.

" उशालगतची एक मेणबत्ती काढून मीं हातांत घेतली व दुसरी तशीच जिथल्यातिथं राहूं दिली. आम्हीं दुसऱ्या खोलींत पलीकडच्या भिंतीशीं बसून प्रकाशांत स्पष्ट दिसणाऱ्या प्रेताकडे पाहूं लागलों.

" पण शोपेनहॉअरची आमच्यावरची पकड अजून नाहींशी झाली नव्हती. त्याच्यांतला दैवी अंश मोकळा, स्वतंत्र, शक्तिमान् होऊन आमच्या भोंवतीं घुटमळत आहे असा भास आम्हांला होऊं लागला. मधून मधून त्याच्या कुजूं लागलेल्या शरीराची घाण आमच्या घ्राणेंद्रियापर्यंत येऊन पोहोंचे.

" एकाएकीं कसला तरी अस्पष्ट आवाज त्या मृताच्या खोलींतून ऐकूं आल्यामुळं आमच्या रोमारोमांत शिरशिरी पसरली. आम्हीं लगेच त्याच्याकडे

निरखून पाहिलं आणि,-होय, खरंच, बरं कां,-आम्हीं दोघांनीं अगदीं स्पष्टपणें पाहिलं तों कांहींतरी पांढरं त्याच्या अंथरुणावरून उडून खालीं सतरंजीवर पडलं आणि शेजारच्या आरामखुर्चीखालीं नापत्ता झालं.

" आम्हीं क्षणभरसुद्धां विचार न करतां ताड्‌दिशीं उठून उभे झालों. आमची भीतीनं गाळण उडाली होती आणि आम्हीं पळून जाण्याच्या बेतांत आलों होतों. मग आम्हीं एकमेकांकडे पाहिलं. आमचीं काळजं धडधडत होतीं. मला अगोदर वाचा फुटली, ' तूं पाहिलंस ? '

" ' हो, मीं पाहिलं. '

" ' तो मेला नसेल एकंदरीत ? '

" ' कसं शक्य आहे ? शरीर तर कुजूं लागलं आहे ! '

" ' मग आतां काय करायचं ? '

" माझा सोबती बिचकतच म्हणाला, ' जाऊन पाहिलं पाहिजे. '

" मी मेणबत्ती हातांत घेऊन पुढं झालों आणि दालनभर खालीं नजर फिरविली. नंतर मी अंथरुणाकडे वळलों. पण शोपेनहॉअरच्या चेहेऱ्याकडे पाहतांच मी जागच्याजागींच थिजलों,-तो हंसत नव्हता ! त्याच्या चेहेऱ्यावर एक विचित्र भाव दिसत होता. त्याचे ओंठ निकटले होते आणि गाल खोल गेले होते. मी पुटपुटलों, ' हा मेला नाहीं ! '

" पण ती कुजल्याची घाण पुन्हां माझ्या नाकांत शिरली व मला गुदमरल्यासारखं झालं. एखादं भूत पहावं तशा प्रकारें त्याच्याकडे टक लावून पहात मी जागच्याजागींच खिळलों. माझ्या सोबत्यानं दुसरी मेणबत्ती उचलून खालीं वांकून पाहिलं, व माझ्या हाताला स्पर्श करून आरामखुर्चीकडे बोट दाखविलं. मीं तिकडे नजर वळविली, आणि,-पलंगाच्या बाजूला, आरामखुर्चीखालीं, काळसर सतरंजीवर, जणूंकाय चावा घेण्याकरतां उघडलेल्या अशा शोपेनहॉअरच्या पांढऱ्या दातांच्या कवळया मला दिसल्या.

" प्रेत कुजूं लागल्यामुळं जबडा सैल होऊन त्या तोंडांतून बाहेर फेंकल्या गेल्या होत्या.

" मी त्या दिवशीं खरोखरच भ्यालों होतों. "

सूर्य मावळूं लागला होता; जर्मन क्षयरोगी उठला व मला ' बराय् ' म्हणून पांथस्थगृहांत शिरला.

---